


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








संपादक - डॉ. वसंत अ. जोशी

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २३८ - १९८६ - जुलै - सप्टेंबर
(श्री. म. माटे जन्मशताब्दी विशेषांक)

" २३९ - १९८६ — दिवाळी अंक (ऑक्टो.-डिसेंबर)
(गझल विशेषांक)

" २४० १९८७ — जुलै जाने.- मार्च

" २४१ १९८७ — एप्रिल - जून

अंक २३८ - २३९ - २४० - २४१

अनुक्रमणिका

संपादक - डॉ. वसंत अ. जोशी

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २३८ - १९८६ - जुलै - सप्टेंबर
(श्री. म. माटे जन्मशताब्दी विशेषांक)

" २३९ - १९८६ — दिवाळी अंक (ऑक्टो.-डिसेंबर)
(गझल विशेषांक)

" २४० १९८७ — जुलै - मार्च

" २४१ १९८७ — एप्रिल - जून

अंक २३८ - २३९ - २४० २४१)

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २३८ ■ जुलै ते सप्टेंबर १९८६ ■ मूल्य पाच रुपये

## श्री. म. माटे जन्मशताब्दी विशेषांक

## अंतरंग



संपादक : **डॉ. वसंत स. जोशी**
संपादन समिती : **ज्योत्स्ना देवधर, राजा फडणीस, म. ना. अदवन्त**
सल्लागार : **राजेन्द्र बनहट्टी, गो. म. कुलकर्णी**
प्रकाशक व मुद्रक : **डॉ. म. वि. गोखले**
कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ४११०३०
दूरध्वनी : ४४२९६३
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत

# संपादकीय

## प्रा. श्री. म. माटे यांची जन्मशताब्दी



थोर समाजसेवक, विचारवंत, प्रा. कै. श्री. म. तथा बापूसाहेब माटे यांची जन्मशताब्दी (जन्म ३१ ऑगस्ट १८८६) यावर्षी साजरी होत आहे. सांगली येथे १९४३ साली भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. आणि १९४६ मध्ये महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्याध्यक्षपदी त्यांची निवड झाली होती. त्यांनी आयुष्यभर विपुल आणि विविधांगी लेखन केले. वृत्तपत्रीय दैनंदिन लेखनापासून प्रदीर्घ वैचारिक प्रबंधापर्यंत अनेक प्रकार त्यांनी हाताळले. आणि हे लेखन करीत असताना खास त्यांची अशी मोकळी चाकळी शैली निर्माण झाली. 'विज्ञानबोधा'पासून 'रामदासांच्या प्रपंचविज्ञाना'पर्यंत अनेक विषयांवर त्यांनी ग्रंथलेखन केले. कादंबरी, कथा लिहिल्या. चरित्रे लिहिली. आत्मचरित्र लिहिले. जीवनानुभूतीचा वळकट पाया त्यांच्या या सर्व लेखनाच्या तळाशी होता. सामाजिक बांधिलकीचा विषय ज्याकाळी साहित्यक्षेत्रात चर्चेसाठी नव्हता, त्या काळात कै. बापूसाहेबांनी अस्पृश्यता निवारणाचे आणि साक्षरता प्रसाराचे जे कार्य केले, ते अजोड आहे. सार्वजनिक कार्यासाठी स्वकष्टार्जित धनाचा वापर करण्याची त्यांची सेवाभावी वृत्ती आज दुर्मिळ झाली आहे. अंगीकृत सेवाकार्यात स्वतःला झोकून देण्याची त्यांची वृत्ती होती. त्यासाठी कार्यकर्त्यांना हाताशी धरून, प्रतिष्ठितांचे साहाय्य घेऊन त्यांनी अनेक प्रचंड कार्ये केली. आणि करण्याची उमेदही बाळगली; परंतु कॅन्सरसारख्या असाध्य रोगाने ग्रस्त झाल्यामुळे त्यांचे सारेच मनोरथ विरून गेले. रोगनिदान झाल्यानंतर आणि आयुष्याची मर्यादा लक्षात आल्यावरही ते खचले नाहीत. साहित्यावरील अव्यभिचारी निष्ठेमुळे ते अखेरपर्यंत योजनापूर्वक लेखन करीत राहिले. तोच त्यांचा विरंगुळा ठरला. अनुभवाधिष्ठित लेखनाच्या भूमिकेतून त्यांनी कथालेखन केले. आणि आज ग्रामीण मराठी साहित्याची गंगोत्री म्हणून त्यांच्याकडे पाहिले जाते. त्यांच्या लेखनापासून अनेकांनी प्रेरणा घेतली. प्राध्यापक म्हणून शिकवीत असताना त्यांनी विद्यार्थ्यांवर लेखनाचे संस्कार केले. प्रेरणा दिली. आज आघाडीवर असणारे कितीतरी साहित्यिक त्यांचे ऋण मान्य करताना दिसतात. त्यांच्या विशिष्ट राजकीय विचारसरणीमुळे काही वादळे उठली. लोकक्षोभालाही त्यांना तोंड द्यावे लागले. वाङ्मयीन क्षेत्रात आचार्य अत्र्यांशी त्यांचा वाद झाला. संमेलनाध्यक्ष आणि परिषदेचा कार्याध्यक्ष यांच्या अधिकाराबाबत घाटयांशी वाद झाला. मराठी वाङ्मयाच्या इतिहासाची त्यांची एकादशखंडाची योजना तर वादग्रस्त ठरून मागे पडली आणि नव्या स्वरूपाची योजना साकार झाली. म. सा. परिषदेतील 'विष्णुशास्त्री चिपळूणकर सभागृह' बांधण्यात पुढाकार घेऊन ते कार्य त्यांनी तडीस नेले. परिषदेच्या परीक्षासंचालनातही त्यांनी रस घेतला. 'म. सा. पत्रिके'च्या संपादनात कै. कविवर्य यशवंत यांना त्यांनी सहकार्य केले.

विशिष्ट विचारसरणीमुळे प्रा. श्री. म. माटे हे एक वादळी आणि वादग्रस्त व्यक्तिमत्त्व ठरले, तरी साहित्य क्षेत्रातील त्यांची कामगिरी त्यामुळे उणावते असे नाही. समकालीनांचे ग्रह-पूर्वग्रह यथार्थ मूल्यमापनाच्या आड येऊ शकतात. कै. प्रा. बापूसाहेब माटे यांच्या देहावसानास आता तीस वर्षे होत आली आहेत. राजकीय, सामाजिक आणि वाङ्मयीन क्षेत्रात आज एक नवी पिढी उदयास आली आहे. अशावेळी त्यांच्या जीवित कार्याचे मूल्यमापन निराग्रही

आणि डोळस वृत्तीने होण्याची शक्यता आहे. या दृष्टीने ' महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चा प्रस्तुत अंक आम्ही ' प्रा. श्री. म. माटे जन्मशताब्दी विशेषांक ' म्हणून प्रसिद्ध करीत आहोत, हा अंक सादर करताना प्रा. माटे यांच्या अनेक चाहत्यांनी, विद्यार्थ्यांनी आम्हाला लेखनाचे आणि अन्य प्रकारचे सहकार्य दिले. आम्ही त्यांचे फार आभारी आहोत.

या जन्मशताब्दी प्रसंगी कै. प्रा. श्री. म. माटे यांच्या स्मृतीस आम्ही विनम्र अभिवादन करतो.

## अभिनंदन

प्रा. माटे यांची जन्मशताब्दी साजरी करीत असतानाच गुजरातीमध्ये ग्रामीण जीवनावर लेखन करणाऱ्या श्री. **पन्नालाल पटेल** यांना १९८५ चे ज्ञानपीठ पारितोषिक मिळाल्याची आनंदवार्ता आली आहे. दीड लाख रुपये रोख आणि प्रशस्तिपत्र यांचा समावेश या पारितोषिकात आहे. ७ मे १९१२ रोजी जन्मलेल्या श्री. पन्नालाल पटेल यांचे शिक्षण पाचवीपर्यंतच झाले. तरी ग्रामीण जीवनातील कथा-व्यथांशी ते समरस झाले. त्यांचे लेखन यामुळेच जिवंत आणि प्रत्ययकारी ठरले. एक मजूर किंवा कारागीर म्हणून उपजीविका चालवीत असताना अनुभवलेल्या जीवनाचे भेदक दर्शन त्यांच्या साहित्यात घडते. ' यानविनी भवाई ' या त्यांच्या पारितोषिक-प्राप्त कादंबरीत १९५६ मधील भीषण दुष्काळाचे चित्रण आले आहे. प्रतिकूल परिस्थितीवर मात करण्याच्या मानवी प्रवृत्तीचे मार्मिक दर्शन त्यांनी घडविले आहे. श्री. पन्नालाल पटेल यांनी विपुल लेखन केले असून आजपर्यंत त्यांच्या तीस कादंबऱ्या, सत्तावीस लघु-कथासंग्रह, पाच नाटके आणि अन्य विषयांवरील अनेक पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. श्री. उमाशंकर जोशी यांच्यानंतर श्री. पटेल यांना ' ज्ञानपीठ पारितोषिक ' मिळाल्याने गुजराती साहित्यास हा सन्मान दुसऱ्यांदा मिळाला आहे. आम्ही या यथोचित गौरवाबद्दल श्री. पन्नालाल पटेल यांचे हार्दिक अभिनंदन करतो.

## संमेलनाध्यक्ष श्री. विश्राम बेडेकर यांचे अभिनंदन

विख्यात मराठी साहित्यिक श्री. विश्राम बेडेकर यांची अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या हीरक महोत्सवी अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून अविरोध निवड झाली आहे. हे अधिवेशन ऑक्टोबरच्या शेवटच्या आठवड्यात मुंबई येथे भरणार आहे. श्री. बेडेकर यांच्या या उचित सन्मानाबद्दल त्यांचे हार्दिक अभिनंदन ! अध्यक्षपदाचे दुसरे उमेदवार प्रा. द. मा. मिरासदार यांनी आपली उमेदवारी मागे घेऊन श्री. विश्राम बेडेकरांविषयीचा आपला आदर व्यक्त केला आहे. ' रणांगण ' ही कादंबरी, ' टिळक आणि आगरकर ' यासारखे नाटक किंवा ' एक झाड– दोन पक्षी ' यासारखे आत्मचरित्र असे मोजकेच परंतु साहित्यक्षेत्रातील मानदंड ठरण्यासारखे लेखन त्यांनी केले आहे. चित्रपटसृष्टीत पटकथा-कार, दिग्दर्शक म्हणून त्यांनी आपला ठसा उमटविला आहे. साहित्यक्षेत्रातील त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण कार्याचा गौरव त्यांना अविरोध निवडून देऊन करण्यात आला आहे. अध्यक्षीय निवडीचा हा निकोप प्रघात यापुढेही चालू राहिल्यास साहित्यक्षेत्रातील सर्वोच्च सन्मान म्हणून साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाची प्रतिष्ठा वाढत राहील. श्री. विश्राम बेडेकर यांनी यापूर्वी विदर्भ साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद भूषविले आहे. मुंबई संमेलनातील त्यांचे अध्यक्षीय भाषण आणि पुढील कारकीर्द त्यांच्या आजवरच्या लौकिकास साजेशी आणि संस्मरणीय ठरेल, यात शंका नाही.

नांदेड येथे भरलेल्या ५९ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे आणि पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष सुप्रसिद्ध साहित्यिक **श्री. शंकर पाटील** यांनी दि. ५ ऑगस्ट रोजी ६१ व्या वर्षात पदार्पण केले. त्यांनी आज-पर्यंत प्रशासकीय आणि साहित्यिक जीवनाची यशस्वी वाटचाल केली आहे. श्री. शंकर पाटील यांना आम्ही निरामय दीर्घायुष्य इच्छितो.

अ. भा. मराठी साहित्य महामंडळाच्या अध्यक्षपदी **प्रा. गंगाधर गाडगीळ** यांची निवड झाली आहे. त्याच-प्रमाणे **डॉ. भीमराव कुलकर्णी** यांची कार्यवाहपदी आणि **डॉ. बाबासाहेब कलगुटकर** यांची कोषाध्यक्षपदी निवड झाली आहे. या सर्वांचे हार्दिक अभिनंदन !

पुणे विद्यापीठाचे मराठीचे सेवानिवृत्त प्राध्यापक **डॉ. शं. गो. तुळपुळे** यांना सिमला येथील इंडियन इन्स्टिटयूट ऑफ ॲडव्हान्स स्टडी ' या संस्थेकडून फेलोशिप देण्यात आली आहे. दोन वर्षांच्या कालावधीत ' दि डिव्हाइन नेम इन इंडियन ट्रॅडिशन ' या विषयावर संशोधन करून ते प्रबंधलेखन करणार आहेत. पुण्याच्या श्री.ना.दा.ठा. महाविद्यालयाचे

सेवानिवृत्त प्राचार्य डॉ. हेमंत विष्णु इनामदार यांची महिला विद्यापीठाकडून 'सुप्रतिष्ठ प्राध्यापक' म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. या उभयतांना लाभलेल्या सन्मानाबद्दल त्यांचे अभिनंदन!

**श्री. वा. सी. बेंद्रे यांचे देहावसान**

मराठ्यांचा इतिहास आणि मराठी वाङ्मय यांच्या संशोधनात सारी हयात घालविणारे सुप्रसिद्ध संशोधक श्री. वा. सी. बेंद्रे यांचे दि. १६ जुलै रोजी मुंबई येथे देहावसान झाले. छत्रपती संभाजी व राजाराम यांची, अथक परिश्रम आणि विपुल संदर्भ साधने यांच्या आधारावर त्यांनी लिहिलेली, चरित्रे त्यांच्याविषयीचा एक नवा दृष्टिकोन देणारी ठरली. कै. बेंद्रे यांच्या व्यासंगातून निर्माण झालेले 'साधनचिकित्सा' आणि 'महाराष्ट्राचे संशोधन क्षेत्र आणि साधनसंपत्ती' हे ग्रंथ संशोधकांना उपयुक्त आहेत. साहित्य क्षेत्रात 'तुकाराम' हा त्यांच्या संशोधनाचा आवडीचा विषय होता. तुकारामांचे चरित्र, त्यांचे संतसांगाती, त्यांची गुरुपरंपरा, त्यांची मंत्रगीता यांवर त्यांनी साधार ग्रंथरचना केली आणि तुकारामविषयक अभ्यासाला एक वेगळे परिमाण प्राप्त करून दिले. मालोजी, शहाजी आणि शिवाजी यांची त्यांनी लिहिलेली चरित्रेही त्यांच्या व्यासंगाचा परिचय करून देणारी आहेत. संशोधनमग्नतेमुळे त्यांच्या दीर्घायुष्यात त्यांच्याकडून विपुल लेखन झाले. चिकित्सक वृत्तीमुळे त्यांचे लेखन अलंकारिक किंवा शैलीविभ्रमात गुरफटलेले न बनता वस्तुनिष्ठ बनले. संशोधनपर लेखनास हीच शैली योग्य असल्याचे त्यांचे मत होते. नवोदित संशोधकांशी चर्चा करणे, त्यांना मार्गदर्शन करणे, त्यांच्याशी पत्रव्यवहार करणे यात त्यांना आनंद होता. तपस्वी इतिहास संशोधकांच्या परंपरेतील आणखी एक दुवा श्री. बेंद्रे यांच्या निधनाने निखळला आहे. त्यांच्या स्मृतींना आमचे अभिवादन!

**पु. य. देशपांडे यांचे निधन**

प्रसिद्ध कादंबरीकार, पत्रकार आणि चिंतक पु. य. देशपांडे हे नागपूर येथे २७ जुलै रोजी ८७ व्या वर्षी निधन पावले. बंधनाच्या पलीकडे, सुकलेलं फूल, सदाफुली, काळी राणी इ. त्यांच्या कादंबऱ्या स्वातंत्र्यपूर्व काळात बऱ्याच गाजल्या व चर्चाविषय झाल्या होत्या. कै. पी. वाय हे स्वातंत्र्यसैनिक होते आणि त्यांनी १९३२ व ४२ साली कारागृहवास भोगला होता. भवितव्य आणि नागपूर टाईम्सचे ते संस्थापक-संपादक होते. मार्क्सवादाचे अभ्यासक म्हणूनही त्यांची ख्याती होती. पुढे ते गांधीवादी झाले आणि आयुष्याच्या अखेरच्या काळात जे. कृष्णमूर्ती प्रभृतींचे ते एक तत्त्वचिंतक सहकारी झाले. 'अनामिकाची चिंतनिका' या त्यांच्या चिंतनात्मक ग्रंथास साहित्य अकादमीने पारितोषिक देऊन त्यांचा यथोचित गौरव केला होता.

**अभिवादन!**

कै. प्रा. मंगरूळकर यांचे ज्ञानेश्वरीच्या अभ्यासातील एक ज्येष्ठ सहकारी **श्री. वि. मो. केळकर** त्यांच्या पाठोपाठ दोनच महिन्यांनी पुणे येथे २८ जुलै रोजी वृद्धापकाळामुळे निधन पावले. 'ज्ञानेश्वरीची ओवीसंख्या', 'ज्ञानेश्वरीचा अभ्यास भाग पहिला' हे त्यांचे छोटे, पण चिकित्सक ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकांना सदैव मार्गदर्शक ठरणार आहेत.

लिंगायत पंथातील साहित्य व थोर व्यक्ती यांवर मराठीत विपुल लेखन करणाऱ्या डॉ. **जयदेवीताई लिगाडे** या दि. २५ जुलै रोजी सोलापूर येथे निधन पावल्या. कन्नड साहित्य संमेलनाच्या दोन वेळा अध्यक्ष होण्याचा मान त्यांना मिळाला होता. साहित्यक्षेत्रातील त्यांच्या कार्याबद्दल कर्नाटक विद्यापीठाने त्यांना डी.लिट्. ही सन्माननीय पदवी दिली होती. निधनसमयी त्यांचे वय ७४ वर्षांचे होते. सिद्धरामेश्वर पुराण, अक्कम्मादेवी, बसवेश्वर चरित्र, बसवेश्वर वचन हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

—संपादक





अनुक्रमणिका






# श्री. म. माटे : व्यक्ती आणि वाङ्मय / म. पु. केंदूरकर

आधुनिक महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनातील एक महनीय व्यक्तिमत्त्व म्हणून श्री. म. माटे यांचे स्थान वैशिष्टयपूर्ण ठरते. मानव्याविषयी अपार कणव असलेला एक कर्ता समाजसुधारक, एक वास्तववादी समाजशास्त्रज्ञ, प्रगमनशील हिंदुत्वनिष्ठ, मर्मग्राही तत्त्वचिंतक, संवेदनशील जीवनभाष्यकार साहित्यिक, एक श्रेष्ठ शैलीकार, दशसहस्रांमध्ये बुलंद ठरलेला असामान्य वक्ता अशा विविध भूमिकांमधून महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनात माटयांचे एक अढळ स्थान निर्माण झाले आहे. अशा व्यक्तिमत्त्वाची महनीयता ही स्वयंभू आहे. स्वतःचे व्यक्तिमत्त्व प्रयत्नपूर्वक पण अंतःप्रेरणेशी आत्यंतिक इमान राखून घडविणाऱ्या अत्यंत दुर्मिळ अशा व्यक्तींपैकी माटे हे एक होत.

ज्या संघर्षमय काळात ते जन्माला आले त्या त्यांनीच वर्णन केलेल्या 'उच्चीचे ग्रह' असलेल्या काळाचा वारसा त्यांना लाभला होता. तो टिळकांच्या राजकारणाचा, तरुणांची मने पेटवणारा काळ होता. प्रत्येकजण आपापल्यापरीने स्वातंत्र्य चळवळीचा जगन्नाथाचा रथ ओढण्याचा प्रयत्न करीत होता. अशा या राजकारणाच्या गजबजाटात काहीशा उपेक्षित राहिलेल्या समाजसुधारणेच्या क्षेत्राकडे माटे जाणीवपूर्वक वळले आणि अस्पृश्यतानिवारण हा त्यांच्या जिवाचा ध्यास बनला. परंतु त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील भावनात्मकता आणि तर्कशुद्ध बुद्धिवाद यांच्या प्रभावी मिश्रणामुळे प्रत्यक्ष हाती घेतलेल्या कार्याबरोबरच त्या कार्याची शास्त्रशुद्ध, वस्तुनिष्ठ संकल्पना सिद्ध करण्याची त्यांना आवश्यकता वाटली व त्यातून त्यांचे सर्व समाजचिंतन व समाजप्रबोधनही निर्माण झाले. या जाणिवेपोटी वाणीचा व लेखणीचा वापर करण्याची जी ऊर्मी त्यांच्यात निर्माण झाली. तिच्यातून माटयांचे जवळजवळ सर्व वाङ्मय निर्माण झाले. त्यांच्या समाजसेवेमागील ऊर्मी व प्रेरणा यांचा या ठिकाणी एकंकार झालेला दिसतो. त्यामुळेच आविष्काराचा एक अटळ ताण, एक पराकोटीची उत्कट मनःपूर्वकता त्यांच्या वाङ्मयात दिसते. स्वतःला जाणवलेल्या वैशिष्टयपूर्ण जीवनसत्याच्या आविष्कारातून, विचारसंक्रमणाद्वारा समाजात एक नवे चैतन्य निर्माण करावे, एक नवा आनंद निर्माण करावा हीच त्यांची वाङ्मयनिर्मितीमागील प्रेरणा दिसते.

या वस्तुस्थितीमुळेच माटयांचे व्यक्तिमत्त्व, त्यांचा जीवनक्रम, त्यांची जीवितकार्याची कल्पना व या साऱ्यातून निर्माण झालेले जीविततत्त्वज्ञान व प्रत्यक्ष वाङ्मय यांच्यामध्ये कोणाही वाङ्मयसेवकाच्या बाबतीत आढळणार नाही इतका अपरिहार्य अनुबंध जाणवत राहतो. मानवी जीवन समर्थ, समृद्ध व सुंदर करण्याच्या प्रचंड व्यासातून त्यांच्या जीवितकार्याचा अखंड यज्ञ आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत धडधडत राहिला व त्या यज्ञातून झळाळून निघालेले अनुभूतींचे, चिंतनाचे सुवर्ण म्हणजेच त्यांचे वाङ्मय हे नित्य जाणवत राहते.

माटयांचे बालपण आत्यंतिक हलाखीच्या अवस्थेत गेले. दोन वेळा पोटभर अन्न मिळण्याची वानवा होती. पतीमागे पाच मुलांची जबाबदारी असलेल्या त्यांच्या आईच्या अतिशय स्वाभिमानी व पिळदार व्यक्तिमत्त्वाचा दाट संस्कार त्यांच्या आयुष्याच्या घडणीच्या काळात त्यांच्या मनावर झालेला, त्यांच्या आत्मचरित्रातील उल्लेखावरून दिसून येतो. पुढे सातारला शालेय शिक्षण घेत असताना काही प्रमाणात अच्युतराव कोल्हटकरांचे व मुख्यतः शाळेचे संस्थापक, मुख्याध्यापक, आगरकरांचे अनुयायी असलेले श्री. सीतारामपंत देवधर यांचे संस्कार माटयांवर प्रकर्षाने झाले व आजूबाजूच्या समाजजीवनाचा डोळस वेध घेण्याची एक सुजाण दृष्टी त्यांना लहान वयातच प्राप्त झाली. त्या काळात लहानपणापासूनच आईला वाचून दाखविण्याच्या निमित्ताने त्यांचा संतवाङ्मयाशी घनिष्ठ संबंध आला व शिक्षकांच्या प्रेरणेने निबंधमाला, डॉ

जॉन्सनचे चरित्र, मेकॉलेचे लेख, मोर्लेसेरिजमधील इंग्रजी ग्रंथकारांची चरित्रे, बर्कचे ' फ्रेंच रेव्होल्युशन ' व अमेरिकन क्रांतीवरील व्याख्याने अशा प्रकारच्या वाचनाचे संस्कार त्यांच्यावर झाले. या लहानवयातही वैचारिक वाङ्मयाचीच ओढ त्यांना होती. हे त्यांच्या पिंडगत स्वभाववैशिष्टयांच्या दृष्टीने लक्षात घेण्यासारखे आहे. याच काळात शिवरामपंतांच्या ' काळ ' मधील लेखनाची मोहिनीही त्यांच्या मनावर होती.

महाविद्यालयीन शिक्षणाच्या पहिल्या वर्षी गणितातील कच्चेपणामुळे अपयश आल्यामुळे माटयांनी साताऱ्याच्या शाळेत शिक्षकाची नोकरी पत्करली. त्याच सुमाराला त्यांच्या लेखनकर्तृत्वाला फुटकळपणे सुरुवात झाली. ' ब्रह्मयुवा ' या नावाने शि. म. परांजप्यांच्या ' काळ '-मध्ये अमेरिकन फ्रेंच राज्यक्रांती या विषयांवर सद्यःस्थितीचा संदर्भ घेऊन लिहिलेले लेख, अच्युतरावांच्या सूचनेवरून ' देशसेवक ' ला पाठविलेली बातमीपत्रे, ' केरळकोकिळ ' मधून प्रसिद्ध झालेली काही परीक्षणे, ' प्रेमयज्ञ ' या नावाचे नाटक असे काही प्रयत्न झालेले दिसतात.

एम्. ए. होईपर्यंतच्या काळापर्यंत—१९१७ पर्यंत माटयांच्या स्वतःच्या जीवनाविषयीच्या, आपल्या जीवितकार्यासंबंधीच्या काही कल्पना आजूबाजूच्या परिस्थितीच्या निरीक्षणातून जमत चालल्या होत्या. केवळ स्वतःचा प्रपंच करण्यात इतिकर्तव्यता मानावी हा त्यांचा पिंड नव्हता. काही सामाजिक कार्य करावे ही ऊर्मी होतीच. वस्तुतः वक्तृत्व आणि लेखणी ही राजकारणात यशस्वी होण्यासाठी आवश्यक असलेली आयुधे जवळ असतानाही एम्. ए. झाल्यानंतर १९१७ च्या सुमारास राजकारणातील सवंग लोकप्रियतेचा मोह टाळून अत्यंत कटू अप्रियता पत्करावी लागण्याची शक्यता असलेले स्वकीय समाजाशीच संघर्ष करण्याचे काम माटयांनी अंगिकारले यात त्यांचे आंतरिक इमान व स्वतंत्र, स्वयंभू व्यक्तिमत्त्वाचे लक्षण दिसून येते.

या कार्याला प्रारंभ करताना वा त्यापूर्वीही स्वतःच्या जीवनक्रमाबद्दलची काही सूत्रे माटयांनी निश्चित केली होती. यापैकी स्वदेशीचे व्रत त्यांनी महाविद्यालयीन शिक्षणाच्या आधीच स्वीकारले होते. त्याबरोबरच सरकारी नोकरी न करण्याची शपथही त्यांनी इंग्रजी सातव्या इयत्तेतच घेतली होती. या शपथेपायी पुढे उस्मानिया विद्यापीठ, डेक्कन कॉलेज, एलफिन्स्टन कॉलेज या ठिकाणी प्राध्यापकाची नोकरी स्वीकारण्याची वासुदेवराव पटवर्धनांची सूचना त्यांनी अमान्य केली. वकिलीच्या धंद्यातील नितिमत्तेच्या अभावाच्या जाणिवेतून वकिली करावयाची नाही हेही त्यांनी ठरवून टाकले व त्याचबरोबर सामाजिक कार्य करावयाचे तर पुणे सोडायचे नाही हेही पथ्य पत्करले. त्यासाठी न्यू इंग्लिश स्कूलमधील कायम झालेली नोकरी सोडून ते नू. म. विद्यालयात आले.

स्वतःच्या बुद्धीने घेतलेल्या या निर्णयांनुसार त्यांनी जीवितकार्याची मांडणी केली व ऐन उमेदीतील, कर्तृत्वाच्या बहराच्या काळातील वीस वर्षे, वयाच्या तिशीपासून ते पन्नाशीपर्यंत माटयांनी हे कार्य सर्व तऱ्हेचे मनस्ताप, कष्ट, अपमान सोसून पूर्णतः निस्वार्थीपणाने, निरलसतेने केले.

कार्यामागील प्रेरणेच्या संदर्भात घरच्या दारिद्र्याच्या संस्काराचा उल्लेख वर केला आहेच. रोज एकच वेळा जेवणाऱ्या आपल्या आईच्या चातुर्मासाचा अर्थ आपल्या चित्तावर कायमचा कोरला गेला होता हे माटयांनी आत्मचरित्रात मोठ्या व्याकुळतेने सांगितले आहेच. परंतु माटयांच्या सहृदयतेचे चलनवलन बुद्धिनिश्चयापर्यंत कसे जाऊन पोचते हे पाहण्यासारखे आहे. ही दारिद्र्याची अनुभूती त्यांच्या कार्याला प्रेरणा देण्याला दोन अंगांनी कारणीभूत झाली. एक म्हणजे स्वतःच्या दारिद्र्याच्या अनुभवावरून अस्पृश्य समाजाच्या विपन्नावस्थेची अतिशय तीव्र वेदना त्यांच्या मनात जागी झाली. पण त्याचबरोबर दुसऱ्या बाजूला अशाही दारिद्र्यातून आपण वर येऊ शकलो, प्रतिष्ठित, स्वास्थ्यपूर्ण जीवनाचा अनुभव घेऊ शकलो कारण दारिद्र्याव्यतिरिक्त कोणत्याही सामाजिक वा धार्मिक बंधनांची आपल्या विकासाला आडकाठी नव्हती. अस्पृश्यांच्या बाबतीत मात्र दारिद्र्याबरोबरच ही सामाजिक बंधने भयंकर जाचक होतात हे जाणवत होते. म्हणून ही सामाजिक आडकाठी दूर करण्याचा ध्यास त्यांच्या बौद्धिक श्रद्धेतून निर्माण झाला. त्याचप्रमाणे भारतातील भावी स्वातंत्र्य व लोकशाही यशस्वी व्हावयाची असेल तर संपूर्ण समाजाचे सांस्कृतिक उन्नयन झाले पाहिजे हीही जाणीव त्यामागे होती.

आणि हे सांस्कृतिक उन्नयन कोणत्याही ऐकान्तिक क्रांतिकारी अभिनिवेशाच्या आहारी जाऊन होणार नाही तर समन्वयात्मक उत्क्रांतिवादाचीच कास धरणे आवश्यक आहे हे त्यांनी वास्तववादी दृष्टीने लक्षात घेतले

होते. माटयांना त्यामुळेच 'सनातनी सुधारक' म्हटले जाई व त्या विरुदाचा त्यांना अभिमानच वाटे. या वास्तववादी दृष्टिकोणामुळेच सुधारणेची काही 'स्तवके' त्यांनी मनासमोर ठेवली. तथाकथित उच्चवर्णीयांची मानसिकता बदलणे आणि तथाकथित अस्पृश्यांच्या मनाची मशागत करणे या दोन्हींवर त्यांनी भर दिला होता. अशा धोरणातून त्यांनी सतत वीस वर्षे वेळ, शक्ती, पैसा खर्च करून, कोणत्याही प्रकारची प्रसिद्धीची व मानसन्मानाची हाव न धरता प्रत्यक्ष अस्पृश्यवस्तीत रोज जाऊन हे समाजपरिवर्तनाचे कार्य केले. प्रश्नाचे प्रचंडपण व आपल्या प्रयत्नांच्या मर्यादा यांच्या वास्तव जाणिवेने ते सदैव आपल्या कार्याबद्दल विनम्र असत. पण तरीही स्वतःच्या मार्गाबद्दल व मतांबद्दल मात्र ते आग्रही असत व त्यापोटी प्रत्यक्ष महात्मा गांधींशीही मतभेद व्यक्त करावयाला त्यांनी संकोच केला नाही. याच स्वतंत्र बुद्धीच्या निष्ठेपायी आयुष्यात सामाजिक प्रतिष्ठा व संपन्नता निर्माण करण्याची संधीही त्यांनी नाकारली. सामाजिक कार्यासाठी कोणाकडूनही आर्थिक मदत न घेता स्वतःच्या शिकवणीवर्गातून मिळणारा सर्व पैसा त्यांनी यासाठी खर्च केला. चरितार्थ व सामाजिक कार्य यांची गल्लत प्रपंचातील अन्य व्यक्तींना दुःसह होते. हीही त्यामागची विचारधारा होती. आपल्या मनातील समाजकार्याचे आवेग शमविण्यासाठी प्रपंचातील सर्व व्यक्तींची फरफट निघता कामा नये ही समंजस उदारता त्यामागे होती. स्वतःच्या कार्याच्या उपयुक्ततेबद्दल साशंकता त्यांच्या मनाला शिवली नाही. कारण त्यांच्या मनातील बौद्धिक श्रद्धा. खोऱ्याने डोंगर उपसायचा असेल तर खोऱ्याच्या एका घावावर श्रद्धा पाहिजे हा त्यांचा आग्रह होता. अशा जिद्दीने आपले जीवितकार्य पार पाडणाऱ्या माटयांनी आपली या कार्यातील उपयुक्तता संपली हे लक्षात घेऊन १९३७ च्या सुमारास स्वतःच्या कार्यातून स्वीकारलेली निवृत्ती ही तर त्यांच्या प्रत्यक्ष कार्यापेक्षाही अधिक उदात्त आहे. त्याचप्रमाणे 'महार माटे', 'एक वाया गेलेला माणूस', 'चोरटे हे अस्पृश्यता निवारण' 'भोपटकर व माटे' हे रोज महारांच्या घरी गोमांस खाऊन येतात, 'हरिभाऊ फाटक व माटे मांगिणींशी व्यभिचार करण्यासाठी रात्री मांगवाडयात जातात.' अशा तऱ्हेची अत्यंत खालच्या दर्जाची हिंस्त्र टीका होऊनही, समाजाने आपल्याला फारसा त्रास दिला नाही असे माटयांनी उदारमनस्क सहनशीलतेने नमूद केले आहे.

हे कार्य चालू असतानाच माटयांचे समाजप्रबोधनाचे अन्य उपक्रमही चालू होतेच व लिखाणही चालू होते. त्यासाठी चालविलेले 'समाजविचार मंडळ', त्याद्वारा माधवराव जोशी, आचार्य अत्रे यांच्या संदर्भात उघडलेली अश्लीलता विरोधी आघाडी, प्राचीन परंपरेचा दुराभिमान बाळगणाऱ्या शंकरराव राजवाडयांसारख्यांचा केलेला दंभस्फोट, महाराष्ट्रात त्या काळात गाजलेले अनेक श्री. कृ. कोल्हटकर, द्वारकेचे शंकराचार्य, संकेश्वरचे शंकराचार्य, बापूसाहेब आंबेकर, ज. स. करंदीकर, आचार्य अत्रे यांसारख्या मान्यवरांशी त्यांचे झालेले बौद्धिक अटीतटीचे वाद, पुण्याच्या वसंतव्याख्यानमालेच्या चिटणीसपदाच्या जबाबदारीतून केलेले नवनवीन उपक्रम साहित्यपरिषदेतील त्यांचे भरीव कार्य– कोशवाङमयाच्या उभारणीसाठी निधिसंकलन– विष्णुशास्त्री चिपळूणकर सभागृहाची उभारणी, वाङमयेतिहासाची अकरा खंडांची भव्य (पुढे बारगळलेली) कल्पना अशा अनेक गोष्टी, त्यांना मिळालेला सांगली येथील संमेलनाच्या अध्यक्षपदाचा बहुमान, त्यांनी आपल्या अभिनव व कल्पक धारणांमधून केलेले 'केसरीप्रबोध' सारख्या कोशग्रंथाचे संपादन व ते करताना दाखविलेला आटोप, महाराष्ट्र सांवत्सरिक, हिंदुत्वकोश, केळकरग्रंथ, हिंदुसमाजदर्शन, विज्ञानबोध आदी ग्रंथांचे केलेले साक्षेपी संपादन, 'रोहिणी' मासिकाचे संपादन-संचालन वयाच्या पन्नाशीनंतर निर्माण केलेले उत्कृष्ट कथावाङमय अशा विविध उपक्रमांतून त्यांची सत्यदर्शनाची व समाजप्रबोधनाची उत्कट ऊर्मी आपल्याला दिसून येते.

या साऱ्या जीवनक्रमातून वा त्यातून निर्माण झालेल्या साहित्यातूनही माटयांच्या व्यक्तिमत्त्वातील अनेक ठळक वैशिष्टयांचा प्रत्यय येत राहतो. शुद्ध बुद्धिवाद व उत्कट भावनात्मकता, प्रखर विज्ञाननिष्ठा व विनम्र, सश्रद्ध अस्तिक्यभाव, प्रपंचाबद्दलचा रसिला, जिवंत लोभ व त्याचबरोबर आपल्याबरोबर इतरांचेही जीवन आनंदमय सुंदर बनविण्याचा स्वतःच्या पलीकडे जाणारा, सुखवादापासून वाचविणारा व्यापक समाजाभिमुख दृष्टिकोण, स्वतःच्या बुद्धिनिश्चयाबद्दलचा अविचल आत्मविश्वास परंतु त्याचबरोबर स्वतःच्या कर्तृत्वाबद्दलची आत्यंतिक विनम्रता व उदात्त निवृत्ती, अढळ तत्त्वनिष्ठा व वास्तवतेच्या भानातून आलेला व्यवहारवाद अशा अनेक समतोल ताणांतून विणले गेलेले हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे

अनुपम वस्त्र फिरत्या रंगाच्या वस्त्रासारखे मनाला मोहवत राहते. त्यांच्या साहित्याची निर्मिती त्यांच्या अशाच व्यामिश्र व्यक्तिमत्त्वातील अनेक प्रवृत्तींच्या स्वयंभू स्फुरणातून होत गेली आहे.

माटयांच्या समग्र वाङमयाचा एवढ्या मर्यादेत तपशिलाने परिचय करून देणे अशक्य आहे. काही सूत्र लक्षात घेऊनच हे काम शक्य होईल. त्या दृष्टीने माटयांच्या वैचारिक वाङमयाचा एक भाग, प्राचीन मराठी वाङमयाचा अभ्यास, ललित वाङमय व माटयांचा साहित्यविचार व्यक्त करणारे लिखाण हा दुसरा भाग व माटयांनी लिहिलेली चरित्रे हा तिसरा भाग अशा गटवारीतून हा समग्र विचार आटोपशीरपणे करता येईल. त्याचप्रमाणे माटयांच्या वाङ्मयातील शाश्वत गुणवत्तेचा– त्यांच्या शैलीचा विचारही या समग्र वाङमयाच्या पार्श्वभूमीवर नंतर करता येईल.

पहिल्या भागात माटयांचे अनुभूतिजन्य समाजचिंतन त्यांच्या 'अस्पृष्टांचा प्रश्न', 'अस्पृश्य विचार' अशा ग्रंथांतून व्यक्त होते. अस्पृश्यतानिवारणाचा जो ध्यास त्यांनी घेतला त्यामधून आपल्या कार्याला शास्त्रशुद्ध सैधान्तिक बैठक देण्याच्या प्रेरणेतून त्यांनी समाजशास्त्रीय चिंतन केले आहे. हिंदुसमाजरचनेचा अत्यंत सूक्ष्म वास्तववादी, विचक्षण असा समाजशास्त्रीय धांडोळा घेण्याचा प्रयत्न केला आहे. अस्पृश्यतेचा उगम, स्वरूप, इतिहास व एकरस समाजजीवनासाठी अस्पृश्यता निवारण्याचा उपाय अशा विविध टप्प्यांतून त्यांनी विचार मांडलेला आहे. तत्कालीन अनेक समाजशास्त्रज्ञांच्या विचारांचा परामर्श घेऊन स्वतःचे स्वतंत्र चिंतन त्यांनी व्यक्त केले आहे. मूलतः हा प्रश्न वंशशुद्धीच्या जपणुकीच्या भावनेशी भोगवृत्तीचा स्वार्थी संकर झाल्याने निर्माण झाला आहे हे त्यांनी परखडपणे सांगितले आहे आणि वंशशुद्धीचा आग्रह ही जागतिक प्रवृत्ती आहे. परंतु त्यासाठी अस्पृश्यता पाळण्याची यत्किंचितही आवश्यकता नाही हेही त्यांनी स्पष्ट केलेले आहे. प्राचीन हिंदुसमाजरचना शास्त्राने या प्रवृत्तीवर मात करून एकरस-समाजजीवन निर्माण करण्याचा जो एक असामान्य विधायक प्रयोग अनेक वंशीय समाजातून सिद्ध केला त्याचा माटयांनी गौरवच केला.

या तात्त्विक शास्त्रीय उपपत्तीच्या विचारावरोबरच या प्रश्नाच्या उकलीच्या दृष्टीने अत्यंत व्यवहारवादी, वास्तववादी व समन्वयवादी अशी अनेक सूत्रे त्यांनी मांडली आहेत. त्यावरून त्यांचे समाजसुधारणेचे एकूण तत्त्वज्ञान स्पष्ट होते.

ग्रंथाच्या शेवटच्या भागात आपल्याला या काळात आलेले अनेक हृद्य व प्रबोधक अनुभव त्यांनी सांगितलेले आहेत. हा ग्रंथ म्हणजे माटयांच्या चिंतनातील तत्त्व आणि व्यवहार या दोन्ही अंगांचे समग्र दर्शन घडविणारा ग्रंथ ठरला आहे.

माटयांनी 'परशुराम चरित्रा'च्या निमित्तानेही हिंदु-समाजरचनेच्या तत्त्वाची सूक्ष्म चिकित्सा करून हिंदुसमाजाच्या जडणघडणीचा वेध 'पंचमानव हिंदुसमाज' म्हणून घेण्याचा प्रयत्न केला आहे.

विज्ञानबोधाला लिहिलेल्या प्रदीर्घ प्रस्तावनेत आधुनिक काळातील समाजजीवनातील मूल्यांतराची– विज्ञाननिष्ठेच्या जोपासनेची आत्यंतिक आवश्यकता अतिशय घसघसून प्रतिपादिलेली दिसते. मुळात विज्ञानबोधाची संकल्पनाच अतिशय भव्य व त्यांच्या प्रगाढ विज्ञाननिष्ठेची द्योतक होती. 'घरचे वारेच वदलले पाहिजे' हे त्यांचे आधुनिक काळाच्या दृष्टीने कळकळीचे आवाहन होते. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनात विज्ञाननिष्ठेचा इतका झडझडून पुरस्कार स्वा. सावरकरांव्यतिरिक्त माटयांशिवाय अन्य कोणीही केलेला नाही.

या वैचारिक प्रबंधात्मक लिखाणाबरोबरच साहित्यधारा, साहित्यमंजिरी विचारगुंफा, विवेकमंडन, विचारशलाका, विचारमंथन अशा संग्रहांतून संग्रहीत झालेले सर्व लेख व विविध नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊन असंग्रहीत राहिलेले सुमारे १५० लेख या साऱ्या स्फुटलेखनातून जीवनाच्या अनेक अंगांवर, विभिन्न मानवी प्रवृत्तींवर, अनेक व्यक्तिविशेषांवर शुद्ध तात्त्विक व व्यावहारिक अशा दुहेरी दृष्टिकोनांतून त्यांनी अनेक प्रकारचे विचार व्यक्त केले आहेत. नीतिविचारातील सामाजिकता, नीतिविचाराशी पापपुण्याचा काही संबंध नाही व तिला पारमार्थिक मूल्यही नाही, भूतदयेच्या भावनेत आंतरिक विसंगती आहे, अशा प्रकारच्या रूढ समजुतींना धक्का देणारे पण स्वतंत्रबुद्धीने तर्कशुद्धतेने मांडलेले अनेक विचार या विचारधनात व्यक्त झालेले आहेत. मानवी व्यक्तिमत्वातील 'शुभाशुभाचा काला' व त्यामुळे जाणवणारी व्यामिश्रता, बुद्धिवादी श्रद्धेचा आग्रह, तत्त्व आणि व्यवहार यांचा सुयोग्य विवेक अशा अनेक विषयांवर त्यांनी केलेल्या चिंतनात त्यांचा सामा-

जिक दृष्टिकोण, तर्कशुद्ध बुद्धिवाद व्यवहार, संकेतरहित सत्यान्वेषणाची उत्कट ऊर्मी, प्रापंचिक प्रवृत्तींचा जिवंत लोभ अशा अनेक पैलूंचा प्रत्यय येत राहतो. 'नीतीची बदलती प्रकृती', 'माझी भूतदया', 'कसली रे मेल्या सहानुभूती?', 'देव तेथेचि जाणावा', 'भूतकाळच्या पारंब्या', 'मोठ्या लोकांची खाजगी चरित्रे', 'घोषणांचा जाच', 'श्रद्धासरितेची गंगोत्री', 'गैरसमजांचा पाठलाग', 'कवीचा न्याय', 'माझ्या राजेश्वरा', अशा कितीतरी निबंधातील मार्मिकता यादृष्टीने नजरेत भरते.

माटचांच्या धर्म आणि परमार्थ विचारालाही सामाजिक जाणिवेचे अधिष्ठान आहे. परमार्थविचाराचे सावट आपल्या परंपरेत जीवनावर का यावे हे तपासून पाहण्याची वृत्ती, प्रपंचाचा उदंड लोभ असल्यामुळेच त्यांच्या मनात उत्पन्न होते. निवृत्तीचा विचार, कर्मवादाची कठोर चिकित्सा, ते याच भूमिकेतून करतात. प्रवृत्तिपरता आणि पारमार्थिकता, यांचे मोठे मनोज्ञ मिश्रण माटचांच्या व्यक्तिमत्त्वात दिसून येते. 'गीतातत्त्वविमर्श या संग्रहातील लेख व त्यांचे अशाच प्रकारचे अन्य लिखाण, यामध्ये त्यांनी अध्यात्माचा जो डोळस वेध घेतला आहे त्यावरून आध्यात्मिकतेलाही शास्त्रकाट्याची कसोटी लावण्याची जागरुकता दिसते. या संदर्भात सामाजिक दृष्टीने लिहिलेले 'मम तेजोऽशसंभवम्', 'चातुवर्ण्य मया सृष्टम्', 'संभवामि युगे युगे', असे लेख; 'नीती आणि आश्वासन', 'कर्मकटकट' अशा अनेक लेखांतून गीतेतील विवेचनातील तार्किक फटी दाखविण्याचा प्रयत्न, यांमधून केलेली पारंपरिक अध्यात्मविचाराची व धर्मकल्पनांची मार्मिक चिकित्सा लक्षात येते. 'हे विराट रूपदर्शन कसे?', 'मानुषी संपत्तीला स्वतंत्र स्थान हवे' अशांसारख्या लेखातून त्यांचा मानव्याच्या प्रवृत्तिपरतेबद्दलचा जिव्हाळा व्यक्त होतो, तर 'दैवं चैवात्र पंचमम्'-सारख्या लेखात मानवी कर्तृत्वाच्या अनाकलनीय मर्यादांचा वेध घेण्याचा प्रयत्न दिसतो.

हे सर्व परमार्थचिंतन एका बाजूला, सर्वसंगपरित्याग करणाऱ्या मनाच्या आवेगातून निर्माण झाले नाही, तसेच ते केवळ बुद्धीची खुमखुमी जिरविण्यासाठी निर्माण झालेले ज्ञानमूलक (academic) चिंतनही नाही. तर संसार यशस्वी करण्याच्या आड येणाऱ्या निवृत्तीची चिकित्सा करण्याच्या व्यवहारवादी भूमिकेतून झालेले आहे. म्हणूनच एक ना एक दिवस, विज्ञानाच्या प्रगतीमुळे परमात्मतत्त्वही गोचरतेच्या कक्षेत आणून सोडता येईल असा विश्वासही माटचांनी व्यक्त केला आहे.

उत्तर आयुष्यात विशेषत: 'रोहिणी' चे संपादक म्हणून माटचांनी राजकीय लिखाण केले त्यातही प्राधान्याने त्यांचा समाजशास्त्रीय दृष्टिकोण दिसून येतो. पाकिस्ताननिर्मिती, अरब-इस्राइल संघर्ष, अमेरिकेतील निग्रोंचा प्रश्न हे राजकीय प्रश्न नसून मूलत: सांघिक प्रश्न आहेत व त्यामागे समाजधारणेचे काही अटळ संकेत आहेत हे वास्तववादी दृष्टीने त्यांनी आवर्जून सांगितले आहे.

सोयीसाठी कल्पिलेल्या माटचांच्या वाङ्मयाच्या दुसऱ्या भागात त्यांनी केलेला प्राचीन मराठी वाङ्मयाचा अभ्यास मोडतो. त्यात प्राधान्याने त्यांच्या 'संत, पंत आणि तंत' या स्फुटलेखसंग्रहाचा व 'रामदासांचे प्रपंचविज्ञान' या व्याख्यानांच्या संग्रहग्रंथाचा विचार करावयाचा आहे.

माटचांचा संतवाङमयाबद्दल सश्रद्ध जिव्हाळा बालपणापासूनच विकसित झालेला होता. परंतु येथेही सश्रद्धतेचे अकारण ओझे त्यांच्या चिकित्सावृत्तीवर त्यांनी येऊ दिलेले नाही. संतवाङ्मयाचेमुद्धा सामाजिक दृष्टीने परिशीलन करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. संतवाङ्मयाच्या अभ्यासातील योग्य त्या प्रमाणांच्या विविध अडचणींचा त्यांनी एका लेखात उल्लेख केला आहे. पण त्यांच्या मार्मिक विश्लेषणाने ही अडचण फारशी मध्ये येत नाही.

स्त्रीशूद्रपापयोनी अंत्यज यांच्याबद्दलच्या मूळ गीतेतील नवव्या अध्यायातील उल्लेखापेक्षा अधिक व्यापक जातिविषयक उदारतेचा दृष्टिकोण श्री ज्ञानेश्वरांनी या श्लोकावरील भाष्यात मांडला आहे, हे त्यांनी सामाजिक दृष्टीने दाखवून दिले आहे. आध्यात्मिक निरामयतेच्या पातळीवर वावरणाऱ्या संतांनी सामाजिक विषमतेची जाचणूक व्यक्त करायला संकोच केलेला नाही. हे माटचांनी 'तुकारामाच्या मनाचे दुखणे', 'महार संतांच्या मनाचे दुखणे' अशा लेखांतून परखडपणे स्पष्ट केले आहे. याच दृष्टीने एकनाथांच्या भारुडांचा सामाजिक आशय ते उकलून दाखवितात व पंतकाव्याची दुर्बोधिता व त्याची सामाजिक मीमांसाही ते याच दृष्टीने करतात. श्रीकृष्णचरित्राकडे पाहण्याच्या भागवतकारांच्या वृत्तीचा त्यांनी केलेला निषेध व त्या पार्श्वभूमीवर

मराठी संतांच्या श्रीकृष्णचरित्राबद्दलच्या दृष्टिकोणाचा गौरव त्यांच्या याच चिकित्सावृत्तीचा द्योतक आहे.

ज्ञानेश्वर व नामदेव यांचे अलौकिक सख्यत्व आणि ज्ञान—भक्तीची परस्परपूरकता माटे अत्यंत समरसतेने रंगवितात तर तुकारामाचे सामान्य प्रापंचिक जीवनातून आकाशाएवढे झालेले व्यक्तिमत्त्व ते स्तिमित नजरेने न्याहाळतात. रामदास संतमंडळात स्वतःच्या प्रवृत्तीवर प्रपंचवादामुळे कसा वेगळा उठून दिसतो ते स्वतःच्या प्रवृत्तिवादाच्या लोभातून घसघसून सांगतात, तर संतांच्या व्यक्तिमत्त्वातील मानसिक जाचणूक 'संतवाङ्मयातील रांडापोरे' या सारख्या परखड लेखात प्रभावीपणे मांडतात. 'दासी जनीचे यथारूप दर्शन' सारख्या लेखातून संतांच्या जीवनातील अद्भुताचा व चमत्कारांचा अन्वय लावताना संतांच्या मनातील उत्कट ध्यासाचा मानसशास्त्रीय व्यापार प्रकट करतात.

प्राचीन मराठी वाङ्मयातील अशा अनेक विषयाच्या परामर्शात त्यांचा तर्कशुद्ध बुद्धिवाद व उदार रसिकता, सश्रद्ध आस्तिक्यभाव व सामाजिक दृष्टी दिसून येते.

'पांडुरंगाचे स्थलांतर व पुंडलिकाचे रूपांतर' अशा काही लेखांतून माटयांची संशोधनचिकित्सा दिसतेच पण मंदिर प्रवेशाच्या प्रश्नाच्या अनुषंगाने काही सामाजिक दृष्टीही त्यातून व्यक्त होते.

माटे कथावाङ्मयाकडे वयाच्या पन्नाशीनंतर वि. श्री. मोडकांसारख्या त्यांच्या प्रौढ जाणत्या विद्यार्थ्यांच्या आग्रहावरून वळले. लघुकथेच्या तंत्राविषयीच्या अनभिज्ञतेमुळे त्यांची वृत्ती विनम्र होती. परंतु अत्यंत उत्कट संवेदनशीलता, व्यापक व सूक्ष्म सामाजिक निरीक्षण, मानवी व्यक्तिमत्त्वाची व जीवन व्यवहाराची अचूक जाण, आकर्षक कथनात्मकता या साऱ्या वैशिष्टयांमुळे त्यांच्या कथा म्हणजे अतिशय मार्मिक असे जीवनभाष्याचे कलात्मक नमुने ठरतात. हे सारे कथावाङ्मय 'उपेक्षितांचे अंतरंग', 'माणुसकीचा गहिवर', 'अनामिका', 'भावकथा', 'भावनांचे पाझर', 'भावनांची मांडणी' अशा संग्रहातून संग्रहित झालेले आहेत. तथाकथित तंत्रवादाचे ओझे न बाळगता माटयांनी आपल्या मनात दाटून राहिलेल्या वैशिष्टयपूर्ण अनुभूतिविश्वाला शब्दरूप देण्याचा प्रयत्न केला व आपोआप त्यांचे स्वतःचे असे जाणीवरहित कलात्मक तंत्र बनून गेले. त्यांच्या अनुभूतीतील उत्कट उमाळा व सहेतुकतेतून आलेली तळमळ हीच या ठिकाणी रसपदवीला जाऊन पोचते.

साधारण कलावंताच्या बाबतीत न आढळणारा ध्येयवाद, वास्तवता व कलात्मकता यांचा अतिशय मनोज्ञ संगम त्यांच्या कथाविश्वात दिसून येतो. चित्रमय प्रत्ययकारी प्रसंगनिर्मिती, भावनिर्मितीला पोषक अशी वातावरणनिर्मिती, अत्यंत ठसठशीत जिवंत व्यक्तिचित्रे, त्यांच्या मनोविकारांचे अत्यंत सहृदय सूक्ष्म चित्रण, क्वचित नाटयमयता धारण करणारे संवादकौशल्य, अत्यंत कुशल कलात्मक कथनपद्धती अशा अनेक वैशिष्टयांमुळे त्यांच्या 'बन्सीधर तू आता कुठे रे जाशील ?' तारळखोऱ्यातील पिऱ्या, सावित्री मुक्यानेच मेली, माणुसकीचा गहिवर, सगाजीबोवा कशाचा संसार, शेवंतीचा खराटा इत्यादी अनेक कथा रसिकांच्या जिवाचा ठाव घेतात.

माटयांनी केलेला 'पश्चिमेचा वारा' हा कादंबरीलेखनाचा प्रयत्न मात्र अगदीच सामान्य ठरला. त्यांच्या मनातील समाजपरिवर्तनाची प्रमेये, विज्ञानबोधाच्या प्रस्तावनेतील अनेक सूत्रे कथेच्या सांगाडयात बसविण्याचा अट्टाहास या ठिकाणी दिसतो. स्वतःच्या मनातील उद्बोधनाच्या हेतूचे ओझे, चिकित्सादृष्टीच्या आवश्यकतेची नसती जाणीव, कलात्मक अनुभूतीचा अभाव, कथावस्तूच्या संकल्पनातील अनिश्चितता व वाङ्मयीन घाटाविषयीची अनभिज्ञता अशा अनेक मर्यादांमुळे ही कादंबरी म्हणजे एक वाया गेलेले वाङ्मयीन धाडस होते असे नाइलाजाने म्हणावे लागते.

माटयांच्या ललित निबंधांमध्ये मात्र कलावंताची आत्मनिष्ठा, जीवनभाष्यकाराची भूमिका आणि कलात्मक सौंदर्यदृष्टी यांचा मनोज्ञ संगम दिसतो. अर्थात येथेही 'लघुनिबंध तंत्र आणि मंत्र' अशा ठरीव निकषांवर त्या निबंधाचा विचार करता येत नाही. कारण माटयांना स्वतःलाही लेखनतंत्राची जाणीव नाही. परंतु लघनिबंधाचे हे सत्त्व मात्र 'माझी विद्वत्ता' 'लहानलहान वशीकरणे', 'गैरसमजाचा पाठलाग', 'माझी भूतदया', 'उद्यानातील माझा मित्रपरिवार', 'पहिला वसंत', 'देवाचे खरे लाडके कोण', 'स्वर्गातील महाराष्ट्र साहित्य संमेलन', 'अडगळीची खोली'; 'माझे मनोराज्य' अशा अनेक निबंधातून उत्कटपणे व्यक्त होते.

अशा प्रकारचे उत्कृष्ट ललितसाहित्य निर्माण करूनसुद्धा माटयांचा साहित्यविचार अगदीच सामान्य पातळीवरचा, जुजबी स्वरूपाचा व सवंग वाटतो याचे कारण

'ललितवाङ्मय' हा त्यांच्या चिंतनाचा विषय कधीच नव्हता. समाजसेवा व समाजप्रबोधन हाच त्यांच्या जीवनाचा अखंड ध्यास होताच पण एकूण ललित-वाङ्मयाच्या वाचनाचा त्यांना कंटाळा होता हेही त्यांनी एके ठिकाणी स्पष्ट केले आहे. वास्तविक वाङ्मयाच्या अध्यापनाचे कार्य करणाऱ्या व साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद भूषविणाऱ्या साहित्यिकाच्या बाबतीत अधिक सखोल अशा वाङ्मयीन जाणिवांनी व्यक्त होणारी डोळस वाङ्मयीन दृष्टी दिसावी अशी स्वाभाविक अपेक्षा असते. सलगतेने व्यक्त झालेला वाङ्मयीन विचार म्हणून 'रसवंतीची जन्मकथा' हा प्रबंध वादग्रस्त म्हणून त्याहीवेळी गाजला होता. काव्याच्या अस्तित्वाच्या समर्थनाच्या दृष्टीनेच अगदी मुळातून काही प्रश्न त्यांनी उपस्थित केलेले आहेत. रसात्मकतेच्या ऐवजी गेयता हेच काव्याचे व्यवच्छेदक लक्षण करण्याचा अट्टाहास या सर्व चर्चेत दिसून येतो. याशिवाय प्रबंधाच्या रचनेत बाळबोध सवंग विधाने, प्रमेय, पाल्हाळ, पुनरुक्ती, रचनेचा अभाव अशा अनेक मर्यादा जाणवतात.

एकूण काव्याबद्दलची संवेदनक्षमता माटयांच्या व्यक्तिमत्त्वात व्हावी तशी विकसित होऊ शकली नव्हती हे त्यांच्या बालकवींच्या संग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेवरूनही दिसून येते. बालकवींच्या निराशेला त्यांनी रोगट प्रवृत्ती म्हणून निकालात काढले आहे. विस्तारभयास्तव त्यांच्या साहित्यदृष्टीची मर्यादा दाखविणारी अधिक उदाहरणे देता येत नाहीत.

समाजप्रबोधनाच्या जाणिवेत केलेले चरित्रलेखन हा माटयांच्या वाङ्मयातील तिसरा भाग—अर्थात—चरित्रलेखनासाठी आवश्यक ती साधनांची जुळवाजुळव करून संशोधन करून चरित्र लिहिण्याची भूमिका माटयांची नाही; तर स्वतःला जीवनादर्श ठरलेल्या प्रवृत्तीचे व व्यक्तिविशेषांचे नमुने उपलब्ध माहितीच्या आधारे समाजापुढे मांडावेत एवढीच भूमिका आहे व त्यात त्यांच्या मनाचे कल स्पष्ट होतात. त्यामुळे बऱ्याचदा त्याला शालेय रूप प्राप्त होते. 'आदर्श स्त्रीपुरुष' 'आधुनिक सुधारक', 'कर्तबगार स्त्रिया', 'पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ', 'बारा शास्त्रज्ञ', 'जगाचे प्रवासी' ही पूर्ण चरित्रे व 'प्रेमिकांना आहेर' व 'आपापले हितगुज' हे आत्मचरित्रातील उतारे यातून त्यांनी ही चरित्रे लोकांसमोर ठेवण्याचा प्रयत्न केला.

याप्रमाणे माटयांच्या वाङ्मयाचा अगदी सूत्ररूपाने स्थूल परिचय करून घेतल्यानंतर या वाङ्मयातील चिरंतनमूल्याचा परामर्श घेणे सोयीचे होईल. प्रत्यक्ष माटयांच्या वाङ्मयातील विचारधन, अनुभूतिविश्व यामध्ये सहेतुकतेमुळे, प्रबोधनाच्या प्रेरणेमुळे बऱ्याचवेळी काही एकदेशीयता वा तात्कालिकता असू शकते. परंतु माटयांची लेखनशैली मात्र मराठी वाङ्मयाचा चिरंतन ठेवा आहे असे वाटते. भव्यतेचा, उत्कटतेचा ध्यास, मनःपूर्वकता, प्रतिपाद्याविषयीची श्रद्धा व आत्मविश्वास, शिक्षकाचे व्रत, वैपुल्याची हौस, व्यक्तिमत्त्वातील राकट रगदारपणा अशा अनेक पैलूंचे प्रतिबिंब माटयांच्या लिखाणात दिसून येते. यातून होणारी अभिव्यक्ती ही सायासहीन व स्वाभाविक सौंदर्य लेवून आलेली असते. सांकेतिक तंत्राची जाणीव या ठिकाणी लवमात्र नाही. रानचे मोकळे वारे पिऊन भरारून आलेल्या एखाद्या खेडवळ तरुणीचे अंगांगातून उतू जाणारे प्रसाधनहीन अकृत्रिम सौंदर्य मनाला मोह पाडते तशी माटयांची असंस्कारित शैली मनाला जाऊन भिडते. व्यक्तिमत्त्व आणि शैली यांचा इतका अटळ संबंध अन्यत्र क्वचितच आढळेल. त्यांच्या लिखाणातील विचारांची सुस्पष्टता, प्रतिपाद्य विषयाबद्दलचा जातिवंत उमाळा, मनःपूर्वकतेतून येणारा अभिनिवेश व त्यातून क्वचित डोकावणारा उपरोध, वैचारिकतेला प्राप्त होणारी समूर्तता, चेतनोक्तीचा केलेला अतिशय मार्मिक हृद्य उपयोग, वर्णनातील चित्रमयता, उत्कट भावनिर्मितीतून निर्माण होणारी रसवत्ता, जिवंत ठसठशीत व्यक्तिचित्रण, वातावरणनिर्मिती, संवेदनात्मक सत्याचे गोचर वर्णन, गोचर प्रतिमा निर्माण करण्यातील कलात्मकता, वक्तृत्वपूर्णता, प्रश्नार्थक वाक्यांची लयबद्ध मालिका, मिस्किलपणा, उपरोध उपहास, विनोद, खास 'माटेपण' व्यक्त करणारी शब्दकळा या साऱ्या वैशिष्ट्यांतून माटयांच्या शैलीचे आगळेपण ध्यानात येते.

या शैलीची पूर्वपरंपरा शोधता येत नाही व तिला वारसही लाभलेले नाहीत. प्रज्ञेच्या, प्रतिभेच्या स्वयंभूपणातून माटयांच्या शैलीलाही स्वयंभूपण प्राप्त झाले आहे.

माटयांच्या व्यक्तिमत्त्वाचा व वाङ्मयाचा सूत्ररूपाने परिचय करून घेतल्यानंतर त्यांचे महाराष्ट्राच्या सांस्कृ-

तिक जीवनातील व मराठी वाङ्मयातील स्थान निश्चित करता येईल.

तसे पाहिले तर माटे हे मराठी समाजात व वाङ्मयातही मोठे वादग्रस्त ठरलेले व्यक्तिमत्त्व होते. परंतु त्याचे कारण त्यांच्या सर्वांगीण व्यक्तिमत्त्वाचे सत्त्व समजावून घेण्याचा प्रयत्न फारसा कोणी जिव्हाळ्याने केला नाही. स्वतःच्या बुद्धिनिश्चयातून आलेल्या स्वमताच्या आग्रहामुळे व सार्थ आत्मप्रत्ययामुळे माटयांच्या व्यक्तिमत्त्वालाही काही अग्र प्राप्त झाले होते. काहीसा उग्र रासवटपणा प्राप्त झाला होता. पण त्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न केला तर लक्षात येते की या कठीण कातळामागे माणुसकीचा जातिवंत उमाळा होता. म्हणूनच समाजसुधारक म्हणून माटयांचे महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनात अनन्यसाधारण स्थान होते. माटयांच्या पूर्वीच्या सुधारकांचे तत्त्वज्ञान प्राधान्याने पाश्चात्य उदारमतवादी विचारसरणीवर आधारलेले होते. माटयांचा समाजविचार हा वास्तवाच्या अचूक भानातून आलेला व्यवहारपूत असा होता— म्हणून माटयाना कोणी समाजशास्त्रज्ञ म्हणण्यास तयार नसे— व त्यांना लोक 'सनातनी सुधारक' म्हणत असत. बोलक्या सुधारकांच्या परंपरेत प्रत्यक्ष झाडू हातात घेऊन समाजाची साफसफाई करणारा कृतिवीर सुधारक म्हणूनही माटयांचे स्थान वैशिष्टयपूर्ण आहे. 'समाजसुधारक माटे' हा एका स्वतंत्र लेखाचा विषय असल्याने येथे एवढाच उल्लेख करणे शक्य आहे.

विज्ञाननिष्ठेचा व वैज्ञानिक जीवनदृष्टीचा अतिशय जिव्हाळ्याने पुरस्कार हे माटयांचे महाराष्ट्रसंस्कृतीतील आणखी एक वैशिष्टय. स्वा. सावरकरांचा पूर्वी उल्लेख केला आहेच. द. के. केळकर, डॉ. पु. ग. सहस्त्रबुद्धे, अशी नंतरची काही नावे दिसतात.

मराठी निबंध-वाङ्मयाला तर माटयांनी आशयाच्या कसदारपणामुळे व आपल्या खास शैलीने वैशिष्टयपूर्ण वळण दिले. १९३५ च्या पुढील निबंधकारांमध्ये, प्रदीर्घ वैचारिक निबंधाची परंपरा क्षीण होऊ पाहत असताना, जुन्या निबंधातील विचारधनाचा गाभा कायम ठेवून लालित्यपूर्ण शैलीने वैचारिक निबंधही ललितनिबंधाइतका हृद्य आकर्षक करण्याचे माटयांचे श्रेय अद्वितीय होते. विशेष म्हणजे माटयांच्या शैलीप्रमाणेच या निबंधालाही पूर्वज नव्हता व त्याचा वारसाही दाखविता येत नाही.

'झंकार'मधून प्रसिद्ध झालेल्या कथांमुळेही माटयांचे वाङ्मयाच्या क्षेत्रातील आगळे स्थान निश्चित झाले. 'दलित वाङ्मय' हा शब्दही निर्माण झाला नव्हता, त्या वेळी माटयांनी पददलितांची वेदना व्यक्त करणारी 'उपेक्षितांचे अंतरंग' उकलून दाखविणारी कथा लिहिली. माटयांच्या विशाल सहानुकंपाला प्राप्त झालेली रसपदवी मराठी वाङ्मयात या अर्थाने नवीन पर्व सुरू करणारी ठरली असे म्हटल्यास वावगे ठरू नये. माटयांच्या शैलीतील खास 'माटेपणा'बद्दल पूर्वी उल्लेख केलेला आहेच.

असे हे माटयांचे संमिश्र परंतु समृद्ध असे व्यक्तिमत्त्व व तितकेच विविधांगी वाङ्मय अनेक अर्थांनी वैशिष्टयपूर्ण, क्वचित अद्वितीय ठरेल असे आहे. समाजप्रबोधनाच्या लोकशिक्षकाच्या भूमिकेतून निर्माण झालेल्या त्यांच्या जीविताच्या प्रचंड व्यापाचे मुखर स्वरूप म्हणजे त्याचे वाङ्मय आहे. सहृदयतेच्या अत्यंत स्वाभाविक उमाळयातून निर्माण झालेल्या समाजहितैषी बुद्धीतून स्वतःच एक प्रचंड संस्था बनून राहिलेल्या महाराष्ट्राच्या समाजजीवनातील व मराठीवाङ्मयातील या उस्तादाच्या व्यक्तिमत्त्वाची निःश्वसितेच आपल्याला त्याच्या वाङ्मयात दिसून येतात. मरेपर्यंत ही भूमिका माटयांनी निष्ठेने अवलंबिली. एवढा खंदा लेखक पण पुढे क्षीणतेने डोळे, हात काम करीनात. म्हणून लेखक ठेवले तर शेवटी आवाजानेही दगा दिला. एवढा मैदानी वक्ता परंतु कॅन्सरच्या रोगाने आवाज बंद झाला. तरीही त्यांना लोकांना काहीतरी सांगण्याची तळमळ कायम होती. दत्तप्रसन्न काटदरे यांना मृत्यूपूर्वी जी एक कविता त्यांनी निरोपादाखल पाठविली आहे. त्याच्याआधी चार ओळींचे छोटे पत्र आहे. त्यात ते म्हणतात, "आवाज गेला आहे. आता लेख सांगणे अशक्य. क्षमा असावी. झाले ते करून घेतलेत हे महदुपकार. सोबत 'शेवट'चे धाडले आहे. मी दिवंगत झाल्यावर छापावे."

आयुष्याच्या अंतकाळीसुद्धा समाजाचे ऋण मानण्याची भूमिका व ते ऋण फेडता येत नाही या भावनेने येणारी मनाची व्याकुळता पाहिली की परिस्थितीतील कारुण्य जाणवते व आपण 'माटे मास्तरां'पुढे विनम्र होतो.

■

# श्री. म. माटे यांचा विज्ञानबोध / प्र. न. जोशी

**बौद्धिक कार्याचा प्रचंड आखाडा**

ऐनपणात असताना श्री. म. माटे यांनी सामुदायिक रीतीने प्रचंड प्रमाणावर बौद्धिक कार्याचा जो प्रचंड व्याप आखला होता, आखाडा घातला होता, तो पाहता नवल वाटते. आज विद्यांचा अभ्यास विविध शाखांतून वाढत गेला आहे. नवीन साधने उपलब्ध होत आहेत, अनुदाने थोड्याफार प्रयत्नाने मिळत आहेत. इतरत्रही पैसा मुबलकपणाने मिळण्यासारखा आहे. कामे करण्याची मनात हौस असणाऱ्यांची संख्याही मोठी आहे. तरीही मनासारखी कामे होत नाहीत, ती वेळेवर होत नाहीत, पैसा खर्च होतो, चर्चासत्रे होतात, पण कामे मात्र रेंगाळत राहातात; असा आजचा सार्वत्रिक अनुभव आहे. परंतु परिस्थिती प्रतिकूल असताना श्री. म. माटे यांनी सामुदायिक वा सहकार्याने करावयाच्या कामांचा एवढा मोठा उद्योग आरंभिला की, तो पाहून मन चकित होते. अस्पृश्यता निवारणाचे कार्य, त्यासाठी महारमांग-वाड्यात रात्रीच्या शाळा स्वतःचा पैसा खर्च करून चालविणे, महार माटे, अशी निंदा सहन करणे, महात्मा गांधींना आवाहन देणे, समाजविचारमंडळ स्थापन करणे, महादेव, परशुराम, हिंदुसमाज यांची शास्त्रीय चिकित्सा करणे, केसरी प्रबोधनाच्या निमित्ताने विचार-धनाची वेरीज करणे, अस्पृष्टांचा प्रश्न हा ग्रंथ तयार करणे, केळकर गौरवग्रंथ सिद्ध करणे; येथपासून ते अश्लील व हीन रुचीची नाटके उधळून लावण्यापर्यंतचे प्रयत्न माटे यांनी मोठ्या धडाडीने व शिताफीने केले.

**सांवत्सरिक व विज्ञानबोध**

'विज्ञानबोध' हा असाच एक त्यांचा आजही उद्-बोध वाटेल असा प्रौढ वाङ्मयीन प्रकल्प आहे. याआधी त्यांनी 'महाराष्ट्र सांवत्सरिक' नावाचा एक ग्रंथ लो. टिळक यांच्या स्मृतीसाठी प्रसिद्ध केला. याही महत्त्वाच्या ग्रंथाची शास्त्रशुद्ध मांडणी पाहण्यासारखी आहे. रॉयल आकाराची सुमारे हजार पृष्ठे छापून माटे यांनी हा संदर्भग्रंथ १९३३ साली तयार केला. हा वार्षिक ज्ञान-संग्रह असाच प्रतिवर्षी तयार व्हावा, अशी त्यांची उमेद होती. महाराष्ट्र, संस्थाने, चरित्रे, विविधसंस्था, आर्यांची संस्कृती, जातींचा परिचय, पाश्चात्य राजकीय परि-स्थिती, समाजस्थिती, कालगणना, सरकारी खाती, भौगोलिक माहिती, उद्योगधंदे, सहकारी पतपेढ्या, विमा-व्यवसाय, नाना प्रकारचे नकाशे, धर्मव्यवहार; इत्यादी अनेक विषयांनी समृद्ध असा हा ज्ञानकोशच संक्षेपाने म्हणावयास हवा.

याच सुमारास माटे यांनी 'विज्ञानबोधा'चा प्रकल्प उभारला व तो सहकारी विद्वानांच्या मदतीने जिज्ञासू मराठी वाचकांच्या हाती दिला. न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांच्या पुण्यस्मृतीस हा ग्रंथ समर्पण झाला आहे. ज्ञानाच्या सर्व शाखा-उपशाखांवर म. गो. रानडे यांचा मोठा लोभ असे. थंड झालेल्या महाराष्ट्राला देश-प्रेमाचा उबारा त्यांनीच दिला. या कृतज्ञतेचे ऋण म्हणून विज्ञानबोध या नावाचे वार्षिक प्रतिवर्षी प्रसिद्ध व्हावे, असा माटे यांचा संकल्प होता. या ग्रंथाचे प्रस्तावनाखंड शास्त्रखंड, चमत्कारखंड, चरित्रखंड असे प्रमुख विभाग आहेत. प्रस्तावना, चमत्कार, चरित्रे इत्यादी विभाग स्वतः माटे यांनीच तयार केले. विज्ञानबोधाची प्रगल्भ प्रस्तावना तर स्वतः माटे यांनीच लिहिलेली आहे. शास्त्रखंडात शिल्पशास्त्र (गो. के. मनोळीकर), पृथ्वीचा इतिहास (क. वा. केळकर), पदार्थविज्ञान (रा. ना. जोशी), रसायनशास्त्र (दि. धों. कर्वे) मानवशास्त्र (इरावतीबाई कर्वे), शरीरविज्ञानशास्त्र (पां. ल. देशमुख), अर्थशास्त्र (द. गो. कर्वे); जीवशास्त्र (ज. नि. कर्वे), मानवी शरीर (ना. शि. सहस्रबुद्धे), वान-स्पतिक (धुं. ल. दीक्षित), वैद्यक (शं. रा. जोगळेकर) व खगोलशास्त्र (ग. नी. चाफेकर). हे महत्त्वाचे लेख आहेत.

**विज्ञानबोधातील चमत्कारखंड व चरित्रे**

चमत्कारखंडात आपण अन्न का शिजवतो? संधि-प्रकाश का होतो? खग्रासग्रहण म्हणजे काय? विजेचा

...२

कडकडाट का होतो ? री-इन्स्पोस्ड काँक्रीट म्हणजे काय ? पेल्टनचे चाक म्हणजे काय ? आकाशाचा रंग निळा का ? निळे डोळे कमी का होत आहेत ? समुद्राचे पाणी खारे का ? शहरातील वातावरण दूषित का होते ? मूर्यावरील डागांचे स्वरूप कोणते ? वक्रनलिकेचे रहस्य कोणते ? धूमकेतू व उल्का म्हणजे काय ? धुक्याचे राक्षसी स्वरूप कसे असते ? आपणास वास कसा येतो ? वाळूची वादळे कशी होतात ? विमान आकाशात का तरंगते ? बर्फ पारदर्शक का असते ? आपण आपला तोल कसा सांभाळतो ? ऑरोरा म्हणजे काय ? अशा विविध प्रसंगांतील चमत्कारांची शास्त्रीय उत्पत्ती समजावून देण्यात आलेली आहे.

चरित्रखंडात हूटन जेम्स, झिटेल आल्फ्रेड, आर्किमिडीज, न्यूटन, फॅरेडे, प्लांक मॅक्स, आईन्स्टाईन, प्रीस्टले, लव्हासिए, पाश्चर, मेंडेल्लफ, मॅडम क्युरी, विल्यम हार्वे, एडवर्ड जेन्नर, सिटसन, लिस्टर, कॉकरॉवर्ट, चार्ल्स डार्विन, ग्रेगर मेंडेल, फ्रान्सिस गाल्टन, कोपर्निकस, केपलर, हर्शल, रॉजर बेकन, कार्ल मार्क्स इत्यादी पाश्चात्य शास्त्रज्ञांच्याबरोबरच आर्यभट्ट, ब्रह्मगुप्त, भास्कराचार्य, चंद्रशेखर रामन, जगदीशचंद्र बोस अशा भारतीय वैज्ञानिकांचीही चरित्रे संक्षेपाने दिलेली आहेत.

**अशी चोकस बुद्धी**

या विज्ञानबोधाच्या कामी माटे यांनी महाराष्ट्रातील अनेक शास्त्रज्ञांची मदत तर घेतली आहेच. पण आपल्या विद्यार्थिमित्रांनाही त्यांनी या बौद्धिक कार्यास लावले आहे. अग्रवाल, कुलकर्णी, जेजुरीकर, कोकजे, गोखले, सदाशिवराव गोडबोले, अरविंद मंगरूळकर. पु. ग. सहस्रबुद्धे, अशा अनेकांची त्यांनी मदत घेतली. विष्णुबोवा ब्रह्मचारी, विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आगरकर, शि. म. परांजपे, गो. कृ. गोखले, आंबेडकर, सावरकर, वि. रा. शिंदे अशा अनेकांची देशभक्ती व स्वार्थत्यागी वृत्ती यांनी पाहिलेली होती. न. चिं. केळकर वि. ब. नाईक, दत्तोपंत आपटे, दवडघाव, शं. गो. साठे शंकरराव जोशी, मो. स. देशपांडे, यशवंतराव भावे इत्यादींचा उल्लेख तर माटे यांनी विज्ञानबोधाच्या प्रास्ताविकात केला आहे. प्रसंगविषयी ते स्वतःही थोरामोठ्यांच्या मुलाखती मोठ्या आदबीने घेताना दिसतात. मंदिर प्रवेश, सहभोजन इत्यादी प्रश्नांवर चर्चा करण्यासाठी माटे आळंदीसही गेले होते. तेथील मठपती व फडकरी यांचा अनुभव त्यांना विशेष चांगला आला नाही. एकदा तर बालविवाहाच्या प्रश्नावर विचार करताना त्यांनी जगातील प्रसिद्ध शास्त्रज्ञांना प्रश्नावली पाठवून त्यांची मते मागितली होती. युरोप, अमेरिकेतील, प्रसिद्ध विद्यापीठांतील तज्ज्ञांच्या उत्तरांवरून त्यांनी सन १९३१ च्या मे महिन्याच्या रत्नाकर मासिकात एक निष्कर्षही प्रसिद्ध केला होता.

**भौतिक शास्त्रांचा अभ्यास जोराने हवा**

हे सर्व सांगण्याचे कारण हे की, कोणत्याही विषयात तज्ज्ञ काय म्हणतात, संशोधक काय सांगतात, शास्त्रज्ञ कौल कोणत्या बाजूने देतात, हे माटे पाहत असत. आपणच सर्वज्ञ आहोत, ग्रंथ वाचून आपणांस सर्व समजते, असा भ्रम कधीही त्यांच्या मनात नव्हता. 'तरुण विद्यार्थ्यांची मने चवकस, चिकित्सक आणि ज्ञानलालस बनावीत' एवढाच आपला उद्देश असल्याचे त्यांनी 'विज्ञानबोधा'च्या प्रस्तावनेच्या दुसऱ्या आवृत्तीत म्हटले आहे. 'आमची भूमिका शास्त्रवेत्त्याची नाही, तर बृहन्महाराष्ट्रातील शिक्षितांनी आधिभौतिक शास्त्रांचा अभ्यास जोराने करावयास हवा, या मताच्या प्रतिपादकाची आहे, आणि हे प्रतिपादन जितक्या विविध अंगानी करावयास हवे असे वाटले, तितक्या अंगांनी येथे केले आहे' असा निर्वाळा आहे. यांनी विज्ञानबोधाच्या प्रस्तावनेच्या प्रारंभीच दिला आहे. रँ. परांजपे हे जागतिक कीर्तीचे प्राध्यापक शिकवायला असतानाही माटे यांना गणित व शास्त्र यात प्रगती करता आली नाही. हे त्यांनीच स्वतःच्या आत्मवृत्तात म्हटले आहे. पण माटे यांचा व्यासंग जबरदस्त होता. वाचन चौफेर होते. शैली धावती व सहज मराठी होती. तीत उपरोधाचा बारकावा होता. तर्कनिष्ठ विचारसरणी होती आणि एखादा मुद्दा पिंजून पिंजून काढण्याची ताकद होती. म्हणूनच त्यांची विज्ञानबोधाची प्रस्तावना महाराष्ट्रात त्याकाळी विशेष गाजली. पुढे महाविद्यालयांच्या अभ्यासक्रमात तिचा समावेश झाल्यावर सन १९४७ साली तिची दुसरी आवृत्तीही निघाली.

**प्रस्तावनेतील अव्वल दर्जाचे तत्त्वज्ञान**

विज्ञानबोधाच्या प्रस्तावनेतील अव्वल दर्जाचे प्रतिपादन स्वतः माटे यांचे आहे. जुन्या धर्मभोळ्या, देवभोळ्या साधुसंतांना व समाजधुरीणांना जगताचे स्वरूप फारसे समजले नाही. त्यांना कार्यकारणभाव ज्ञात झाला नाही, हा त्यांचा मुख्य अर्थ या प्रस्तावनेत

आला आहे. जगताची प्रगती चालली आहे ती मुख्यत: शास्त्रांच्या अभ्यासाने चालली आहे. गेल्या शेपन्नास वर्षात मुख्यत: पहिल्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर आधिभौतिक शास्त्रांचा अभ्यास, नवे शोध, नव्या क्लृप्ती इतक्या भरभर पुढे येत आहेत की, त्यांच्याशी ज्या लोकांचा परिचय नाही ते लोक विद्वान म्हणजे विद्या शिकलेले असूनसुद्धा मागासलेले राहतील यात माटे यांना काहीच शंका वाटत नाही. वस्तूंच्या गुण-धर्मांचे संशोधन, त्यासाठी अपार परिश्रम, ऐहिक म्हणजे इहवादी दृष्टी, उद्योगधंदे, कलाकुसर, व्यापार, कार-खाने, युद्धाची साधने यांची वाढ व्हावयास हवी. आधि-भौतिक शास्त्रांच्या बळावर युरोपीय लोकांनी नवीन यंत्रे तयार केली. आयुधे निर्माण केली. मारक शस्त्रे उच्च दर्जाची निर्माण करून त्यांनी सर्व जगतावर विजय मिळविला. आणि आम्ही ? आम्ही मात्र ब्रह्मजिज्ञासा, भोळ्या समजुती, कर्मकांड, यात गुंतून नवीन भौतिक संस्कृतीचा महिमा ओळखलाच नाही. नव्या भौतिक समृद्धीने समाजाची घडी विस्कटली म्हणून आम्ही खंत करीत राहिलो. आम्ही जडाचा तिरस्कार केला. आमच्या मताची मरगळ झटकून टाकली नाही. आधिभौतिक शास्त्रांचा विचार गौण ठरविला. ब्रह्म तेवढे सत्य व बाकी सर्व मिथ्य, नाशवंत, या नाशवंताची उपासना कशासाठी ? ब्रह्म आणि माया यांच्या जंजाळातून आम्ही केव्हा निघणार ? सृष्टिव्यापाराचे रहस्य केव्हा समजावून घेणार ? ब्रह्मविदांचा मायाजाळ केव्हा संपणार ? त्यांना प्रतीत झालेले ब्रह्मतत्त्व एकाच प्रका-रचे नको काय ? ब्रह्मवेत्ते आम्हांस संसारातून बाहेर का काढताहेत ? संसार करावा ही तर आमच्या मनाची ऊर्मी आहे. हिला अटकाव ब्रह्मवेत्ते का कर-तात ? असे अनेक प्रश्न विचारून या ब्रह्मविदांना म्हणजे आम्ही ब्रह्म जाणले आहे, असे म्हणणाऱ्यांना नाना शंका विचारून माटे यांनी बेजार करून सोडले आहे. ह्या जिज्ञासा म्हणजे काय ? जगन्मिथ्या म्हणजे काय ? ब्रह्मज्ञान म्हणजे काय ? याही प्रश्नांचा थोडा मागोवा माटे यांनी घेतलेला आहे.

**परमार्थाचा महिमा नको**

परंतु समाजाच्या प्रगतीच्या आड ब्रह्मजिज्ञासूच येतात, असे माटे यांना वाटते. पार्थिव नियमांचे पालन हाच त्यांना धर्म वाटतो. निर्बल, आत्मघातकी, मन उदास करणारे, माणसांना अंगचोरपणा शिकविणारे, बायकामुले खोटी आहेत, असे सांगणारे शुष्क तत्त्वज्ञान माटे यांना मान्य नाही. संसार मिथ्या आहे, हे सांगून कसे पटणार ? तो सुखाने, आनंदाने करू द्यावा. षड्-रिपू हे माणसाचे मित्र आहेत, असे शिकवले. त्यांच्या संगतीत माणसास सुख लाभते. कामाचा अतिरेक होऊ नये हे खरे, पण कामभोगात सुख आहे हे नाकारून कसे चालणार ? सर्व प्रश्नांची चर्चा करून माटे म्हण-तात की धर्माचा पराभव झाल्याचे मान्य करण्यासाठी खळखळ होते. धर्माने विकासास कशी खीळ घालण्याचा प्रयत्न केला हेही त्यांनी सांगितले आहे. देव, धर्म, नीती यांची शुद्धी भौतिक शास्त्रांच्या साह्याने व्हावी असे माटे यांना वाटते. ज्ञान पुढे आहे, मागे नाही, असा एक त्यांचा सिद्धान्त आहे. भौतिकशास्त्रांचा संशोधक हाच खरा भक्त त्यांना वाटतो. म्हणून माटे म्हणतात केवळ 'कोऽहं'चा घोष बंद करावा. संसार खोटा आहे. हे सर्व मायाजाल आहे. ही बायका-पोरे आपली नव्हेत, मायेच्या लोंढ्यात सर्वच वाहून जाईल, हा प्रचार आता बंद करावा. परमार्थाचा महिमा आता वाढवू नये असे माटे यांना वाटते. शास्त्रसिद्ध नियमांची बंधने तेवढी त्यांना पुरेशी वाटतात.

**उदासीन शास्त्रे**

श्री. म. माटे यांना आणखी असे वाटते की, जगा-तील युद्धे प्रगतिशील आयुधे लांब पल्ल्याची शस्त्रे करीत नाहीत. त्यांच्या मताने शोध बिचारे उदासीनच आहेत. यंत्राने नाश केला, शास्त्राने नाश केला, हे माटे यांना मान्य नाही. शास्त्र शोध हे Ethically neutral असली तरी माणसे त्यांचा उपयोग वाईटपणाने करतात. यास स्वत: शास्त्रे काय करणार ? यंत्र आयुध निर्दोषी करावे, हे माटे मान्य करतात. ते एका आदर्श कामगार नगराची कल्पनाही करतात. 'सुंदर, टुमदार अशी लहान लहान गावे व्हावीत. काम करण्यासाठी दूर उठून जावे लागू नये. कुटुंबसंस्था विस्कळीत होऊ नये. आणखी वीज कशी निर्माण करता येईल ? माटे यांनी सुचविले आहे, 'समुद्राच्या लाटांवर लाटा काठा-वर आदळत असताना आणि त्यांची कोटयवधी अश्व-शक्ती वाया जात असताना आपण अजून गप्प बसून पाहत आहोत. ही सर्व शक्ती जर आपल्या कामास जुंपिता आली तर गावोगाव विजेचे पुरवठे करून ठेवता येतील आणि मग तिच्या बळावर जी कोणती धंद्याची प्रास्ताविकरूपे आपापल्या गावी, घरी उरकता येण्या-

सारखी आहेत ती उरकावी असे होईल.' (विज्ञान वोधाची प्रस्तावना सन १९४७ पृष्ठ १२१).

**विज्ञान विकासाने जीवन समृद्ध होईल**

यानंतर प्रा. माटे यांनी आपल्या भारतीय भौतिक शास्त्रांचा प्राचीन काळाच्या संदर्भात मुक्त कंठाने गौरव केला आहे. आयुर्वेद, शस्त्रक्रिया, चित्रकला, धातुकाम, गणित, ज्योतिष, शिल्प; इत्यादींची शास्त्रे असलीच पाहिजेत असा माटे यांचा विश्वास आहे. युरोपीय वैद्यकाचा इतिहास व समकालीन संशोधन यांचाही विचार माटे यांनी केला आहे. नव्या भौतिकशास्त्रांच्या संशोधनाचा आपली खाद्यपेये, वस्त्रप्रावरणे, घरबांधणी इत्यादी विभागांत कसा उपयोग होत राहील हेही त्यांनी विशद केले आहे. शास्त्रांचे, संशोधनशाळांचे फायदेही त्यांनी वर्णन केले आहेत. भावी युद्धे कशा प्रकारची होतील याचाही अंदाज माटे यांनी प्रस्तावनेच्या शेवटी केलेला आहे. म्हणून नव्या कालचक्राकडे लक्ष ठेवून आपला तरुण वर्ग शास्त्राभिमुख व्हावा, धर्मभोळा राहू नये, सृष्टीच्या ज्ञानाचे कार्यकारणभावाचे महत्त्व ध्यानी घ्यावे, असे त्यांना वाटते. तरच रानटाचा सुसंस्कृत होईल. सुदीर्घ आयुष्य लाभलेला मनुष्य महत्त्वाच्या पदास पोचेल, जीवन समृद्ध होईल; असा माटे यांचा आग्रह विज्ञानवोधाच्या प्रस्तावनेत आहे. सह्याद्रीची हाक ऐकून लोखंड व वीज यांचा लाभ आपण घ्यावा, असे त्यांनी सुचविले आहे. शास्त्रज्ञाने घरोघरी पोचावे, अशी त्यांची इच्छा आहे.

**चालू काळाच्या संदर्भात विज्ञानवोध**

या हेतूसाठी श्री. म. माटे यांनी 'विज्ञानवोध' नावाचा एक भौतिकशास्त्रांचा समावेशक असा ग्रंथ निर्माण केला. त्याला अत्यंत विवेचक, मार्मिक व विनतोड युक्तिवाद करणारी दीर्घ प्रस्तावना लिहिली. आता यास पन्नास वर्षे उलटून गेली आहेत. नव्या म्हणजे चालू काळाच्या संदर्भात विज्ञानवोधाची प्रस्तावना कशी वाटते? आता पुलाखालून बरेच पाणी वाहून गेले आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर जगाची सर्व घडी विस्कटून गेली आहे. माटे यांनी ज्या विज्ञानविकासाची व समाजघटनेची सुरम्य स्वप्ने पाहिली त्यांचे काय झाले आहे? जरा वस्तुनिष्ठ दृष्टीने पाहिले तर ध्यानात येते की, माटे यांच्या हयातीतच त्यांची स्वप्ने धुळीस मिळालेली दिसतात. ज्या सामुदायिक अभ्यासाचा आखाडा त्यांनी उभा केला होता, तोच मुळी टिकू शकला नाही. सांवत्सरिक व विज्ञानवोध प्रतिवर्षी निघण्याची कल्पना होती, पण कशी तरी एक-दोन वर्षे लहानशी वार्षिके निघून सर्व योजना वारगळून गेल्या. असे का झाले? विज्ञान कमी पडले? तंत्रज्ञान उणे पडले? काय नेमके झाले? अस्पृश्यांची सेवा वंद झाली. माटे यांना या समाजसेवेतून आपण होऊन वाहेर पडावे लागले. म. गांधी यांच्याशी त्यांचे जमले नाही. 'हिंदू समाजदर्शन' फारसे यशस्वी झाले नाही. ट्रॉटस्कीच्या रशियन राज्यक्रांतीच्या इतिहासाचे भाषांतर माळ्यावर वासनात त्यांना गुंडाळून ठेवावे लागले. 'विज्ञानवोध' व 'पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ' ही दोन पुस्तके अग्नीच्या मुखात सापडली. 'वादकोश' निघालाच नाही. मोठ्या प्रयासाने तयार केलेला हिंदुत्वकोश वैयक्तिक संबंधात माटे यांच्या शब्दांत सांगायचे म्हणजे गावुटून गेला! ही सर्व हकीकत म्हणजे सार्वजनिक कार्याची वाताहत महाराष्ट्रात कशी लागते हे स्पष्ट करणारी आहे. म. सा. परिषदेचे माटे कार्याध्यक्ष असताना विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या नावे एक प्रशस्त हॉल वांधून झाला. पण द्वादश खंडात्मक वाङ्मयेतिहासाची योजना मात्र अशीच वादग्रस्त होऊन मागे पडली. माटे यांना हे अपयश का आले? सनातनी वृत्ती, धर्ममार्तंड, ब्रह्मवेत्ते तर यामागे नव्हते? विज्ञान विकासाने भौतिक सुखसमृद्धी होईल अशी माटे याची अपेक्षा होती, पण हे सुख भोगणारा मनुष्य कोणी सुधारायचा? त्याच्या मनाची मशागत कोणी करायची? समृद्धी निर्माण झाली तरी ती शापरूप वनणार नाही, यासाठी आईन्स्टीनने आपली मर्यादा प्रकट केली आहे. इतर अन्य शास्त्रांनी वा कलांनी साह्य करावे, अशी त्याची अपेक्षा होती. इतर शास्त्रे कोणती? धर्मशास्त्र, ब्रह्मतत्त्वज्ञान की अध्यात्मज्ञान? पण या सर्वांची थट्टा थोड्या सौम्य भाषेत माटे यांनी 'विज्ञानवोधा'च्या प्रस्तावनेच्या पूर्वार्धात केली. मनुष्य कसा असावा हे शास्त्र सांगणार नाही. कसा आहे याचे मात्र विवेचन शास्त्रे करू शकतील.

**संसार सोडावा, असे कोण म्हणतो?**

अधिक विचार करता माटे यांच्या प्रस्तावनेतील काही अपसिद्धांत आणखीही शोधता येतील. कोणी हटयोगी, सनातनी, कर्मकांडी असतील. त्यांनी संसाराची अवहेलना केली असेल. दृश्य जगत क्षणभंगुर मानले असेल. संसारातील रांडापोरांची निंदा केली असेल. हा लोक सोडून त्यांनी स्वर्गाची वा वैकुंठाची वाट शोधली असेलही, पण माटे यांना ज्ञानेश्वर-तुकाराम तर चांगले

परिचयाचे होते ना? त्यांनी संसाराची, बायकापोरांची निंदा कोठे केली आहे? त्यांचे सर्व तत्त्वज्ञान तर इह-वादीच आहे. याच देहाने, याच डोळ्यांनी ते मोक्षसोहळा येथेच अनुभवण्यास उत्सुक आहेत. या साधुसंतांचा मोक्ष पैलतीरावर नसून ऐलतीरावरच आहे. त्यांना देवाकडे जावे लागत नाही. देवच दोनांऐवजी चार हात घेऊन भक्तांना आलिंगन देण्यासाठी येतो, हे ज्ञानेश्वरांचे प्रति-पादन माटे यांना माहीत नाही काय? येथे पुंडलीकमुनी घर सोडून जात नाही, तर 'पुंडलिकाच्या भेटी परब्रह्म आले गा' अशी साक्ष आहे. 'आतां गृहादिक आघवें, कांहीं न लगे त्यजावें' असा संतांचा उपदेश माटे यांना का आठवला नाही? 'नलगे सायास, जाणें वनांतरां। सुखें येतो घरां नारायण' हे माटे यांना प्रिय असणारे तुकोबांचे वचन त्यांच्या नजरेतून कसे सुटले? संसाराची तीव्र आसक्ती, केवळ आपल्याच संसारावर अपार लोभ, केवळ धनदौलत मिळविण्यासाठी वेडेवाकडे प्रयत्न; या बाबी मात्र संतांना नको होत्या. अशी बाह्यात रांडापोरे मात्र संतांनी निंदिली आहेत. नटूनथटून तुकोबांकडे आलेल्या व भलत्या गोष्टीची याचना करणाऱ्या स्त्रीस पाहून 'नको नको हा स्त्रियांचा सांगात' वा 'स्त्रियांचा तो संग नको नारायणा' असे तुकोबांनी म्हटले तर तो स्त्री जातीचा अपमान कसा होतो? संसार वा स्त्री-पुत्र यांच्याबद्दलची प्रीतीही सहज आहे. निवृत्ती मात्र यत्न-पूर्वक बिंबवावी लागते. नाहीतर संपत्तीचा सारा संभार एकदम अंगावर कोसळून जीव गुदमरून जायचा. ज्या भौतिक समृद्धीची आशा माटे करतात ती देशांत भरपूर प्रमाणावर उपलब्ध आहे, त्यांची कोवळी पोरे अंगांवर अर्धवट वस्त्रे घालून समुद्राच्या वाळवंटात का लोळतात? कोटयवधी डॉलर्स बँकेत असून झोपेच्या गोळ्या घेऊन बेचैन आयुष्य का कंठावे लागते? विज्ञान आले, यंत्र आले की प्रश्न सुटतात की निर्माण होतात? जोपर्यंत मनुष्य सुधारणार नाही, तोपर्यंत विज्ञान वाढले, की कारखानदारी वाढली, की बकाल अवस्था, दंगे, संप, भ्रष्टाचार, हिंसा यांचीच वाढ झालेली ध्यानात येत नाही का? मनोविकास होणारी एखादी पंचवार्षिक योजना कोणी काढलेली आहे का?

**हळुवार करुणेचा पदर**

माटे शास्त्रज्ञ नसले तरी भौतिकशास्त्रे, समाजशास्त्र यांबद्दल त्यांना भरपूर कुतूहल होते. 'उपमांवरून ऋग्वेद-कालीन समाजस्थिती', 'वर्णकल्पना व वंशकल्पना' 'दान पावले दान पावले', 'श्रद्धानरिंचेची गंगोत्री', 'बाईचा दवा, गरमीचा दवा'; अशा अनेक समाज-शास्त्रीय निबंधातील सूक्ष्म धाग्यांचा पाठपुरावा पुढे कोणी केला? माटे यांचे ऋण कोणी मान्य केले? माटे यांच्या विज्ञाननिष्ठ मनःपिंडाचा आणखी एक धागा येथे उल्लेख करता येण्यासारखा आहे. मानव समाजाबद्दल त्यांची सहानुभूती अपार कळवळ्याची होती. या क्षेत्रात ते उतरले की त्यांची विज्ञाननिष्ठा हरवून जाते. नाही तर 'ज्ञानेश्वर-निवृत्तिनाथ भिक्षेसाठी गेले असता मी लहानग्या मुक्ताईला सांभाळले असते. या थोर बंधूंच्या वाटेवरील खडे त्यांना बोचू नयेत म्हणून मी ते दूर केले असते.' असा मजकूर ते लिहिते ना. सर्व मानवी मनांची बेरीज म्हणजे त्यांना ज्ञानेश्वरांचे मन वाटले नसते. आपले आत्मवृत्त संपविताना त्यांनी परमेश्वराचे आभार मानले नसते. माटे यांच्या विज्ञाननिष्ठ मनास हा असा हळुवार करुणेचा पदर होता. या संदर्भात एक उल्लेख करतो. माटे यांनी नातुबागेत नवे घर बांधले होते. माझे त्यांच्याकडे वारंवार जाणे-येणे होते. एकदा त्यांची व माझी बैठक दोन तास रंगली असताना 'ब्रह्म एकच का? जग मिथ्या का? ईश्वर आहे तरी का?' अशी चर्चा केली आणि नंतर मला सर्व नवे घर त्यांनी आपुल-कीने दाखविले. आतल्या खोलीतील एका कपाटाकडे बोट दाखवून माटे म्हणाले, 'आता इथं मधू गणपती बसविणार. त्याची आरती आम्ही करणार आणि हे बघ, मघाशी ओसरीवर आपण जे बोललो ते विसरून जायचं हं. ते आपलं उगाच होतं.' असे हे माटे व त्यांचे विज्ञान-निष्ठ मन! ■

## साभार स्वीकार

### लेख-संग्रह

**चिंतनिका :** सौ. उषा गडकरी; हिंदुधर्म संस्कृति मंदिर, धनतोली, नागपूर; १९८६; रु. ८ △
**हिरव्या वाटा :** निर्मलकुमार फडकुले; सुपर्ण प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △







# कथालेखक श्री. म. माटे / द. मा. मिरासदार

कै. श्रीपाद महादेव तथा बापूसाहेब माटे यांनी लेखक म्हणून आपली कारकीर्द नेमकी केव्हा सुरू केली हे आज मला आठवत नाही. 'चित्रपट' या त्यांच्या आत्मचरित्रात त्यांचा नेमका उल्लेख सापडेलही. पण एक विचारवंत– सामाजिक सुखदु:खांची जाणीव ठेवणारे विचारवंत– विज्ञाननिष्ठ निबंधकार, म्हणूनच त्यांची प्रथम ख्याती झाली. ललित साहित्याकडे ते फार उशिरा वळले अशी समजूत आहे. पण ती पूर्णांशाने खरी नसावी. त्यांच्या आत्मचरित्रात तरुण वयात त्यांनी एक नाटक लिहिले असल्याचा उल्लेख आहे. हे नाटक त्यांनी त्यावेळचे मान्यवर नाटककार काकासाहेब खाडीलकर यांना दाखविलेही होते. काकासाहेबांनी त्या नाटकाचे थोडे कौतुकही केले. पण गंधर्व नाटक मंडळीं-साठी आपण या नाटकाची शिफारस कराल काय, या प्रश्नावर काकासाहेबांनी नकार दिला. "मीच गंधर्व नाटक मंडळींचा नाटककार आहे. मी दुसऱ्याच्या नाटकांची शिफारस कशी करू ? हा माझ्या पोटापाण्याचा प्रश्न आहे." असे किंवा या अर्थाचे उद्गार काकासाहेबांनी काढले. आत्मचरित्रात माटे लिहितात, "काकासाहेबांचे हे प्रांजळ बोलणे मला फार आवडले." म्हणजे ललित लेखनाकडे ते फार उशिरा वळले ही समजूत तितकीशी खरी दिसत नाही. त्या दिशेने त्यांनी काही प्रयत्न करून पाहिला होता असे दिसते.

कथालेखनाकडे मात्र माटे बऱ्याच उशिरा वळले. १९४० ते १९५० हा काळ म्हणजे त्यांच्या कथालेखनाचा काळ. त्या वेळी त्यांनी पन्नाशी गाठलेली होती. 'कथालेखनाची रेषा माझ्या हातावर पूर्वी नव्हती. ही रेषा अगदी अलीकडेच माझ्या हातावर उमटली आहे.' असे त्यांनी एके ठिकाणी म्हटल्याचे आठवते. किंबहुना कथालेखन– किंवा सारे ललित लेखन– लेखकाने तरुण वयात न करता पन्नाशी उलटल्यावर करावे असाही त्यांचा अभिप्राय होता. त्यांनी स्वत: याच वयात हे लेखन केले. या वयातच जीवनाची साधी जाणीव, अनुभवांची समृद्धता, विचारांची परिपक्वता प्राप्त होते, हा त्यांचा विश्वास या अभिप्रायाच्या मुळाशी असावा. या गोष्टी नसल्या तरी किंवा कमी असल्या तरी– एखाद्या तरुण लेखकाची कलात्मक जाण फार समर्थ असते आणि त्यातूनही त्यांचे लेखन लक्षणीय ठरू शकते. त्यांच्यानंतर पुढे आलेले व्यंकटेश माडगूळकर हे लेखक त्याचे उत्तम उदाहरण म्हणून सांगता येईल. पण माट्यांच्या ललित लेखन प्रक्रियेसंबंधीच्या लिखाणात हा मुद्दा कोठे आढळत नाही.

'उपेक्षितांचे अंतरंग' या पहिल्या कथासंग्रहाने 'कथालेखक' म्हणून माटे यांना मान्यता मिळाली. हा संग्रह १९४१ मध्ये प्रसिद्ध झाला. 'शस्त्राचा शोध' ही आपली पहिली कथा असे माटे सांगतात. पुढे 'झंकार' साप्ताहिकात 'उपेक्षितांचे अंतरंग' हे सदर त्यांनी चालविले आणि या सदरातूनच त्यांनी अनेक नवीन नवीन कथा लिहून मराठी रसिकांचे मन वेधून घेतले. 'बन्सीधर, तू आता कुठे रे जाशील ?' ही त्यांची अत्यंत गाजलेली पहिली कथा. (श्री. वि. श्री. मोडक आणि श्री. रा. ना. नातू या दोन शिष्यांच्या आग्रहामुळे मी ललितलेखनाकडे वळलो असे त्यांनी पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत म्हटले आहे. वि. श्री. मोडक हेच 'झंकार' साप्ताहिकाचे कार्यकारी संपादक होते. माटे यांच्या मूळ कथेचे शीर्षक होते– 'बन्सीधर, तू आता कोठे जाशील ?' मोडकांनी त्यात फक्त 'रे' एवढीच भर घातली पण त्यामुळेच या शीर्षकालाही अधिक कारुण्य आणि गोडवा प्राप्त झाला ही गोष्ट अगदी खरी आहे. माटे यांनाही ही 'रे'ची भर आवडली असावी. त्यांनी ते शीर्षक संग्रहातही कायम ठेवले.) त्यानंतर 'कृष्णाकाठचा रामवंशी', 'पुरंदरचा नामा', 'सावित्री मुक्यानेच गेली', 'नाथनाक आणि देवकाई यांची काळझोप', 'तारळखोऱ्यातील पिऱ्या' अशा

कितीतरी चांगल्या कथा त्यांनी लिहिल्या. या सर्व कथांचे विषय तत्कालीन रूढ कथाविषयापेक्षा अगदी भिन्न आणि नवे होते. इतकेच नव्हे, तर या कथांचे आशय आणि त्यातील कथावस्तूकडे पाहण्याची दृष्टीही भिन्न होती.

त्यांच्या कथालेखनाची ही वैशिष्टये पुढच्या दोन संग्रहांतही कायम राहिलेली आहेत. 'अनामिका' हा त्यांचा दुसरा कथासंग्रह. तो १९४६ मध्ये प्रसिद्ध झाला. 'त्याचे धन हरपले', 'तातूकाका', 'साहेबाला काळीज च नाही', 'सगाजीबोवा', 'देवकाईची देवकी झाली' अशा काही कथा त्यात आहेत. त्यानंतर १९४९ मध्ये त्यांचा तिसरा संग्रह 'माणुसकीचा गहिवर' या नावाने प्रसिद्ध झाला. 'शंभू शिखरीचा राजा' ही त्यांची गाजलेली कथा याच संग्रहात आहे. या कथेव्यतिरिक्त 'राम भरोसी पुन्हा धन्याच्या दारात', 'माझे दहन तुम्ही करा', 'माणुसकीचा गहिवर', 'मंगळवेढयाचे कुसू', 'शेवंतीचा खराटा' या आणखी काही कथा. या सर्वच कथासंग्रहातील कथा रूढ विषयाहून भिन्न कथाविषय, भिन्न आशय आणि त्यातील कथावस्तूकडे पाहण्याची वेगळी दृष्टी दर्शवितात. त्यात कोठे विसंगती दिसत नाही.

पस्तीस-चाळीस वर्षांपूर्वी लिहिल्या गेलेल्या या कथा त्या आज वाचताना कोणता संस्कार मनावर होतो? माटे यांच्या लेखनाची कोणती वैशिष्टये त्यातून जाणवतात? कथालेखनातील त्यांचे बलस्थान कोणते? आजच्या दृष्टिकोनातून या लेखनात काही उणिवा आढळतात काय?

माटे यांच्या या कथा आज वाचीत असताना अनेक गोष्टी पुन्हा एकदा जाणवतात. ज्या काळात मराठी कथा-कादंबऱ्यांत प्रणयधुंद वातावरण आणि स्वप्नाळू ध्येयवाद यांचाच बडेजाव होता त्या काळात या कथा लिहिल्या गेल्या आहेत. याला अपवाद य.गो. जोशी यांच्या कथांचा. त्यांनी मात्र आपले मध्यमवर्गीय पांढरपेशी जीवन आणि त्यातील खरीखुरी सुखदुःखे प्रामाणिकपणे कथेत आणली. लेखक हा आपल्या अनुभवाशी प्रामाणिक पाहिजे आणि अनुभव कलात्मक पातळीवरूनच त्याच्या लेखनात आले पाहिजेत, हे फार थोडया लेखकांपुरतेच त्याकाळात खरे होते. माटे यांच्या कथालेखनाचा पहिला विशेष हा, आपल्या वास्तव अनुभवांशी त्यांनी कोणत्याही प्रकारे प्रतारणा केलेली नाही. त्यांच्या बालपणातील अनुभवांचा परिसर सातारा जिल्ह्याचा ग्रामीणभाग माणदेश हा आहे. 'कृष्णाकाठचा रामवंशी', 'तारळ खोऱ्यातील पिऱ्या', 'बन्सीधर', 'गणू हलवाई आणि धर्मा छकडेवाला' ही सगळी माणसे या परिसरातील आहेत. पुढे अस्पृश्यांच्या शिक्षणासाठी एक व्रत म्हणून त्यांनी अस्पृश्य वस्तीत अनेक वर्षे शिक्षणाचे वर्ग चालवले. त्या निमित्ताने महारवाडा, मांगवाडा यांच्याशी त्यांचा निकटचा संबंध आला. अनेक प्रकारांनी रंजलेगांजलेले हे विश्व त्यांच्या चांगले ओळखीचे झाले. 'सगाजीबोवा' 'शंभू-शिखरीचा राजा', 'शेवंतीचा खराटा', 'एका अस्पृ-ष्टाच्या डायरीतील पाने', 'कशाचा संसार' अशा काही गोष्टी या अनुभवविश्वातीलच वास्तव कहाण्या आहेत. "माझ्या गोष्टींना वास्तवाची–म्हणजे सत्याची भूमिका आहे. या गोष्टी प्रसिद्ध होत असतानाच मी हे घोषित केले होते."–असे माटे यांनी उपेक्षितांचे अंतरंगांमधील प्रस्तावनेत स्वच्छच म्हटले आहे आणि अनेक गोष्टींची मूळ कथाबीजे कोणती ते विस्ताराने लिहिले आहे. १९४३ साली माटे सांगली येथे भरलेल्या साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष झाले. त्यावेळच्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी नवीन लेखकांना उद्देशून 'आपल्या लेखनाचा मोहरा स्वकीयांच्याकडे वळवा' असे संदेशवजा आवाहन केले होते. त्याची या ठिकाणी कुणालाही आठवण होईल. त्यांचे स्वतःचे कथालेखन या आवाहनाशी पूर्णपणे सुसंगत आहे. त्यात कोठे प्रतारणा दिसत नाही.

माटयांच्या कथालेखनात आणखी एक वैशिष्टय जाणवते. कलावंत हा 'अलिप्त' वृत्तीचा असावा. जीवनातील अनुभवाकडे त्याने तटस्थतेने पहावे आणि त्याच तटस्थवृत्तीने त्याने तो अनुभव शब्दरूप करावा. तरच तो खऱ्या अर्थाने कलावंत होतो. त्याचे लेखन हे शाश्वततेच्या पातळीवर जाते. हा विचार लेखनाच्या क्षेत्रात नेहमीच मांडला जातो. माटयांच्या लेखनात ही तटस्थता दिसत नाही. मुळातच ते निबंधकार आहेत. (त्यांच्या या कथासंग्रहातही सर्वच कथा नाहीत. काहींचे स्वरूप ललित-लेखासारखे आहे तर काही लेखन म्हणजे जवळ-जवळ निबंधच आहे. तत्त्वचिंतन आणि विचारांची तार्किक मांडणीच तेथे अधिक प्रभावी आहे.) स्वतः ते 'उपेक्षितांचे अंतरंग' च्या प्रस्तावनेत लिहितात, "या पुस्तकातील सर्वच प्रकरणे गोष्ट या नावाखाली मोडण्यासारखी नाहीत तथापि पुस्तकातील वाङ्मयाच्या मूळ कल्पनेशी ते ते प्रकार जमत असल्यामुळेच ते तेथे दिले

आहेत. अशा प्रकारचे वाङ्मय लिहिण्याचा हा माझा अगदी नवाच यत्न आहे. यामुळे उत्क्रांत होत आलेले वाङ्मयाचे तंत्र मला अजून माहीत झालेले नाही. लिहीत राहिल्याने ते हळूहळू हस्तगत होईल, असा भरवसा वाटतो."

'उपेक्षितांचे अंतरंग' नंतर प्रसिद्ध झालेले दोन्ही संग्रह आपण पाहिले म्हणजे तथाकथित तंत्राच्या दृष्टीने त्यात पुष्कळच सफाई झालेली आहे हे ध्यानात येते. पण 'तंत्र' म्हणजे तरी शेवटी काय? लेखकाच्या मनातील आशय वाचकांच्या मनात बरोबर उतरावा, तीच अनुभूती त्यालाही यावी, यासाठी केलेली एक रचना. माटे हे मनःप्रवृत्तीने तत्त्वचिंतक आणि निबंध व वैचारिक साहित्याची ओढ असणारे. लेखनाचे तंत्र पुरेसे ठाऊक नाही किंवा जुन्या घाटाचे. तरीही त्यांच्या कथा-मन वेधून घेतात. त्यातील करुण कहाण्यांनी अंतःकरण हेलावून जाते; क्वचित प्रसंगी डोळे भरून येतात. रानात उगवलेले एखादे झाड वेडेवाकडे वाढलेले असते. आकाराची आणि विस्ताराची कसली जाणीव प्राप्त असल्याचे दिसत नाही. पण तरीही त्या झाडाला स्वतःचा एक सुरेख, नैसर्गिक आकार प्राप्त झालेला असतो आणि त्याचे मुळचेच सौंदर्य मोठे तजेलदार असते. माटयांचे कथालेखन बव्हंशी या स्वरूपाचे आहे. त्यांच्या लेखनात तटस्थता किंवा अलिप्त वृत्ती मुळीच नाही. एका पांढरपेशा सद्गृहस्थाची भूमिका त्यांनी सदैव कायम ठेवली आहे. एखाद्या उंच, दूरस्थ टेकडीवर बसून पायथ्याशी असलेले गाव न्याहाळीत रहावे तसे हा सद्गृहस्थ उपेक्षितांच्या जीवनाकडे थोडा दुरून, पण अत्यंतिक सहानुभूतीने पाहतो आहे आणि करुणाबुद्धी मनात बाळगूनच या सर्व अनुभवांचे तात्त्विक चिंतन, मनाशी करीत आहे, असे वाटते. 'सगाजीबोवा', किंवा शेवंतीचा खराटा' अशा काही कथा त्या दृष्टीने वाचाव्यात. माणुसकीचा गहिवर आलेले हे मन आलेल्या अनुभवांचे केवळ चित्रण करून थांबत नाही; कलात्मकतेची जाणही फारशी ठेवीत नाही. उलट या अनुभवांचे समाजशास्त्राच्या दृष्टीतून मंथन करते. जन्मभर खराटा घेऊन रस्तेच झाडणाऱ्या एका झाडूवालीचे जीवन 'शेवंतीचा खराटा' या कथेत आले आहे. तिच्या जन्माचा केवळ खराटाच झालेला आहे ही हळहळ माटयांच्या मनात आहे. पण केवळ ही हळहळ व्यक्त करूनच ते थांबत नाहीत. या कथेच्या शेवटी ते म्हणतात,

"राही, तुझे नाव शेवंती. पण पासष्ट वर्षे या जगात आणि समाजात राहून तुझा शुद्ध खराटा होऊन गेला. तुला कसलेही सुख लागले नाही. तुझ्या काळात या चुकीची दुरुस्ती कोणालाही करता येण्यासारखी नाही. पण तू गेलीस तरी तुझीं ही गटारापाशी खेळणारी नातवंडे खरोखरच जागची उठतीलच उठतील. ती माना वर करून चालू लागतील. ती आक्रोश करतील. स्वाभिमानाचे कडकडीत शब्द ती बोलू लागतील. काळाचा ओघ आणि स्वकीयांचे प्रयत्न तुझ्या लेकरांना अनुकूल आहेत. तुझी लेकरे समाजावर चवताळून उठतील. पण समाज जाव देतो असे दिसते! सहस्रावधी वर्षांचे हे दुखणे दोन पिढयांच्या अवकाशात उताराला लागले आहे हे पाहून जीव हर्षभरित होतो आणि थक्कही होतो. जे सुग्रास अन्न तुला मिळाले नाही, ते तुझे नातू खचित खातील. जे वस्त्र तुला कधी लेता आले नाही, ते तुझ्या नाती अंगावर घालून खचित लपतील; आणि ज्या उंच हवेल्यांच्या दारापुढचा केर काढण्यापुरतीच तू त्यांच्या आसपास जात होतीस, त्यात राहण्याचे भाग्य तुझ्या नातवंडांना खचित लाभेल. दरम्यान वाटयाला आलेले दुर्भाग्य शिरावर बाळगीत तू शाश्वत काळाशी एकरूप हो."...

माटयांचे सर्वच कथालेखन गंभीर आहे. 'हास्याचा शोध' हे शीर्षक थोडे दिशाभूल करणारे असले तरी त्याचा आशय गंभीरच आहे. एका दरिद्री लिफ्टमनची सदैव उदासवाणी आणि थिजलेली मुद्रा चार आण्याची टिप् मिळताच उजळते आणि त्याच्या चर्येवर प्रथमच हसू उमटते. या आशयात कारुण्यच अधिक आहे. मिस्किलपणाचा एक लहानसा प्रवाह त्यांच्या लेखनशैलीतून झुळझुळतो; नाही असे नाही. 'एका वृद्धाश्रमाची वाताहात' या कथेत हा मिस्किलपणा अधिक मोकळेपणाने प्रकट होतो. पण तरीही वृद्धांच्या जीवनातील कारुण्य प्राप्तही सतत डोकावतेच आणि तीही कथा निखळ विनोदी होत नाही. जीवनातील कारुण्य हाच त्यांच्या अनुभवांचा मूळ गाभा आहे आणि माणुसकीने आर्द्र झालेले मन हेच त्यांचे बलस्थान आहे. 'शैलीकार साहित्यिक' म्हणून आचार्य अत्रे यांनी त्यांचा गौरव केला होता. माटे हे शैलीकार लेखक आहेतच आहेत. त्यात कसलीच शंका नाही. जुन्या धाटणीची अस्सल मराठी रचना, अपरिचित पण समर्पक शब्दांचा वापर करण्याची त्यांची हौस आणि वास्तव बोलीभाषेचा

वापर ही त्यांच्या लेखनशैलीची वैशिष्टये पटकन डोळयांत भरतात. त्यांच्यापूर्वी उपेक्षितांचे अंतरंग कुणी उकलून दाखवले नव्हते. निदान इतक्या रसरशीतपणे तरी नक्कीच नव्हते. तसेच जिवंत बोलीभाषेचा वापरही माटयांच्या-पूर्वी कोणा लेखकाने केला असल्याचे मला तरी आठवत नाही, पण माटयांच्या लेखनशैलीला कोठेकोठे काव्यात्मकतेचाही स्पर्श होतो आणि तो अनुभव फार समृद्ध होऊन जातो. त्याला चिंतनाचीही जोड मिळते. 'शंभू शिखरीचा राजा' या कथेतील शंकर निरपराधी असून खुनाच्या आरोपाखाली शिक्षा भोगत राहतो. आणि त्याची गरीब, पतिव्रता वायको पार्वती ही देवाला साकडे घालण्यापलीकडे दुसरे काही करू शकत नाही. शंभू शिखरीचा राजा ही नवऱ्याची गर्जना क्षीण स्वरांत उच्चारीत ती पिंपळाला सतत प्रदक्षिणा घालीत राहते. लोकांना भीती वाटावी एवढया उग्रतेने तिची ही अबोल तपश्चर्या चालूच राहते. माटे लिहितात—

"गावातील स्त्रियांना पार्वती म्हणजे दैवत बनली. त्या तिला नमस्कार करू लागल्या. तिच्या प्रदक्षिणा चालू असल्या म्हणजे त्या रडवाई तोंड करून हात जोडून पारापाशी स्तब्ध उभ्या राहत. पुरुष माणसे थोडया अंतरावर उभी राहत. पुरुषासारखे पुरुष पण ते वायकांसारखे रडू लागत. पार्वती मात्र नखशिखांत गांभीर्य बनली होती. तिच्या हळहळीची भावना झाली होती; भावनेची तपश्चर्या बनली होती, तपश्चर्येचे गंभीरपण दारुण तत्त्व बनले होते...

समाजशास्त्रज्ञ, तत्त्वचिंतक, निबंधकार आणि मानवी जीवनातील अनुभवांचा साक्षेपी निरीक्षक...हे सर्व मिळून माटे या लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाची घडण झाली. आणि या सर्व गोष्टी माणुसकीच्या उदात्त भावनेने ओल्याचिंब झाल्या आहेत. म्हणूनच त्यांचे लेखन आजही वाचले तरी ते प्रत्ययकारी वाटते. जिवंत वाटते. सुकलेल्या सोनचाफ्याचा गंध पुढेही काही दिवस येतच राहतो. माटयांच्या कथालेखनाला पन्नास वर्षे झाली तरी त्याही कथा अशाच सुवासानी घमघमत आहेत. निदान मला तरी तो सुगंध आजही येत आहे.

माटे यांच्या नंतरच्या पिढीतील समर्थ लेखक श्री. व्यंकटेश माडगूळकर हे साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष झाले. त्यावेळी पुण्यात त्यांचा पहिला सत्कार झाला. या सत्काराला उत्तर देताना त्यांनी म्हटले, "माटे हे आमचे मूळ पुरुष. गोगोलच्या ओव्हर कोटातून आम्ही सर्व लेखक बाहेर आलो, असे एका रशियन लेखकाने कृतज्ञतेने म्हटले आहे. मीही तसेच म्हणतो. आम्ही सर्व पुढचे लेखक माटयांच्या 'बन्सीधर' कथेतील कानकऱ्यांच्या तळावरून पुढे आलो आहोत..."

माडगूळकरांसारख्या एका समर्थ कथालेखकाने माटे यांच्या लेखनाला वाहिलेली ही आदरांजली !...यापेक्षा श्रीपाद महादेव माटे यांचा अधिक गौरव तो कोणता असणार ?

■

## साभार स्वीकार

### कविता

**वाटचाल** : इंदिरा पाटील; आरतीभारती प्रकाशन, श्रीकृष्ण कॉलनी, जळगाव; १९८६; रु.१० △ **सागरलाट** : वि. गो. साठे; श्रीप्रकाशन संस्था, अनसुरकर गल्ली, बेळगाव; १९८६; रु. ३० △ **अज्ञान लीला** : व. दि. कुलकर्णी; नागपुरे पु. चं. संपा; व्हीनस प्रकाशन, पुणे; १९८६, रु. १५ △ **पदघुंगरू** : मीरा गुणारी; शेखर प्रकाशन, सिव्हिल लाइन्स, सागर (मध्यप्रदेश); १९८६, रु. २५ △ **गीत तुकाराम** : सी. म. बापट; ज. रा. कालकुंद्रीकर, तानाजी गल्ली, बेळगाव; १९८६ रु. ७ △ **मेघनाच्या कविता १९७४–८५** : मेघना; मेघना पेठे, १७ व्यंकटेश प्रसाद; न. चि. केळकर मार्ग, दादर, मुंबई २८ △ **साखळदंड** : गोरख भालेराव; विद्या भालेराव, डॉ. आंबेडकर चौक, बोपोडी, पुणे ३; १९८६; रु. १५ △ **शैक्षणिक गीते** : भास्कर कौजलगीकर; भाग्यश्री कौजलगीकर, सोलापूर; १९८६; रु. २.५० △ **कविता १९६९–१९८४** : विलास सारंग; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६; रु. ३० △ **अक्षरमणिमाला** : रमणमहर्षी / रसगंगाधर–अनु; संजीव कुलकर्णी, ताराबाई पार्क, कोल्हापूर; १९८५ रु. ५ △

...३

# कथाकार माटे आणि मी / आनंद यादव

गुरुवर्य माटे मास्तर,

तुमच्या स्मृतीस आदरपूर्वक नमस्कार,

शिक्षक म्हणून तुम्ही मला प्रत्यक्ष कधी शिकविले नाही, तुम्हाला प्रत्यक्ष कधी पाहूही शकलो नाही. तरी तुम्ही गुरुतुल्य वाटता. याला अनेक कारणे आहेत. ग्रामीण जीवन हे दारिद्र्याने, अज्ञानाने, प्रस्थापितांच्या शोषणाने भरलेले असले तरी त्यालाही मोल आहे; साहित्यात त्यालाही स्थान आहे, याची विशेष जाणीव तुमच्या साहित्यामुळे मला झाली. तुमच्या भाषाविषयक जाणिवेने भारला जाऊन मी माझ्या ग्रामीण मायबोली-लाच यथाशक्ती माझ्या साहित्यकृतींचे आवश्यकतेनुसार माध्यम म्हणून निःसंकोचपणे वापरले. ' स्वकीयसमाजा-कडे मोहरा वळवा, आपल्या समाजाचे स्वत्व शोधा.' असे तुम्ही १९४३ सालीच सांगितले. त्या जाणिवेचा परिपाक म्हणजेच अलीकडील ग्रामीण साहित्याची चळवळ आहे. ' ग्रामीण ' हे विशेषण केवळ भौगोलिक न मानता मी ते ' सांस्कृतिक ' मानले. वेदपूर्ण काळा-पासून तो अगदी विसाव्या शतकाच्या अंतापर्यंत भार-तीय संस्कृतीचे आद्य विशेषण जर कोणते असेल तर ते ' ग्रामीण ' आहे. समग्र भारतीय समाजाला ते अंतर्बाह्य व्यापून आहे, अशी माझी आज धारणा व्हायला तुमच्या ग्रामीण साहित्याचीच गंगोत्री कारणीभूत आहे. आजच्या गामीण साहित्याचा, विशेषतः कथेचा विस्तार हा मूलतः तुम्ही लावलेल्या रोपट्याचाच विस्तार आहे. ' स्वातं-त्र्योत्तर काळात विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे कार्य संपुष्टात आले आहे; आणि आता ज्योतिराव फुले यांच्या घोषणांचा अंमल सुरू होणार आहे ' अशा अर्थाचे मत ज्या म. फुल्यांच्या कर्तृत्वाविषयी तुम्ही नोंदविले आहे; त्या फुल्यांनीच ह्या वृक्षाचे बीज रुजविले आहे, असे मी मानतो. माझी झेप तुमच्या इतकी उंच मुळीच नसली तरी तुमची वाङमयविषयक जाणीव ही मला माझीच जाणीव वाटते, इतकी तिच्या विषयी मला आत्मीयता आहे. म्हणूनच वेळोवेळी मी माझ्या साहित्य–विचारांतून आपणास भेटत राहिलो, मानत राहिलो.

पहिल्यांदा तुम्ही भेटलात ते क्रमिक पुस्तकातून. ' पिऱ्या काय म्हणतो ?' हा तुमचा धडा प्राथमिक शाळेतच होता. पण हा धडा शाळेत मास्तरांनी कधी घेतलाच नाही. तो गाळून टाकला. मात्र त्या धड्याच्या आरंभीचे तुमचे रेखाटलेले चित्र अजून लक्षात आहे. भरघोस मिशा असलेले, टोपी घालणारे, बंद गळ्याचा कोट व त्याच्या आत कॉलर नसलेला सदरा घालणारे तुमचे चित्र माझ्या गावरान मनाला जवळचे वाटत होते. माझ्या गावात अशी माणसे होती. ती चार इयत्ता शिकलेली, गावात रुबाब असलेली, इनामदार, वतनदार असत किंवा सरकारी कचेरीत कारभारी असत.

त्या धड्याशी जिज्ञासेपोटी काही झटापट केल्याचे आठवते. पण पिऱ्याचा खरा प्रश्न मला त्या वेळी कळ-लाच नाही. पिऱ्या कुणीतरी ' गरीब ' माणूस आहे, आमच्या गावच्या महारवाड्यात, मांगवाड्यात असा माणूस भेटू शकतो, एवढेच कळले. त्याला कळून घेण्याचे ते वयही नव्हते.

महाविद्यालयाच्या पहिल्या वर्षाला गेल्यानंतर मात्र खरी भेट झाली. तुमचे ' उपेक्षितांचे अंतरंग ' हे अभ्यासालाच होते. वय वाढले होते. समाज म्हणजे काय, गरिबी म्हणजे काय, उपेक्षित म्हणजे कोण, हे कळत होते. त्याचे काही चटकेही बसत होते. त्यामुळे ' उपे-क्षितांचे अंतरंग ' काळजाला भिडले. प्रा. रा. वि. चिट-णीस यांची शिकवण्याची पद्धतीही त्याला कारणीभूत असेल. ही गोष्ट १९५५ सालची आहे.

तुमच्या या पुस्तकाने मला फार मोठा आत्मविश्वास दिला. तो इतका की चिटणीस सरांनी दिलेले तुमचे ' माणुसकीचा गहिवर ' हे पुस्तक एका दिवसात घळ-घळत्या डोळ्यांनी रत्नागिरीत वाचून काढल्याचे आठ-वते. तुमचा ' बन्सीधर ' मात्र हृदयाचा ठाव घेऊन

गेलो. ज्या परिस्थितीत मी आईवडिलांना सोडून पोरका होऊन बाहेर पडलो होतो; ती परिस्थितीही कदाचित त्याला कारणीभूत असेल. ते वयही त्याला कारणीभूत असेल. पण तुमच्या त्या दोन्ही पुस्तकांनी तुमच्या विषयीची एक आत्मीय भावना निर्माण केली. हा माणूस गोरगरिबांना समजून घेणारा आहे, त्यांच्या पाठीवरून माणुसकीचा हात फिरविणारा आहे, याची जाणीव झाली. या माणुसकीची मलाही त्यावेळी गरज होती.

त्या काळातील माझ्या कोवळ्या, अनघड वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाला तुम्ही आणखी दोन महत्त्वाच्या गोष्टी दिल्या. ग्रामीण जीवन हे गद्य साहित्याचाही विषय होऊ शकते याची जाणीव तुमच्या या पुस्तकांनी करून दिली. दुसरी जाणीव ग्रामीण भाषेविषयीची. गद्य साहित्यातही आपण आपली भाषा वापरू शकतो, हे प्रथम मला त्यावेळी कळले. तुम्ही दिलेल्या या दोन जाणिवांनी माझा वाङ्मयीन आत्मविश्वास द्विगुणित झाला. तुम्ही एका महाविद्यालयात प्राध्यापक आहात, समाजसुधारक आहात, विज्ञाननिष्ठ आहात, मराठी साहित्य संमेलनाचे एकदा अध्यक्ष झालेले आहात, याची माहिती तुमचा परिचय करून देताना प्रा. चिटणीसांनी दिली होती. त्यामुळे हा आत्मविश्वास आणखीन वाढला... ' म्हणजे हा लेखक साधासुधा नाही. एखाद्या खेड्यात राहून जे पाहिले ते लिहितो आहे, जमेल ती ग्रामीण ढंगाची भाषा लिहून साहित्यनिर्मिती यथा-शक्ती करतो आहे, अशी याची रुकूटुकूची अवस्था नाही. ग्रामीण जीवन आणि तेथील माणसे हा विषय आणि ग्रामीण ढंगाची अभिव्यक्तीची भाषा ही त्याने जाणीवपूर्वक, सन्मानपूर्वक स्वीकारलेली आहे. अशी या लेखकाने ती स्वीकारली आहे, त्याअर्थी या जीवनाला, या भाषेला समाज जीवनात काही तरी महत्त्व आहे, काही तरी स्थान निश्चित आहे.' असा विचार माझ्या मनात आला आणि मला माझे हात गगनाला लागल्यासारखे वाटू लागले. मी माझ्या ग्रामीण, दरिद्री जीवनावर, माणसांवर अधिकच प्रेम करू लागलो. खरे तर हे सगळे वाङ्मयबाह्य आहे, हे मला आज जाणवते. पण त्या वेळी हे संस्कार महत्त्वाचे होते, असे मला वाटते.

१९५३–५४ पासूनच 'हिरवेजग' मधील ग्रामीण कविता लिहीत होतो. त्यांत ग्रामीण जीवन, ग्रामीण भाषेत येत होते. पण 'कविता' ही त्यावेळी माझी एक मौजेची बाब होती. तिच्याकडे फारशा गांभीर्याने पाहायचे असते, असे त्यावेळपर्यंत मला कुणी शिकविले नव्हते. शिक्षक तिचे जेव्हा आणि जसे रसग्रहण करत, तेव्हा तिच्यापासून केवळ आनंद लुटावयाचा; त्यासाठीच कविता असते, असे मला वाटे. रविकिरणमंडळकालीन ग्रामीण कविता वाचून माझी अशी धारणा त्यावेळी झाली होती.

पण महाविद्यालयात तुमचे 'उपेक्षितांचे अंतरंग.' ज्या गांभीर्याने शिकविले आणि ज्या पद्धतीने तुमचा मोठेपणा मला चिटणीस सरांनी पटवून दिला; त्यामुळे माझ्या मनात ग्रामीण जीवन आणि ग्रामीण भाषा या विषयी एक वेगळाच प्रकाश पडला. तो तलस्पर्शी होता. त्यामुळे ग्रामीण साहित्याकडे गंभीरतापूर्वक वळायला माझ्या मनात अभिमानयुक्त आत्मविश्वास निर्माण झाला. मला माझ्या जीवनार्थाची आणि ग्रामीण भाषेची खरी योग्यता त्यावेळी कळली.

माझी ही जाणीव भक्कम करायला मला मग लोकरच व्यंकटेश माडगूळकर, शंकर पाटील, वहिणाबाई चौधरी 'सत्यकथे'तून, पुस्तकांतून भेटले. पु. ल. देशपांडे, प्राचार्य य. द. भावे, प्रा. रा. वा. चिटणीस यांनी ते भेटवले.

तुम्ही गेलेल्या वाटेने तुमच्या मागोमाग जे जे गेले ते अनेक ग्रामीण साहित्यिक मग १९६०–६१ पर्यंत मी भरपूर अभ्यासले.

या काळात म्हणजे १९६० च्या आसपास मी पुण्यात शिकायला आणि नोकरीला आलो होतो. त्यावेळी एक मजेशीर गोष्ट कळली की, पुण्यातील अनेक सनातनी मंडळी तुमचा उल्लेख तुच्छतेने 'महार माटे' असा करीत असत. मला त्याचे आश्चर्य वाटले. आणि तुम्हाला असे म्हणत असूनही तुम्ही सदाशिव पेठेतल्या गाभ्यातल्या शाळांतच शिक्षक होता व नंतर एका महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक होता; याचेही आश्चर्य वाटले. तुमचे मनापासून गोडवे गाणारी, तुमच्याविषयी आदर, आस्था असणारी, प्राध्यापक या नात्याने मानसिक जवळीक असणारीही अनेक मंडळी भेटली. तुमचे शिष्य म्हणवून घेणारेही अनेकजण भेटले. तुमच्याविषयी असे प्रेम असणारी मंडळी मला मनाने जवळ वाटत होती. तुमचे ज्याने शिष्यत्व पत्करले आहे, तुमचा ज्यांच्या मनावर काही संस्कार आहे, असे लोक मलाही नीटपणे समजून घेतील अशी माझी सुप्त अपेक्षा होती.

१९६० हा ग्रामीण साहित्याच्या धामधुमीचा काळ होता. स्वातंत्र्योत्तर ग्रामीण साहित्यिकांची पहिली पिढी बहराला आली होती: व्यंकटेश माडगूळकर, शंकर पाटील, द. मा. मिरासदार, शंकरराव खरात, रणजित देसाई दणकून लिहीत होते. विशेषत: माडगूळकर, पाटील, मिरासदार यांच्या होणाऱ्या चर्चा मी ऐकत होतो. व्यक्तिशः माझ्या आणि शंकर पाटील यांच्या वाङ्मयीन गप्पा विशेष रंगत होत्या. मी स्वत: या काळात कथा लिहीत नव्हतो; रेडिओसाठी भरपूर ग्रामीण श्रुतिका मात्र लिहीत होतो आणि ग्रामीण कविताही लिहीत होतो.

या मंडळींशी प्रत्यक्ष गाठीभेटी होत असल्याने आणि हा काळ विशेष कलात्मक जाणिवेचा, नववाङ्मयीन प्रवृत्तींचा होता, त्यामुळे कलात्मक जाणिवा आणि नववाङमयीन प्रवृत्ती या विषयीच चर्चा फार होत असत. या काळात जीवनजाणीव काहीशी गौणस्थानी गेली होती. यावेळी अग्रगामी असलेल्या 'सत्यकथा,' 'छंद' मासिकांतील वाङ्मयीन समीक्षेचा, विवेचनाचा परिणाम मनावर होतच होता.

माझ्या भोवतालच्या या वातावरणामुळे तुम्ही काही काळ माझ्या नजरेआड झालात. कलात्मक जाणिवांनी मीही भारून गेलो. नववाङमयीन प्रवृत्तींचा माझ्यावरही परिणाम झाला. पण मी या काळात रेडिओच्या श्रुतिका सोडल्या तर गद्यलेखन करीत नव्हतो. एम. ए. च्या परीक्षेला बसणारा वाङमयाचा एक विद्यार्थी म्हणून गद्य साहित्याचे वाचन करत होतो.

१९६१ मध्ये एम. ए. झालो आणि रेडिओची पुण्याची नोकरी सोडून पंढरपूरला मराठीच्या प्राध्यापकाची नोकरी पत्करली. वरील ताज्या दमाच्या मंडळींचे ग्रामीण साहित्य पंढरपुरातही जाणीवपूर्वक वाचत होतो. पंढरपुरातील माझ्या दोन वर्षांच्या काळात या बऱ्या दमाच्या कथाकारांच्या 'ग्रामीण कथेच्या' अनेक मर्यादा जाणवू लागल्या. ही कोंडी फोडण्याचे आपणांस जमले तर आपण करून पाहावे, या ईर्षेने मी माझ्या परीने 'कथा' लिहू लागलो. या काळातही तुम्ही नजरेआडच होता.

पण दोन वर्षे पंढरपुरात राहून परत १९६३ साली पुण्याला आलो. नंतर १९६५–६७ पर्यंत भरपूर कथालेखन केले. यश मिळते आहे, असे वाटू लागले. जिद्द वाढली. हळूहळू वयही वाढत होते. त्यावरोबर गद्य लेखनाचा आत्मविश्वासही वाढत होता. या काळातच अशी इच्छा होऊ लागली की, ग्रामीण साहित्यात काही करावयाचे असेल तर ही धारा नीटपणे अथपासून इतिपर्यंत समजून घेतली पाहिजे. म्हणून ग्रामीण साहित्याच्या अभ्यासाकडे गंभीरतापूर्वक आणि बौद्धिक शक्ती जागा ठेवून वळलो. ग्रामीण साहित्याच्या अभ्यासाला असा जाणीवपूर्वक हात घातल्यावर पुन्हा एकदा तुमची भेट झाली. खरे तर तुम्हांला खोलवर समजून घेणारी ही पहिलीच भेट.

या वेळी तुमचे वाङ्मयीन मोठेपण वेगळ्या अर्थाने जाणवले. आजही ते जाणवते. तुमची 'ग्रामीण कथा' ही स्वतंत्र बाण्याची कथा आहे. तुमच्या व्यक्तिमत्त्वाइतकेच तिचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व एकदम वेगळे आहे. तुम्ही पुण्यात अनेक वर्षे राहूनही 'पुणेरी' बनला नाहीत. इतर लेखकांप्रमाणे तुम्हांला सदाशिवपेठेतील मर्यादित सुधारणांचा ध्यास नव्हता. समाज प्रचंड पसरला आहे याची जाणीव मराठी कथांमध्ये साहित्याला प्रथम तुम्ही करून दिली. तुमच्या जाणिवा इतर साहित्यिकांप्रमाणे केवळ कागदोपजीवी नव्हत्या. त्या कृतिशीलही होत्या. त्यासाठी तुम्ही सदैव आर्थिक आणि शारीरिक झीज सोसली. काही प्रमाणात सामाजिक हानीही पत्करली. 'महार माटे' म्हणवून घेतले. प्रतिष्ठेच्या जागा नाकारल्या. इतकी वर्षे पुण्यात राहून पुणेरी साहित्य–कल्पनांचा, पुणेरी भाषा शैलीचा, पुणेरी सामाजिक दृष्टीचा, पुणेरी अहंगंडाचा परिणाम तुमच्यावर तुम्ही बिलकुल होऊ दिला नाही.

तुमची समाज–जाणीव किती तरी व्यापक आहे; तुमच्या साहित्यातून ती दिसते. तुम्ही समाजजीवनातून घेतलेले कथेचे विषय ज्या गांभीर्याने, सहजतेने, आंतरिक आत्मीयतेने, एका प्रगाढ करुणाबुद्धीने घेतले. ती बुद्धी स्वतंत्र होती. ते विषय गांभीर्याने त्यावेळी कोणत्याही पुण्या–मुंबईच्या, समाजजीवन–जाणिवेच्या लेखकाने हाताळले नव्हते. तुमचा समाज खऱ्या अर्थाने समग्र आणि देशी होता. त्यातून घेतलेले विषयही खऱ्या व्यापक अर्थाने देशी 'मराठी प्रकृती'चे होते. याचा अर्थ असा की, पुण्यात अनेक वर्षे राहूनही तुमच्या वाङमयीन व्यक्तिमत्त्वाचा पिंड तत्कालीन डामडौली वाङ्मयीन प्रवाहात बुचकळला गेला नाही किंवा त्या प्रवाहाने संस्कारितही झाला नाही.

यामुळेच तुमची 'कथेची' संकल्पनाही तत्कालीन

वाङ्मयीन कथेच्या संकल्पनेहून भिन्न होती. ती अधिक स्वाभाविक, अधिक प्रवाही, अनुभवाच्या अंगाने जीवनाभिमुख राहिली. तुमच्या भाषाशैलीची बीजेही तुम्ही तत्कालीन शैली-कल्पनेत शोधत बसला नाहीत. नाटककार रा. ग. गडकरी, शि. म. परांजपे, न. चिं. केळकर; ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, ग. त्र्यं. माडखोलकर, अ. व. कोल्हटकर असे किती तरी शैलीसम्राट त्यावेळी पुण्यातील साहित्याच्या दरबारात आतषबाजी करीत होते. त्यांची 'भाषाशैली' त्यावेळी प्रत्येक साहित्यिकाने अभ्यासावी, गिरवावी आणि आत्मसात करावी; तरच साहित्यक्षेत्रात सुलभ प्रवेश व्हावा, अशी अवस्था होती. पण तुम्ही तुमच्या भाषा-शैलीची प्रेरणा ज्या तुमच्या बालपणात तुमच्यावर सातान्याकडच्या देशी भाषेचे संस्कार झाले त्यांत शोधली.

तुमचे व्यक्तिमत्त्व, तुमची साहित्य-संकल्पना, तुमची भाषा आणि तुम्ही पाहिलेले समाजजीवन सर्वार्थाने देशी मराठी होते. मराठी साहित्याला ते तोवर नीटपणे माहीतच नव्हते. म्हणून तुम्हाला मी 'ग्रामीण कथेचे हरिभाऊ आपटे' असे १९७० सालीच म्हटले.

त्या तरुण, उत्साही वयात मी म्हटले खरे. आज त्या विधानाच्या मर्यादा तुमच्या कथांचा पुन्हा विचार करताना विशेष जाणवतात. खरे तर आज तुमच्या व्यक्तिमत्त्वाचे हे पैलू मराठी साहित्यात मला अती म्हणजे अतिशयच महत्त्वाचे वाटतात. त्या दृष्टीने विचार करता व्यापक अर्थाने खऱ्या 'आधुनिक मराठी' कथेचे तुम्ही दुसरे हरिभाऊ आपटे आहात. हरिभाऊ आपटे यांच्या कथाकादंबऱ्यांतून त्यांच्या सामाजिक जाणिवेला पडलेल्या मर्यादा तुम्हीच प्रथम तुमच्या कथांतून यशस्वीपणे मोडून काढल्या आहेत. आणि साहित्यात समग्र मराठी समाज-जीवनाचे दर्शन घडविण्याचा प्रयत्न प्रथमच मराठी कथेत केला आहे. या तुलनेने दिवाकर कृष्ण, कॅ. लिमये, ना. सी. फडके, य. गो. जोशी इ. तत्कालीन नामवंत. कथाकारांचे प्रयत्न हे तसे फारच मर्यादित आणि आपलेच कोनेकोपरे उजळणाऱ्या काजव्यांचे लुकलुकते यश मिळविणारे आहेत.

तुमची वाङ्मयीन जाणीव-कथेविषयीची जाणीव-ह्या जीवन-जाणिवेचाच एक भाग होता. जीवनापासून ही जाणीव तुम्ही तोडू दिली नाही. जीवन जगत असताना तुमच्या समाजजीवननिष्ठ विचार करणाऱ्या मनाला जे जाणवत होते, त्यालाच तुम्ही आकार देत होता. तुमचे मन या दृष्टीने तुम्हाला येणाऱ्या अनुभवांचा खोलवर विचार करीत होते. त्यांचे परंपरात इतिहासात, भूतकाळात रुतलेले धागेदोरे शोधत होते. ज्या माणसांच्या सहवासात तुम्हाला अनुभव येत होते किंवा जी माणसे तुम्हाला आपला भूतकाळ विश्वासाने सांगत होती; तीच माणसे तुमच्या संवेदनांनी, स्मरणाने, बारकावे हेरण्याच्या तुमच्या वृत्तीने तुम्ही साहित्यात आणत होता. त्यांच्या द्वाराच त्यांच्या विषयींचे तुम्ही भोगलेले, ऐकलेले, पाहिलेले, त्यांचे प्रसंग, घटना साहित्यात चिंतनयुक्त अनुभवरूपात मांडत होता. त्यामुळे तुमची वाङ्मयीन जाणीव जीवन-जाणिवेतून थेट वर उसळल्यासारखी दिसत होती. नव्या विहिरीत नव्याने फुटलेल्या जिवाळ्यासारखी जाणवत होती. नवसाहित्यविषयक जाणिवेप्रमाणे जीवनापासून तुटल्यासारखी स्वायत्त, स्वयंभू मुळीच नव्हती. जे जगलात, ज्याचे चिंतन केले, जे प्रत्यक्षात भेटले आणि मनाला भिडले तेच निवडून-पाखडून, नेटके करून, त्यातील अप्रस्तुत बाजूला ठेवून प्रस्तुताला आपल्या स्वाभाविक जीवनधर्मी शैलीच्या अंगाने मांडावयाचे हे तुमचे वाङ्मयनिर्मितीचे सूत्र होते.

यातून तुम्ही काय शोधत होता ? 'साहित्य-सौंदर्य' शोधत होता की जीवन-सौंदर्य शोधत होता ? तुम्ही जीवनसौंदर्य शोधत होता, असे तुमच्या कथा वाचून वाटते. साहित्याचे तेच अंतरंग-सौंदर्य असते, याविषयी तुमची खात्री झाली होती.

महान साहित्यिकांचे गद्य साहित्य वाचत असताना एक जाणीव प्रकर्षाने होते. ह्या साहित्यिकांच्या साहित्याचा मूळ पाया समाजजीवन हा असतो. एखाद्या महान वृक्षाच्या खोडाचा मोठा ढलपा काढावा आणि त्याचे अंतरंग उघडे व्हावे तसे त्यांनी आपल्या साहित्यकृतींच्या आधारे समाजजीवन दाखविलेले असते. हे साहित्यिक समग्र समाजजीवनात वावरणाऱ्या माणसाचे चिंतन करीत असतात. या समाजजीवनात ही माणसे अशी का वागतात, हा प्रश्न माणसामाणसागणिक त्यांना पडत असतो. माणसानेच माणसाच्या सुखासाठी, कल्याणासाठी निर्माण केलेल्या समाजव्यवस्थेत, माणसाची अशी भुते का होतात, ही समस्या त्यांना छळत असते. यातूनच हे साहित्यिक आपल्या उत्तुंग प्रतिभेच्या चिंतनशीलतेच्या, संवेदनशीलतेच्या, कल्पनाशीलतेच्या आधारे उत्तरे शोधण्याचा प्रयत्न करतात. ही उत्तरे

प्रतिभावंत साहित्यिकाची असतात. म्हणून ती अमूर्त विचारांच्या पातळीवर न अवतरता समूर्त साक्षात्कारी जीवन-दर्शनाच्या पातळीवर अवतरतात. नववाङ्मयाच्या भाषेत बोलावयाचे तर हेच त्यांच्या अनुभवांचे शोधलेले ' नवेनवे ' आकार असतात. हे आकार मानवी आत्म्याचे स्पंदन दर्शनाच्या पातळीवर घडवीत असतात प्रतिभावंताच्या मानवतेविषयीच्या गाढ श्रद्धेतून आणि शोधातून ते आकार कोरलेले किंवा शोधलेले असतात. ते आकार शुद्ध मानवतेचे असल्याने सुंदर असतात, मानवतेविषयीच्या शोधातून प्रेरित झाल्यामुळे ते मानवी जीवनविषयक तलस्पर्शी सत्य सांगत असतात आणि शुद्ध मानवतेविषयीची एक अदम्य श्रद्धा त्यांच्या मागे उभी असल्याने मानवीजीवनाचे मूलभूत शिवस्वरूपही हे आकार धारण करीत असतात. यापेक्षा आणखी काही ' साहित्य-सौंदर्य ' म्हणून वेगळे, स्वायत्त, स्वयंभू असते असे त्यांना वाटत नाही.

त्यांची जाणीव जेव्हा साहित्यात अनुभवाच्या पातळीवर आकारू लागते तेव्हाच त्या अनुभवाला आंगिक स्वरूपातच चैतन्य लाभलेले असते. त्या अनुभवातील पात्रे हाडामासाची माणसे होऊनच जन्म लागतात. प्रस्तुत विषयाशी संबंधित तेवढेच ती बोलू लागतात. आपल्या स्वभावाशी ती घनिष्ठपणे सुसंगत वागत असतात. त्यातूनच घटना, प्रसंग, संवाद, आरंभ, शेवट घडत असतात. ते सर्व व्यक्त करण्यासाठीच त्या साहित्यिकांची भाषा प्रसंगी संयमाने तर कधी भरभरून काव्यात्मतेने, कधी बाह्य वास्तवाला स्पर्श करीत, तर कधी मनोवास्तवाला उकलून दाखवत चाललेली असते. प्रसंगी कधी उपमा, रूपके, प्रतिमा ती वापरत असते. आवश्यक तेथे सूचक प्रतीकरूप धारण करते. हे सगळे या महान साहित्यिकांच्या जीवनविषयक जाणिवांचा भाग म्हणूनच अवतरत असते; त्यांच्या वाङ्मयविषयक जाणिवांचा भाग म्हणून ते साहित्यात 'वेगळे'पणाने, तथाकथित साहित्य-सौंदर्याच्या वेगळेपणाने जाणवत नसते. या प्रतिभावंतांना ध्यास असतो तो मानवी आत्म्याच्या जीवन-शोधाचा; नुसत्या कलात्मक साहित्य-निर्मितीचा नव्हे; असे त्यांच्या साहित्य-वाचनातूनच वाटू लागते.

माटे मास्तर, तुमची साहित्यिक वृत्ती शोधताना मला हेच तुमच्या कथांतून स्फुट रूपात पण तीव्रतेने आजही जाणवत असते. तुमच्या साहित्याचे मोठेपण या जीवन शोधातच आहे. साहित्याच्या अंगरंगी सौंदर्याविषयीची तुमची जाणीव हीच आहे. तुमच्या 'उपेक्षितांचे अंतरंग', 'माणुसकीचा गहिवर' यातून जशी ती जाणवते, तशी 'सत्यं, शिवं, सुंदरम्.' हा तुमचा लेख नीटपणे समजून घेतला तरी हीच जाणीव होते. तुम्ही उपेक्षितांच्या अंतरंगावर प्रकाश पाडणाऱ्या मोठ्या कादंबऱ्या लिहिल्या असत्या तर हीच जाणीव मला विराट रुपात जाणवू शकली असती; असे उगाचच वाटते.

साहित्याच्या अंतरंग-सौंदर्याची तुमची जाणीव जशी महान साहित्यिकाची आहे, तशी साहित्याच्या बहिरंगाची तुमची जाणीवही तेवढीच महत्त्वाची आहे. ज्या त्या समाजाचे असे एक साहित्य असते; म्हणून ते त्या समाजाला इतर कुठल्याही साहित्यापेक्षा अधिक प्रिय असते. कोणतेही साहित्य त्या समाजाचे कधी होऊ शकते ? जेव्हा ते त्या समाजजीवनातील इतिहास, पुराण, भूतकाळ, धर्म, परंपरा, रीतिरिवाज, तेथील भूगोल, हवामान, सामाजिक व सांस्कृतिक वर्तमान, ताणतणाव यांनी युक्त असते; तसेच त्याच समाजजीवनातील, जातीधर्मातील, वर्णावर्णातील विविध माणसांनी व त्यांच्या विविध परस्पर-संबंधांनी युक्त असते, जेव्हा एखादा साहित्यिक या सर्वांचा खोलवर विचार करून परस्पर-संबंध शोधतो आणि त्यातून वाङ्मयीन अनुभव आकारित करतो; तेव्हा ते साहित्य अंतर्बाह्य त्या समाजाचे असते आणि अंतिमतः तेच विश्वात्मकही असते. मानसशास्त्रीय दृष्ट्या ज्या मानवी सहजभावना (इन्स्टिंक्टस) असतात त्या सर्वच मानवाठिकाणी वसत असल्या तरी त्यांचा आविष्कार त्या त्या (वरील) समाज-वैशिष्ट्यांनी युक्त होऊन होत असतो. त्यामुळे त्या त्या समाजाच्या साहित्याचे आविष्कारसिद्ध अंग त्या त्या समाजाशी घनिष्ठपणे निगडीत असते. म्हणून ते साहित्य त्या समाजाला 'आपले' वाटत असते.

हा 'आपलेपणा' सकृत्‌दर्शनी बहिरंगी वाटत असला तरी ह्या बहिरंगाचा घनिष्ठ संबंध अंतरंगाशी असतो; हे उघड आहे. म्हणजे असे की ह्या बहिरंगाच्या आधारेच 'अंतरंग' आविष्कृत होत असते. हे 'अंतरंग' म्हणजे मानसशास्त्रीय दृष्ट्या शाश्वत स्वरुपाच्या सार्वकालिक मानवी सहजभावनाच असतात. पण त्या साहित्यात (वर सांगितलेल्या) समाजवैशिष्ट्यांशी संबद्ध होऊन

यक्त झालेल्या असल्यामुळे त्याही साहित्यरसिकाला 'आपल्या, आपल्या समाजाच्या, आपल्या समाजातील मानवी मनाच्या' वाटू लागतात व त्या त्याला अधिक स्वाभाविकपणे भिडतात, चिंतन प्रवृत्त करतात, भारून टाकतात. त्याला आपला माणूस, त्या माणसाची स्पंदने, संवेदना, वेदना कळल्याची जाणीव होत असते. कारण साहित्याचा 'आस्वाद' ही प्रक्रिया स्थलकाल-निरपेक्ष अशा तर्कज्ञानाच्या पातळीवरची नसते. तर ती जाणिवांच्या पातळीवरची असते. मानवी जाणिवांत स्थलकालातीत असे तर्कज्ञान अतिशय नगण्यस्थानी असते हे उघडच आहे. साहित्यकलेचे हे वैशिष्ट्य आहे म्हणून साहित्यकलेचे 'बहिरंग' हे साहित्याच्या आस्वादात तेवढेच महत्त्वाचे असते. उत्तम साहित्य 'अंतरंगाने' विश्वात्मकतेशी (आणि म्हणूनच त्या त्या समाज-मनाशी) निगडीत असते, तर ते बहिरंगाने त्या त्या समाज-जीवनाशी निगडीत असते. म्हणून साहित्यिकांनी आपला समाज व आपले समाजजीवन अंतर्बाह्य समजून घेतले पाहिजे त्यातील स्वत्त्व व सत्व शोधले पाहिजे. वर सांगितलेल्या गोष्टींशी साहित्यिकाने भिडले पाहिजे. त्यात अवगाहन केले पाहिजे.

साहित्याच्या ह्या बहिरंगाची महत्त्वाची जाणीव तुमच्या मनात सदैव वसत होती. तुमच्या या जाणिवेचा आविष्कार 'सांगली' येथील मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातून १९४३ सालीच झालेला आहे. खरे तर ते सगळे भाषणच आज घडीला सर्वच साहित्यिकांनी डोके ठिकाणावर ठेवून अभ्यासण्यासारखे आहे. 'आधुनिकतेच्या नावाखाली आपण परकीयांचे विनडोक अनुकरण साहित्यात आणि जीवनातही कसे करीत आहोत, पाश्चात्य ज्ञानाचे आपल्या समाजाला आवश्यक तेवढेच कलम न करता आपण त्या ज्ञानाचा उयळ अतिरेक कसा आपल्या जीवनात करीत आहोत नि आत्मभ्रष्ट होऊन जात आहोत; 'आमचे आम्हाला काही स्वतंत्र जिणे आहे, काही स्वतंत्र हवामान आहे. आमच्या म्हणून काही स्वतंत्र पीठिका आणि परंपरा आहेत, आमच्या लोकांच्या काही स्वतंत्र विचार-पद्धती आहेत आणि मनःपिंडाच्या स्वतंत्र प्रकृती आहेत' याचे भानच कसे आपल्या साहित्यिकांतून नाहीसे झाले आहे, हे तुम्ही चाळीस वर्षांपूर्वीच सांगितले आहे. प्रतिभावंतांचा मोहरा स्वकीयांकडे, समग्र समाज-जाणिवेकडे कसा घसघशीत वळला पाहिजे, हे तुम्ही त्याचवेळी जीव तोडून सांगितले आहे. या तुमच्या सांगीपाठीमागे साहित्याच्या वैशिष्ट्यपूर्ण बहिरंगाची जाणीवच प्रत्ययाला येते.

तुमचे हेच विचार आणि ह्याच जाणिवा तुमच्यावर मनापासून प्रेम करणाऱ्या, स्वतःला तुमचे वाङ्मयीन वंशज, विद्यार्थी आणि शिष्य म्हणवून घेणाऱ्या किती साहित्यिकांनी आत्मसात केलेल्या आहेत ? समाजापासून स्वतःला दूर ठेवणाऱ्या, स्वतःच्याच हस्तीदंती मनोऱ्यात मौजमजा म्हणून साहित्यनिर्मिती करणाऱ्या प्रतिष्ठितपणाची, उंचपणाची, तिन्हाईतपणाची बुद्धी ठेवणाऱ्या ज्या साहित्यिक प्रकृतीचा तुम्ही निषेध केला आहे. त्याच प्रकृतीला जपत, गोंजारत बसणारे आज तुमचे अनेक वाङ्मयीन वंशज, शिष्य व विद्यार्थी दिसत आहेत. सदाशिव पेठेत, पांढरपेशा वर्गातच त्यांच्या खुज्या जाणिवा अडकून पडल्या आहेत. परकीय वाङ्मयाचे मुखवटे बदलून आपले म्हणून खपविण्याचा उद्योग करणाऱ्या ज्या वाङ्मयीन प्रवृत्तीचा तुम्ही तिरस्कार केला आहे, त्याच निषिद्ध प्रवृत्तीचे उपासक झालेले तुमचे वाङ्मयीन वंशज आज दिसतात. वर आणि तुमच्याच वन्सीघराच्या, लेंगऱ्याच्या माळावरून आम्ही आलेली पोरे आहोत, असे म्हणून स्वतःला दांभिकपणे मिरवतात. रामदासांचा जसा त्यांच्या परमार्थवादी शिष्यांनीच पराभव केला आहे, तसा तुमच्याच तथाकथित कलावादी शिष्यांनी तुमचा पराभव केलेला दिसून येतो, ही तुमची आज साहित्यक्षेत्रात झालेली शोकांतिका आहे. तुमच्या वाङ्मयीन शिष्यांना व वंशजांना तुमची नीट वाङ्मयीन प्रकृतीही कळली नाही आणि 'साहित्यातील अंतर्बाह्य सौंदर्यही' कळले नाही असे दुर्दैवाने म्हणावेसे वाटते. तुम्ही मास्तर होता. तुमच्या अंगात साताराचे पाणी होते. तुमच्या झुपकेदार मिशांत आणि बारीक डोळ्यांत ते जाणवते. विद्यार्थी चुकला की त्याच्या 'थोतरी'त देण्याची परंपरा निश्चितपणे तुमच्या वेळची शिक्षक मंडळी पाळत होती. त्याशिवाय विद्यार्थीही ठिकाणावर नीटपणे येत नसत, अशी तुमची धारणा होती. म्हणून असे वाटते की, तुम्ही जर आज असता आणि या तुमच्या वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांनी व शिष्यांनी जर तुमच्या ज्ञानाचे असे खोबरे केलेले पाहिले असते तर तुम्ही त्यांच्या 'थोतरीत' थाडदिशी दिली असती आणि पुन्हा एकदा गिजवटलेली त्यांची पाटी संपूर्ण पुसून तुमचे साहित्य आणि तुमचे विचार फिरून नीटपणे वाचण्यास सांगितले असते आणि त्यांना 'खबरदार!' केले असते. ■

# समाजमनस्क, विचारशील आत्मचरित्राचा मानदंड / स. शि. भावे

कै. प्रा. श्रीपाद महादेव ऊर्फ बापूसाहेब माटे यांची जन्मशताब्दी यंदा इंग्रजी तारखेप्रमाणे ३१ ऑगस्ट, ८६ या दिवशी येत आहे. या निमित्ताने त्यांच्या आत्मचरित्र-ग्रंथाचे पुन्हा एकदा वाचन केले. वाचताना पूर्वीप्रमाणेच याही वेळी अनुभव आला. तो हा की, लेखकाची प्रतिज्ञा लेखनात बहुतेक प्रमाणात सफळ झालेली आहे.

'चित्रपट' हे या ग्रंथाचे बाहेरचे मोठे नाव आहे. कंसातले छोटे नाव 'मी व मला दिसलेले जग' असे आहे. आपल्या एक्काहत्तराव्या वाढदिवशी माटयांनी ग्रंथ पुरा केला आहे. 'प्रास्ताविका' खालची तिथी 'भाद्रपद शु. द्वितीया, शके १८७९' अशी केवळ हिंदू पंचांगाच्या भाषेत दिली आहे. १२+४५२ क्राउन पृष्ठांचा हा ग्रंथ श्री. स. कृ. पाध्ये यांनी आपल्या व्हीनस प्रकाशनातर्फे सुबक रूपात प्रसिद्ध केला आहे. 'सर्व हक्क प्रकाशकांचे स्वाधीन' अशी नोंद आहे. आनंद मुद्रणालयाचे श्री. य. गो. ऊर्फ दादासाहेब जोशी यांची छपाई जवळ जवळ निर्दोष आहे. 'मी व मला दिसलेले जग' यातील नपुंसकलिंगी एकवचनी 'ले', आणि 'आवृत्ती पहिली' मधील पहिली 'त्ति' यातील कटाक्ष हा माटयांनी लेखनात, जोशांनी मुद्रणात आणि पाध्यांनी प्रकाशनात ठेवलेला दिसतो. असा कटाक्ष अलीकडे विरळा दिसतो. म्हणून येथे त्याचा आदरपूर्वक उल्लेख केला आहे.

माटयांनी आपल्या या 'चित्रपटां'ची– Picture gallery–रचना विचक्षण जाणिवेने आणि पराकाष्ठेच्या जबाबदारीने केली आहे. "'मी व मला दिसलेलं जग' ही प्रदीर्घ लेखमाला, माझे एके काळचे शिष्य श्री. दत्तप्रसन्न काटदरे, यांनी आपल्या वसंत मासिकात अंकामागे अंक" प्रसिद्ध केली, व ती 'विस्तारभयास्तव थोडा थोडा वगळून' ग्रंथरूपाने येत आहे, असे माटयांनीच प्रास्ताविकात सांगितले आहे. या चित्रपटाच्या एकूण आटोपाविषयी अखेरीला त्यांनी असे लिहिले आहे. "या चित्रपटात अमुक यावयास हवे होते ते आले नाही, तमुक यावयास नको होते ते आले, असे अनेक वाचकांना वाटण्याचा संभव आहे. तसेच आत्मवृत्तही मला सगळे देता आलेले नाही. पण किती लिहावयाचे, व प्रकाशकांनी किती भार उचलावयाचा, यालाही काही मर्यादा असते. म्हणून, महत्त्व, रुची व उपयुक्तता यांकडे लक्ष देऊन जेवढा तपशील सांगता आला तेवढा सांगितला आहे. नव्या पिढीतील तरुणांना गेल्या अर्धशतकाची ओळख या चित्रपटदर्शनाने बऱ्या प्रकारची होईल, असा माझा अंदाज आहे." (पृ. ४५१–५२)

माटयांचा आत्मचरित्र लेखनाचा हेतू समाजाचा इतिहास लिहिण्याचा आहे, हे येथे स्पष्ट झाले आहे. यात वैयक्तिक, कौटुंबिक आणि सामाजिक अशी तीन वर्तुळे आहेत. मात्र, सामाजिकाच्या पोटात कौटुंबिक, आणि कौटुंबिकाच्या पोटात वैयक्तिक, अशी सामाजिक दृष्टीची रचना आहे. सध्याच्या परिभाषेत बोलायचे तर, जसे माटयांचे चरित्र, जसे त्यांचे वाङ्मय, तसेच त्यांचे प्रस्तुत आत्मचरित्रदेखील सामाजिक बांधिलकीच्या व्रतस्थ भूमिकेने लिहिले गेले आहे.

माटयांचा जन्म १८८६ चा. ते एक वर्षाचे होतात तो त्यांचे वडील वारले. नंतर त्यांची आणि त्यांच्या कुटुंबाची केवळ परवड झाली. नातेवाइकांच्या आश्रयाने, अर्ध्याभरल्या पोटाने आणि फाटक्या कपडयांनी त्यांनी शिक्षण पुरे केले. त्यांच्या मातोश्री आणि थोरले बंधू यांचा आधार होता म्हणून एवढे तरी शक्य झाले. अर्थात हे शिक्षण थांबत थांबत व्हावे यात आश्चर्य नव्हते. वयाच्या विसाव्या वर्षी, १९०७ साली, साताऱ्च्या न्यू इंग्लिश स्कूल-मध्ये सीतारामपंत देवधरांनी त्यांना शिक्षकाची नोकरी दिली. तेव्हापासून सेवानिवृत्त होईतो माटयांनी आधी शिक्षक आणि नंतर प्रोफेसर म्हणून अध्यापनाचे

काम अखंडपणे केले. तोपावेतो ते एफ. वाय. ची परीक्षा उतरले होते. न्यू इंग्लिश स्कूल, नू. म. विद्यालय, स. प. महाविद्यालय असे टप्पे गाठताना त्यांनी एम. ए. ची पदवीही मिळवली. पण वयाच्या तिशीत, १९१५ साली. किती जिद्दीने माटयांनी प्रतिकूल परिस्थितीवर मात केली, आणि तरी आपली तडफ मऊ पडू दिली नाही, हे मुळातच वाचायला हवे.

या प्रतिकूल अनुभवांनी, आणि स्वतःच्या चिंतनाने त्यांना अस्पृश्य-सुधारणेकडे अचूक वळवले. १९१७ ते १९३७ ही वीस वर्षे त्यांनी या कार्याला दिली. म्हणजे ऐन उमेदीची वर्षे दिली. नंतरची वीस वर्षे ही त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाची. १९५७ साली प्रस्तुत आत्मचरित्र हे आपले शेवटचे पुस्तक त्यांनी हातावेगळे केले. आणि सुमारे तीन वर्षांच्या कॅन्सरच्या यातनातून २५ डिसेंबर १९५७ रोजी ते कायमचे मुक्त झाले.

घडणीची तीस आणि कर्तृत्वाची चाळीस असे सत्तर वर्षांचे आयुष्य माटयांनी भोगलेही; आणि ही सत्तर वर्षे कायावाचामनाने ते समाजासाठी झिजले देखील. आस्वाद, चिंतन आणि सेवा या तीन प्रवृत्तींना माटयांनी कधी विराम दिला नाही की या प्रवृत्ती एकदाच्या सोडाव्या एवढा वैताग त्यांनी कधी अनुभवला नाही. धीरगंभीर कर्तव्यपरायणता आणि मिस्किल रसिकता यांचे मोठे रुचकर मिश्रण त्यांच्या स्वभावात झालेले होते. त्यांची प्रत्यक्ष आणि लिखित, दोन्ही चरित्रे या मिश्रणाने कमालीची मिष्ट झाली आहेत.

माटयांनी वर्णन केलेल्या इतिहासातला मोठा भाग हा देशाचा-महाराष्ट्राचा १८९५-१९५५ या साठ वर्षांच्या काळातला राजकीय इतिहासाचा आहे. लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांची दोन युगे या काळात आली आणि गेली. दोन्ही युगांचे आणि दोन्ही नेतृत्वांचे मार्मिक निरीक्षण माटयांनी नोंदले आहे. स्वतः माटे समाजसुधारक होते. परंतु, स्वातंत्र्याच्या लढयात सामील झाल्याशिवाय त्या काळात कोणत्याच सामाजिक-सांस्कृतिक उठावाला यश येणे शक्य नव्हते, हा वास्तव निकर्ष त्यांनी नोंदला आहे. लोकमान्यांच्या निधनानंतर, महात्माजींच्या नेतृत्वाशी एकीकडे शक्यतो जुळवून घ्यायचे, परंतु, दुसरीकडे बुद्धिवादी युक्तिवादाची निष्ठाही कायम ठेवायची, अशी तारेवरची कसरत तात्यासाहेब केळकरांनी कशी केली याचे मोठे गुणग्राहक वर्णन माटयांनी केले आहे. तथापि, इंग्रजांवर बेधडक चालून जाण्याचा महात्माजींचा गुणच अखेरीस प्रभावी ठरला; पं. मोतीलाल नेहरू, चित्तरंजन दास, काकासाहेब खाडिलकर, गंगाधरराव देशपांडे हे पुढारी या गुणावर लुब्ध होऊन महात्माजींकडे कसे गेले; केळकर कसे एकटे पडले;—हेही निःपक्ष वृत्तीने त्यांनी सांगितले आहे.

संस्कारांनी, विचाराने आणि अनुभवाने माटयांची दृष्टी हिंदुत्ववादी झाली होती हे स्वतः माटयांनीच सांगितले आहे. महात्माजींचे मुस्लिम अनुनयाचे धोरण अतिरेकी झाले व शेवटी अंगाशी आले असे त्यांचे मत त्यांनी दिले आहे. पूर्वीच्या मोठ्या हिंदुस्थानची फाळणी व्हायलाच हवी होती; मात्र, लोकसंख्येची अदलाबदल व्हायला हवी होती; असा विचार त्यांनी मांडला आहे.

माटयांच्या या विचाराचे वैशिष्टय आजही लक्षात घेण्याजोगे व लक्षात ठेवण्याजोगे आहे. माटे स्वतःचा विचार स्वतंत्रपणे करतात. विचाराच्या स्वतंत्रपणाविषयी त्यांना विशेष आवड आहे; आणि या स्वतंत्रपणासंबंधी त्यांचा खास आग्रह आहे. हिंदुत्वनिष्ठ असल्याने ते गांधीवादी, समाजवादी, कम्युनिस्ट यांच्यापासून दूर राहिलेच; भर म्हणजे, ही हिंदुत्वनिष्ठा खास स्वतःची असल्यामुळे, हिंदुमहासभा, रा. स्व. संघ, सावरकर मुंजे, शंकराचार्य यांच्यापासूनही ते दूर राहिले. एकाकी निष्ठेने ते स्वतःचा विचार करीत, मांडीत व आचरीत राहिले.

माटयांनी आपले अस्पृश्यता-निवारणाचे कार्य १९१७ पासून वीस वर्षे निरलसपणाने आणि अंगमोड व पदरमोड करून केले. अक्षरशः घरचे खाऊन त्यांनी या कार्याच्या भाकरी भाजल्या. महात्माजी, स्वातंत्र्यवीर सावरकर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर इत्यादिकांच्या आधी माटयांनी हे कार्य सुरू केले. त्यासाठी 'महार माटे', 'म्हारडा माटे' अशी तत्कालीन दूषणे बिरुदांसारखी त्यांनी मिरवली; 'अस्पृष्टांचा प्रश्न' यासारख्या माहितीपूर्ण ग्रंथाचा मांड मांडला; नंतर खासदार झालेले पां. ना. राजभोज यांच्यासारखे कार्यकर्ते हाताशी धरून तयार केले. वस्त्यांत शाळा काढल्या; वस्त्या स्वतः झाडू घेऊन स्वच्छ केल्या... तथापि, एवढे सारे करून दलित चळवळीत, विचारात किंवा इतिहासात माटयांचा उल्लेख विशेष गौरवाने होतोच असे नाही, बहुधा होतच नाही, अशी आजची स्थिती आहे.

या उपेक्षेबद्दल माटयांची स्वतःची काहीच तक्रार नाही. आजवर त्रैवर्णिकांनी पूर्व-शूद्रांवर एवढा अन्याय केला आहे, तर त्याचे प्रायश्चित्त सध्याच्या सवर्णांनी

पश्चात्तापवृत्तीने केले पाहिजे अशी त्यांची दृढ भूमिका होती. या सेवाकार्यातून फलाची कसलीही अपेक्षा ठेवू नये, या निष्ठेतून, भारतीय पातळीवरील चालून आलेला मोठेपणाही त्यांनी सुखाने दवडला. माटयांची स्वतःची भूमिका अशी चोख असली तरी, समाज म्हणून आपल्या कृतज्ञतेचे काय, असा प्रश्न उरतोच. या प्रश्नाची अनेक उत्तरे संभवतात. तथापि, माटयांची स्वतंत्र भूमिका हे त्यांतील एक महत्त्वाचे उत्तर ठरू शकेल, असे वाटते.

"मी हिंदुत्वाचा अभिमानी, ही गोष्ट खरी– तसे नसते तर अस्पृष्ट बांधवांची सेवा माझ्या हातून झालीही नसती." (पृष्ठ ४२६) असे माटयांनी स्वतःविषयी म्हटले आहे. भूमिका हिंदुत्वनिष्ठ आणि मार्ग विधायक सेवेचा या दुहेरी विशेषांमुळे ठाम अशा दोन्ही पक्षांना माटे अगदी आपल्यातले वाटू शकले नाहीत. थेट शंकराचार्यांपर्यंत माटयांनी आपल्या भूमिकेचा नेट लावला. म्हणून ते माटयांना तसे दूरचेच समजू लागले. उलटपक्षी, परंपरागत हिंदू धर्म आणि समकालीन शास्त्रीपंडित यांसंबंधी आदराची आणि नम्रतेची वृत्ती बाळगल्यामुळे ते अस्पृष्टांना अगदी आपले वाटेनात. मांसाशन वर्ज्य असल्याने अनेकांना, हे गृहस्थ खरे सहभोजन करीत नाहीत, या संभ्रमाने ग्रासले हे स्वतः माटयांनी लिहिले आहे. या तारतम्याने आपणांवर 'इन्सिन्सिरिटी'चा आरोप झाला असेही माटयांनी विषादाने लिहिले आहे. १९३७ च्या सुमारास त्यांनी हे कार्य आपण होऊन सोडले. त्यावेळी आपण, आपल्या पद्धती, काळाच्या मागे पडू लागल्याची जाणीव त्यांना झाली होती.

अस्पृष्टांच्या प्रश्नाबाबत महात्माजींशी त्यांचा जो मतभेद झाला त्याविषयी माटयांनी सविस्तर लिहिले आहे. अशा नाजूक बाबीत उपोषणाची भीती घालून नेत्याने साधारणजणांना दुखवू नये, त्याने खरा बदल होणार नाही असा आपला अभिप्राय त्यांनी, महात्माजींना लिहिलेल्या अनावृत्त पत्रात, परोपरीने आळवून सांगितला आहे. माटयांच्या खास शैलीचा उत्कर्ष या प्रकट पत्रात पाहायला मिळतो. मात्र, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसंबंधी जरी त्यांनी अतीव गौरवाचे उद्‌गार काढले असले तरी त्यांच्या चळवळीसंबंधाने या ग्रंथात बव्हंशी मौनच पाळलेले आहे. डॉ. आंबेडकरांचे सत्याग्रह, त्यांची येवल्याची घोषणा, वीस वर्षांनंतरचे धर्मांतर त्यांचे महानिर्वाण– यांविषयी माटयांनी काही लिहिलेले नाही. असे दिसते की समन्वयवादी सुधारक म्हणून त्यांची गरज चळवळीला नंतर नंतर भासेनाशी झाली. इतिहासक्रमाने वाटयास आलेली ही उपेक्षा माटयांनी अलिप्त होऊन पत्करली खरी. पण स्वभाविकपणेच त्यांना ही उपेक्षा झोंबली असणार. यामुळेच की काय, १९३७ नंतर त्यांनी या क्षेत्राचे नाव टाकले ते टाकलेच.

हिंदुत्वाच्या अभिमानानेच माटयांना अशी तळमळ होती की, हिंदू समाजाने आधुनिक व्हावे आणि त्यासाठी विज्ञाननिष्ठ व्हावे. यासाठी त्यांचा मार्ग शिक्षकाचा आणि संशोधक संपादकाचा सहजच ठरला होता. चळवळीचा, अथवा आलेली चाकोरी पुरती सोडण्याचा मार्ग त्यांनी बाजूला ठेवलेला दिसतो. या मार्गाचे महत्त्व ते जाणतात. या मार्गाचा गौरव त्यांनी अनेकदा केला आहे. परंतु स्वतः माटे या मार्गापासून दूर राहिलेले दिसतात.

त्यांची दारिद्र्याची, कष्टाची पार्श्वभूमी आणि तीवर निश्चित झालेली त्यांची सावध, गृहस्थाश्रमी भूमिका– या गोष्टी त्यांच्या मार्गाबाबत निर्णायक ठरलेल्या दिसतात. माटयांच्या प्रतिक्रिया आणि भूमिका ठाम, आग्रही आणि तीव्र असत. तथापि त्यांच्या सामाजिक आविष्कारात माटे फार सावध असत. सरकारचा, अथवा लोकांचा, रोष आपल्यावर फार तीव्रतेने उलटून पडू नये, यासाठी ते एखादी तरी माघार घेण्याची वाट आधीपासून योजून ठेवीत, प्रसंग पडल्यास ती वापरीतही. त्यांना अश्लील वाटलेल्या नाटकांचे प्रयोग त्यांनी बंद पाडले. त्यावेळच्या व्यूहांचे जे वर्णन माटयांनी स्वतःच लिहिले आहे, त्यात ही हिकमती वृत्ती दिसते. स्वतःचा कल आणि स्वतःची मर्यादा यांची माटयांना उत्तम कल्पना होती. त्यांनी स्वतः लिहिले आहे. "आपण जर अजून अभ्यास करीत आहोत, आणि गरिबीतून नुकतेच वर येत असलेला आपला वडीलभाऊ आपल्यासाठी एवढी प्रापंचिक गैरसोय सोसीत आहे, तर आपण या लिखाणाशी काही संबंध न ठेवणेच बरे, असे मला वाटू लागले." (पृष्ठ १०९) त्याच सुमारास 'अभिनव भारत' मंडळात सामील व्हावे असे कोणी त्यांना सुचविले. त्यावेळी, 'विचार करून तुम्हाला सांगतो.' असे म्हणून माटयांनी ते टाळले. या प्रसंगासंबंधी माटे लिहितात, "मी बरा धूर्तपणाने वागलो असे मला पुढे वाटले. या मंडळाच्या प्रतिज्ञा आणि त्यांच्या कार्याच्या पद्धती यांना मी पुरा पडलो असतो, असे मला वाटत नाही." (पृष्ठ १०९).

माटचांच्या या निवेदनातील प्रांजळपणाचा खरोखर गौरव करावासा वाटतो. सर्वसाधारणपणे आत्मचरित्रात आत्मगौरव आढळतो. नाशिकचा काळाराम सत्याग्रह असो, वेचाळीसची चलेजाव चळवळ असो, संयुक्त महाराष्ट्राचा लढा असो की गोवाविमोचनाचा सत्याग्रह असो, मी तेथे होतोच असेच वाचावे, व बहुधा ऐकावे लागते. या 'नमकशास्त्री'य वृत्तीच्या तुलनेने तर माटचांचा प्रांजळपणा चांगलाच झळाळून दिसतो. तो केवळ प्रांजळपणा राहत नाही, तर मनाचा मोठेपणा ठरतो.

माटचांच्या या अंगभूत सावधपणात त्या काळच्या मध्यमवर्गीय कार्यकर्त्यांच्या कार्यधर्माचा एक आदरणीय विशेष देखील मिसळलेला आहे. हा धर्म म्हणजे अक्षरश: 'घरचे खाऊन लष्करच्या भाकरी भाजणे' या तत्त्वाचा धर्म. स्वत:च्या कुटुंबाचा चरितार्थ साधेपणाने पण स्वाभिमानाने चालावा यासाठी स्वत:चा काही पूर्णवेळ व्यवसाय करायचा. आणि नंतर शक्य तितका वेळ आवडत्या समाजकार्यासाठी द्यावयाचा. काहींच्या बाबतीत हा नंतरचा वेळ देखील पूर्णवेळ असे. अशा रीतीने दोन पूर्ण वेळचे काम करणारे कार्यकर्ते त्यावेळी महाराष्ट्रात, व देशातही, बरेच होते. स्वत: माटचांवर ज्या साताराचे संस्कार लहानपणी झाले त्या सातारा शहरातच त्यावेळी अशी दहाबारा मंडळी होती. त्यांचा उल्लेख माटचांनी केला आहे. माटचांनी हाच मार्ग स्वीकारला. शिक्षक म्हणून मिळणारा १२० रुपये पगार आणि क्लासवर मिळणारे मासिक अडीच-तीनशे रुपये असे 'चळचळीत' उत्पन्न माटचांनी केवळ पराकाष्ठेच्या कष्टांनी साध्य केले; त्यांतले काही चळवळीला देखील वापरले. पत्नीला सोन्याचे दागिने केले नाहीत, हा तपशील त्यांनी प्रसंगाने नोंदून ठेवला आहे.

हौशी (amateur) कार्यकर्त्याचा हा धर्म माटचांनी आयुष्यभर टिकवला, आणि मानाने मिरवला. विचारात काय, आचारात काय, कोणाची तावेदारी नको हा कटाक्ष ठेवला. हल्ली हे सारे बदलले आहे. कार्यकर्त्यांपासून खेळाडूंपर्यंत सारे पूर्णवेळचे व्यावसायिक झाले व होत आहेत. अर्थातच, सारेजण एका व्यावसायिक यंत्रणेचे गुलाम होत आहेत. दोष कोणाचा, हा नैतिक प्रश्न या या यंत्रणेने सोपा केला आहे. 'सारा दोष या यंत्रणेचा (system चा) आहे.' असे म्हणून कोणासही यंत्रणेकडे दोष लोटून मोकळे होता येते. माटचांच्या काळात ही यंत्रणा नव्हती; वेतन, पेन्शन, सुविधा अशी यंत्रणेची प्रलोभने नव्हती; हे सारे नव्हते म्हणून असेल कदाचित, पण या प्रलोभनांचा मोहही नव्हता. म्हणून कार्यकर्ते स्वाभिमानी, स्वतंत्र, प्रतिभाशाली होते. त्यांचे कार्य भरीव आणि टिकाऊ होत असे.

ज्ञानाच्या क्षेत्रात माटचांनी असे भरीव आणि टिकाऊ कार्य भरपूर केले. 'केसरी-प्रबोध' 'सांवत्सरिक', 'विज्ञानबोध' इत्यादी त्यांच्या उपक्रमांची यादी येथे देण्याची गरज नाही. ते उपक्रम इतिहासात नमूद आहेत आणि ज्ञानाची इच्छा धरणारांस माहीत आहेत. परंतु, ही कार्ये माटचांनी कशी उभी केली, व्याप कसा मांडला, कार्याचा नकाशा प्रत्येक वेळी कसा तयार केला, पठडी कशी ठेवली, माणसे कोणती व कशी शोधली व जमवली, ठरलेल्या मुदतीत कामे पुरी कशी केली— याचा जो तपशील माटचांनी पुरवला आहे तो महत्त्वाचा आहे. अशा प्रकारची कामे ज्या कोणास अंगावर घ्यायची असतील त्यांनी माटचांनी कथन केलेल्या हकीकतींचे मनन करावे असा हा तपशील भक्कम आणि चिंतनाने भरलेला आहे.

स्वयमेव मृगेन्द्रता हा माटचांच्या अंगचा पुढारीपणाचा गुण त्यांच्या अस्पृश्यनिवारणाच्या कार्याप्रमाणेच या ज्ञानकार्यातही दिसतो. त्यांच्या या कार्यास मार्गदर्शन करण्याची इच्छा एकदा डॉ. केतकरांनी व्यक्त केली. या संबंधी माटचांनी लिहिले आहे, "त्यांनी केलेली सूचना मला मुळीच मानवली नाही. ग्रंथ तयार करावयास लागणारी आवश्यक तेवढी बुद्धी आणि कचेरी चालववयास लागणारा आटोप ही आपल्या अंगी आहेत हे माझे मला माहीत होते." (पृष्ठ ३५३-५४). या आत्मप्रत्ययातूनच माटचांनी डॉ. केतकरांना नम्रतेने व खेदाने दिलगिरी कळवली. या कार्याचे विवरण करताना त्यांनी स्वत:संबंधी मोकळेपणाने जे लिहिले आहे ते विचार करण्यासारखे आहे. त्यांनी लिहिले आहे, "माझ्या स्वभावात एक गुण किंवा दोष काही तरी आहे. माझ्याकडे एखादे काम सोपविताना माझ्या सामर्थ्याविषयी कोणी आपले मत खुशाल बनवावे, त्या कामाचे स्वरूपही मला उलगडून सांगावे; पण मला ते पटून मी एकदा उद्योगाला लागल्यानंतर पुढे दुसरे कोणी यात ढवळाढवळ करू लागले तर ते मला खपत नाही. मग ते कोणीही असो. म्हणून काम हाती घेण्यापूर्वी मी या गोष्टीचा स्वच्छ खुलासा करीत असे." (पृष्ठ ३५१)

एखाद्या लष्करी जनरलसारखी माटचांची ही शिस्त

आहे. अशी शिस्त असली तरच सामूहिक आणि मोठी कामे तडीला जातात, एरवी रेंगाळत राहतात, हे आपण पाहतो आणि जाणतो. ज्ञानकार्याप्रमाणे माटयांनी सांस्कृतिक संघटनात्मक कार्यदेखील भरपूर केले. वसंत-व्याख्यान-मालेची चिटणीशी त्यांनी निभावली; 'समाज-विचारमंडळ' स्थापून चर्चा केल्या; महाराष्ट्रभर फिरून व्याख्याने दिली आणि वक्ता म्हणून आपला ठसा उमटवला. या कार्यातही माटयांनी आपली ही शिस्त कायम ठेवलेली दिसते.

त्यांच्या वैचारिक आणि ललित लेखनाचा आटोप विस्तृत आहे. त्याचीही यादी देत बसत नाही. परंतु, या लेखनाचा प्रपंचही माटयांनी शिस्तीने केला. त्याच शिस्तीने या उपक्रमांची नोंद केली आहे. या नोंदीत, योजलेल्या परंतु अपुऱ्या राहिलेल्या योजनांचा खेदपूर्वक उल्लेख आहे. तसाच, स्वतःच पुस्तके प्रसिद्ध करावीत, त्यात प्राप्ती अधिक, असा व्यवहारदक्ष उल्लेखही आहे. आपल्या लेखनाचा दर्जा, त्याची रसवत्ता आणि परिणामकारकता याचा असावा तेवढा अभिमान माटयांना आहे. तथापि, या लेखनात आणि त्याच्या आवेगात, ते रुतून रमले आहेत, असे निवेदनात सहसा आढळत नाही. नाही म्हणायला, काव्याच्या स्वतः केलेल्या व्याख्येसंबंधाने त्यांना थोडे अधिक प्रेम आहे.

साहित्याच्या सांस्कृतिक क्षेत्रात त्यांनी जे कार्य केले ते करतानाही त्यांनी संयम ठेवला आहे आणि आत्मश्लाघा टाळली आहे. "१९४३ सालच्या नोव्हेंबर महिन्यात सांगली येथे भरलेल्या साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष मी झालो !" हे सांगितल्यावर, "हा माझा फार मोठा मान झाला, यात शंकाच नाही. अखिल महाराष्ट्रातील सुशिक्षित समाजाच्या हाती एखाद्याला देण्याचा जो सर्वश्रेष्ठ मान आहे, तो हाच होय." एवढाच मोठेपणा सांगितला आहे. मामा वरेरकर, माडखोलकर, के. पी. कुलकर्णी, माधवराव अळतेकर व माटे अशी पाच नावे सांगलीच्या स्वागतमंडळासमोर होती हे त्यांनी सांगितले आहे. आणि जोडीला, मतांची वळकट संघटना करण्याचा आपला गुण चिटणीसांनी नाव सुचवताना लक्षात ठेवला असावा, असा विनोदाचा छेदही दिला आहे. संयमाने आणि खेळीमेळीने केलेल्या या निवेदनात फक्त एकाच ठिकाणी माटयांनी संतापून लिहिले आहे. त्यांची वाङ्मयेतिहासाची महत्त्वाकांक्षी योजना म. सा. परिषदेच्या साधारणसभेने वदलावी, हे त्यांना अजिबात सहन झालेले नाही.

स्वतःच्या पत्रकारी लेखकाची हकीकत सांगताना मात्र त्यांची भूमिका समर्थनाची अधिक आहे. कदाचित पत्रकारी भूमिकेमुळे असे झाले असावे. महात्माजी, पंडितजी यांच्याविषयी प्रतिकूल आणि चेष्टेने लिहिल्याबद्दल त्या त्या वेळी त्यांना बऱ्याच प्रमाणात विरोध आणि निंदा सहन करावी लागली, काही दिवस विनाचौकशी कारावासही पत्करावा लागला. या प्रसंगाबाबतची त्यांची प्रतिक्रिया दुहेरी आहे. आपल्या खास कमावलेल्या लेखन कौशल्यातूनही आपण कसे सापडलो याची खंत त्यांना एका बाजूला वाटते. तर, जनसाधारण म्हणून जे एक निराकार अस्तित्व असते, त्याच्या चंचलतेचा धसका त्यांना दुसऱ्या बाजूला जाणवतो. वृत्तपत्रातील स्तंभलेखनाच्या आपल्या शैलीसंबंधी माटयांनी थोडया अभिमानानेच लिहिले आहे. "कचाटयात न सापडता, वळणे घेऊन दुरान्वयाने सुचवून, अर्धवट उपरोधाच्या शब्दांनी टीका कशी करावी, व तिला साजेशी भाषा कोणती लिहावी, याचे कसब माझ्या मते कोठारी व मी यांना सारखेच साधले होते.' (पृष्ठ ४३९) विष्णुशास्त्री चिपळूणकर, अच्युतराव कोल्हटकर, शिवरामपंत परांजपे यांच्या लिखाणाचा माटयांनी बारकाईने अभ्यास केला होता. यांच्या लेखनातील हवे ते गुण निवडून, त्यांच्यावर स्वतःच्या सावध धूर्तपणाचा संस्कार करून त्यांनी स्वतःची खास शैली विकसित केली होती. त्यांच्या एका भांडणात प्रतिपक्षी व्यक्तीने असे उद्गार काढले होते, 'माटयांची माझी मैत्री संपली.' दुसऱ्या दिवशीच्या 'प्रभात'मध्ये माटयांनी आपल्या खास शैलीत उत्तर दिले, "माझे बाजूने केवळ परिचय होता, मैत्री नव्हती. अर्थात, जी नव्हतीच ती मैत्री संपण्याचा प्रश्नच उद्भवत नाही." अशा या आपल्या शैलीची गोळी लागू नये, लोकभावनेने तिचा पराभव करावा ही गोष्ट माटयांच्या मनाला विशेष लागावी, हे स्वाभाविक म्हटले पाहिजे. या प्रकरणी स्वतःला छळणाऱ्या लोकांसंबंधी लिहिताना जनताजनार्दनाविषयीचे आपले मत त्यांनी दिले आहे. ते म्हणतात, "सध्या त्या लोकांची जी तिरपीट उडाली आहे, आणि त्यांचा समाजात जो तिरस्कार होत आहे तो पाहिला, म्हणजे जनताजनार्दन किती लहरी स्वभावाचा असतो, आणि म्हणून कोणीही त्याच्या या लहरखोर स्वभावाचा

उपयोग आपल्या मर्जीसाठी करून घेऊ नये, हे शहाण्या माणसाच्या मनावर तरी चांगले ठसते." (पृष्ठ ४४०)

हे चरित्र वाचताना मनावर हे ठसते की आपली ही आवडती पत्रकारी शैली माटयांनी या ग्रंथात कटाक्षाने बाजूला ठेवली आहे, आणि ज्ञानग्रंथाची दृष्टी व शैली अंगिकारिली आहे. या ग्रंथात कोणाचीही व्यक्तिगत निंदा नाही. काही ठिकाणी सूचक खटयाळपणा आहे. पण तो निंदेच्या पातळीवर उतरलेला नाही. प्रतिकूल अभिप्राय जेथे आहेत तेथे ते साधार व काही तात्त्विक भूमिकेवरून व्यक्त केले आहेत. इतरांच्या गुणांची दाद ठिकठिकाणी दिली आहे. ती देताना कुचराई केलेली नाही की कमतरता ठेवलेली नाही. एकूणच, प्रौढ, परिपक्व दृष्टीने भारदस्त, आणि सहृदय समंजस वृत्तीने रसपूर्ण, असे हे निवेदन वाचकाला अनेक प्रकारचे ज्ञान देते, आणि ज्ञान देता देता सुखवते. तत्कालीन अनेक वड्या मंडळींची रोचक व्यक्तिचित्रे माटयांनी रेखाटली आहेत. एक उदाहरण पाहावे. पृष्ठ ६२ व ६३ वर रँग्लर परांजप्यांचे चित्र नमुनेदार उतरले आहे. त्यातला हा छोटा मासला पाहावा. "ते लांब लांब मिशा ठेवीत, आणि योग्य ते उपचार करून त्यांची टोके डोळयाकडे वळवीत...व्यासपीठावर त्यांचा थयथयाट फार असे. मागे सरकणे, पुढे सरकणे, आजूबाजूला वळणे, मोहरा फळयाकडे करणे, पुन्हा गिरकी घेऊन तो विद्यार्थ्यांकडे वळवणे, डावा हात मध्येच केव्हातरी कंबरेवर ठेवणे, दोन हात टेबलाच्या दोन टोकांवर ठेवून फळयाकडे रोखून पाहणे, कदाचित् झालेली चूक लक्षात आल्याबरोबर फळयाकडे तुटून धावणे असले प्रकार रँग्लर परांजपे फार करीत." (पृष्ठ ६३)

अशी जिवंत आणि रोचक वर्णने या ग्रंथात ठिकठिकाणी आहेत. माटयांना आवडणारे सातारा गाव असो, त्यांच्या काळचे पुणे असो, त्यांच्या वेळच्या विद्यार्थ्यांचा दिनक्रम असो, अण्णासाहेब भोपटकर असोत की अच्युत बळवंत कोल्हटकर असोत, अनेक स्थळे, माणसे, अनेक प्रकारचे प्रसंग, असा सारा पट चिकित्सेने आणि अलिप्तपणे क्वचित किलकिल्या नजरेने बघण्याची माटयांना आवड आहे. शिवाय त्यांच्याजवळ मिष्ट आणि खमंग शैली आहे. यांच्या संयोगाने माटयांना दिसलेले जग त्यांनी रसरशीतपणाने उभे केले आहे. त्यांची प्रतिज्ञा त्यांनी आटोकाट पुरी केली आहे.

एकूणात विचार करताना मात्र माटयांची दृष्टी गंभीर आणि सामाजिक अधिक आहे असेच म्हणावे लागते. बहुधा यामुळे, त्यांची त्यांनी अनेक क्षेत्रे निरीक्षणाच्या कक्षेत बाहेरच ठेवली आहेत. कौटुंबिक आणि वैयक्तिक तपशीलदेखील आवश्यक तेथे, आणि सामाजिक महत्त्वाच्या दृष्टीने दिलेले आहेत.

स्वतःच्या मातोश्रींसंबंधाने पराकाष्ठेचा आदर त्यांनी वेळोवेळी प्रकट केला आहे. वैधव्य कोसळल्यावर त्यांनी जे धैर्य, जी चिकाटी दाखविली, त्या गुणांचा त्यांनी नमन करून गौरव केला आहे. तथापि, अति वार्धक्याने काय होऊ शकते याचीही नोंद माटयांनी केली आहे. आणि, "हाच म्हातारपणचा दोष असला, आणि तो अटळ असला, तर अतीव म्हातारपण येऊ नये, हेच खरे आहे." (पृष्ठ ४०७) असे तत्त्व गंभीरपणाने सांगितले आहे. दुसऱ्यास, अगदी जवळच्या नातेवाइकास सुद्धा, उचलून मदत करावी, पण जोडकुटुंब टाळावे, ते सुखाचे होत नाही असा स्वतःचा अनुभवही सांगितला आहे. पत्नी लक्ष्मीबाई यांना, "या माझ्या स्वतःच्या सौभाग्याची केवळ पताकाच होत !" असे घमघशीत श्रेय दिले आहे. त्यांच्या रूपगुणांचे माटयांनी ज्या कोमल खमंगपणाने कौतुक केले आहे, (पाहा, "लक्ष्मीबाईचे हसणेसुद्धा इतर हजार बायकांत दुर्मिळ ठरेल. विशेषतः बोलण्यातला एखादा मुद्दा अंगलट येत आहे असे पाहून आत्मसमर्थनाचा आग्रह धरून त्या जेव्हा हसू लागतात, तेव्हा त्यांच्या सौंदर्याचा पूर्ण विकास झालेला दृष्टीस पडतो." पृष्ठ २७६) तो मूळ मजकूर वाचूनच अनुभवायला हवा. असे कौतुक असूनही, ही सून सासूला 'अप्रिय' होती ही गोष्टही त्यांनी सांगितली आहे. आणि, दागदागिन्यांचा अथवा पैशाचा मोह लक्ष्मीबाईंना अगदी नव्हता, या त्यांच्या गुणात त्यांनी प्रपंच-सुखाचे रहस्य सांगितले आहे.

माटयांच्या चिंतनशील व्यक्तिमत्त्वाला उत्तम शोभावा असाच हा आत्मचरित्रग्रंथ झाला आहे. स्व-पर, खाजगी-सार्वजनिक, सौजन्य-विश्लेषण अशा द्वंद्वांचा चांगला तोल माटयांनी सांभाळला आहे. माटे हे स्वतः उच्च दर्जाचे अभिमानी व आग्रही. ही उच्च पातळी ग्रंथभर टिकली आहे. कोठले गुह्य कळले, कोणाचे व्यंग कळले, असा कुत्सेचा आनंद या ग्रंथात वाचकांना मिळूच नये, अशी पुरी दक्षता माटयांनी घेतलेली आहे.

माटयांची आपल्या जीवनासंबंधी अखेरीस काही तक्रार नाही. आहे ते समाधान आहे. स्वाभिमान राखला, आवडीच्या क्षेत्रात, हवे ते काम, स्वतःच्या तब्बेतीत करता आले. दैन्य दूर राहिले. प्रकृतीने उत्तम साथ दिली. निर्व्यसनी राहून शरीराकडून चोपून काम करून घेतले. ते समाजासाठी झिजवले. आणखी काय हवे ? ही तत्त्वज्ञाची मुक्तावस्थाच होय. निरलस कर्मयोगाने माटयांनी अखेर शेवटी ही अवस्था गाठली होती खचित. "१९५५ च्या नोव्हेंबरच्या महिन्यात मला कॅन्सरने गाठले." (पृष्ठ ४४६) असे त्यांनी लिहिले आहे आणि नंतर त्याविषयी अवघ्या अकरा ओळी लिहिल्या आहेत. शोधक, विश्लेषक अशा जिज्ञासूच्या भूमिकेवरून लिहिल्या आहेत. कॅन्सरने दोन वर्षे त्यांना अती छळले. त्यांच्याकडे जाणारांना शेवटी शेवटी ते एक पाटी देत. 'नमस्कार, आपण आलात, आनंद झाला. प्रकृती तशी बरी आहे,' अशा अर्थाचा मजकूर पाटीवर लिहिलेला असायचा. आलेल्याची पाटी वाचून झाली की ते हात जोडून नमस्कार करीत. आणि उगेच पडून राहत. माझ्याप्रमाणे त्यांच्याजवळ गेलेल्या अनेकांना आजही हे आठवत असेल. पण या यातनांचा साधा उच्चारही त्यांच्या आत्मचरित्रात नाही. या मुक्तावस्थेत पूर्वीचे राग-लोभ मावळले होतेच. मला वाटते ते बरोबर असेल तर आस्तिक्य-नास्तिक्य हे द्वंद्वही शेवटी त्यांनी पचवले होते. शेवटी, त्यांनी स्वतःचे स्वभावदोष सांगितले आहेत. तेही आत्मनिंदेने नव्हे, तर अटळ वास्तवाच्या सहज स्वीकाराने. त्यांनी लिहिले आहे. "पण आता हे सारे संपले आहे. याची दुरुस्ती केव्हाही व्हायची नाही. माझ्या पश्चात जगाने मला बरे किंवा वाईट म्हटले, तरी शाश्वतीत आणि जगदाकारात विलीन झालेल्या मला त्याचे काय सुखदुःख असणार ?" (पृष्ठ ४५१)

खरोखरी, समाजमनस्क, विचारशील आत्मचरित्र कसे असावे याचा मानदंडच माटयांनी आपल्या आत्मचरित्रग्रंथाने निर्माण करून ठेवला आहे.

■

## साभार स्वीकार

### कादंबरी

**पाताळयंत्र** : शिरीष गो. देशपांडे; अभिषेक प्रकाशन, शंकरनगर, नागपूर; १९८६; रु. ६६ △ **क्षितिजापलीकडे** : संदीप हळदणकर; इंडिया बुक क. पुणे ३०; १९८५; रु. ४० △ **माळावरचा माणूस** : (बाल कादंबरी); संदीप हळदणकर; इंडिया बुक कं. पुणे ३०; १९८५; रु. ५ △ **डॉक्टर... डॉक्टर** : कुमुदिनी रांगणेकर; निहारा प्रकाशन, बुधवार पेठ, पुणे २; १९८६; रु. ३५ △ **पाताळपाणी** : प्रभाकर मराठे; निहारा प्रकाशन, पुणे २; १९८६; रु. २५ △ **विषवृक्ष** : शशिकांत गुप्ते; निहारा प्रकाशन, पुणे २; १९८५; रु. १८ △ **मैयाची भेट** : प्रतिभा लेले; निहारा प्रकाशन, पुणे २; १९८६; रु. ४ △ **रारंगढांग** : प्रभाकर पेंढारकर; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६ (२ आ.) रु. ३५ △ **अरे संसार संसार** : प्रभाकर पेंढारकर; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६ (२ आ.); रु. ३१ △ **पाचोळा** : रा. रं. बोराडे; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६ (४ आ.) रु. २५ △



### कथा

**एक होती बिल्ली एक होता पल्लू** : व्यंकटेश वेल्हाळ; सुरेश एजन्सी, पुणे २; १९८५; रु. १५ △ **क्रांतीवीर वासुदेव बळवंत फडके** : स्नेहसुधा कुलकर्णी व मनाली गाडगीळ; निहारा प्रकाशन, पुणे २; १९८६; रु. ४ △ **पाच पटकथा** : पद्माकर गोवईकर; सुपर्ण प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △

# माटे यांचे कथालेखन / अरविंद वामन कुळकर्णी

श्रीपाद महादेव माटे यांची पहिली कथा 'हास्याचा शोध' ही 'वाङ्मयशोभा' मासिकाच्या डिसेंबर १९३९ च्या अंकात प्रसिद्ध झाली. त्यानंतर १९४१ पासून १९५९ पर्यंत त्यांचे आठ कथासंग्रह प्रसिद्ध झालेले दिसतात. म्हणजे संख्यात्मक दृष्ट्या त्यांचे कथालेखन लक्षात घेण्यासारखेच आहे. उपेक्षितांचे अंतरंग (१९४१), मधूला सांगितलेल्या गोष्टी (१९४३), अनामिका (१९४६), दोन दुर्दैवी नायक–सोहराब व इनॉक् (१९४७), माणुसकीचा गहिवर (१९४९), भावनांचे पाझर (१९५४), भावकथा (१९५७), भावनांची मांडवी (१९५९) अशी त्यांची नावे आहेत. त्यांनी १९५६ साली (म्हणजे मृत्यूपुर्वी चार महिने) 'पश्चिमेचा वारा' ही (पहिली) कादंबरी लिहिली आहे. यावरून प्रथमदर्शनी एक विशेष लक्षात येतो तो असा की माटयांनी खूपच उशिरा ललित लेखनाला सुरूवात केलेली आहे. त्यांची पहिली कथा वयाच्या त्रेपन्नाव्या वर्षी आणि कादंवरी वयाची सत्तरी पुरी केल्यावर लिहिली गेली आहे. पहिली कथा प्रसिद्ध होण्यापूर्वीच त्यांची चारपाच वैचारिक पुस्तके प्रसिद्ध झालेली दिसतात. पहिले 'अस्पृश्य विचार' १९२२ सालचे, तर पाचवे 'परशुराम चरित्र' व 'पंच मानव हिंदुसमाज' १९३७ सालचे आहे.

याबरोबरच उत्तम शिक्षक आणि (लोकांनी महार माटे म्हणावे असा) अस्पृश्य समाजात (प्रामुख्याने शिक्षण प्रसाराचे) कार्य करणारा कृतिशील कार्यकर्ता असा लौकिक त्यांनी १९३२ पर्यंत मिळवलेला होता. तेव्हा एक चतुरस्र तत्त्वचिंतक आणि समाजोपयोगी विचारांचा प्रसार करू इच्छिणारा वैचारिक लेखक अशी त्यांची (काहीशी लालित्य-विरोधी समजली जाणारी) प्रतिमा जनमानसात आणि खुद्द माटयांच्या मनातही दृढपणे स्थिरावल्यानंतर ते ललित लेखनाकडे वळलेले आहेत. त्यांच्या ललितलेखनातील गुणदोषांचा विचार करताना हे सूत्र बरीच मदत करते. ललित साहित्य-प्रांताबद्दलची जवळिकतेची जाणीव त्यांच्यात यामुळेच निर्माण झालेली नसावी. एक तऱ्हेचा उपरेपणा संकोचच त्यांच्या मनात घर करून बसलेला, त्यामुळे जाणवतो.

'मी आजवर बरेच लिहिले आहे, पण ते सगळे निबंधरूप व विवेचनात्मक आहे...(वि. श्री. मोडक आणि रा. ना. नातू या) दोन तरुण लेखकांनीच मला हे ललितवाङ्मय लिहिण्याचे साहस करण्यास प्रवृत्त केले !...(पुढे मनोहरपंत केळकर, ना. सी. फडके, ग. त्र्यं. माडखोलकर, य. गो. जोशी, भा. म. गोरे आदीं-कडून) प्रोत्साहन मिळत गेल्यामुळे मला जास्त लिहिण्यास धीर येत चालला...अशा प्रकारचे वाङ्मय लिहिण्याचा हा माझा अगदी नवाच यत्न आहे. त्यामुळे उत्क्रांत होत आलेले या वाङ्मयाचे तंत्र मला अजून माहीत झालेले नाही. लिहित राहिल्याने ते हळूहळू हस्तगत होईल असा भरवसा वाटतो.' हा १९४१ सालच्या 'उपेक्षितांचे अंतरंग'च्या 'आरंभी मला थोडे सांगावयाचे आहे–' मधील सूर १९५४ च्या सहाव्या 'भावनांचे पाझर' या कथासंग्रहापर्यंत कायम राहिलेला दिसतो. "'पाझर'च्या काठावरून" मध्ये ते लिहितात–'मी लघुकथा लेखक नाही. मी कथावाङ्मय लिहितो. लघुकथेच्या तंत्रामंत्राची कैची तज्ञांनी बळकट बसवून टाकली आहे. मी त्या कैचीच्या आसपासही फिरकत नाही !' 'भावनांची मांडवी' या शेवटच्या संग्रहाला माटयांच्या आत्मनिवेदनाची अशीच जोड असती तर त्यांनी याहून काही वेगळा सूर लावला असता असे वाटत नाही. कारण १९५६ च्या 'पश्चिमेचा वारा' या कादंबरीच्या 'माझे कादंबरी लेखन' या प्रास्ताविकात कथा-लेखनाची 'भीती हळूहळू नाहीशी झाली' असे ते लिहीत असले तरी 'कादंबरी वाङ्मयाच्या प्रांगणात पाऊल टाकताना मला खरोखरच भीती वाटत आहे' असे लिहितातच !

अनुक्रमणिका

यावरून हे लक्षात येते की कथा वा कादंबरी या ललितसाहित्य प्रकाराशी माटयांचा आंतरिक संबंध प्रस्थापित होऊ शकलेला नाही. असा संबंध प्रस्थापित झाल्याशिवाय ललित साहित्य हेही आत्मशोधाचे एक माध्यम आहे याची जाणीव होणे आणि आत्मविश्वासाच्या जोरावर कलाकृतीची निर्मिती साधली जाणे कठीणच आहे. मग स्वतःला भावलेल्या सत्याच्या संदर्भात अनुभवाच्या वेगवेगळ्या शक्यता शब्दरूप करणे दूरच राहते.

जीवनविन्मुख विचारसरणीचा अवलंब केल्यामुळे आपल्या समाजाचा ऱ्हास होत गेला हे सांगताना तत्त्वचिंतक माटयांनी आपल्या समाजातील माणसे इतिहासपूर्व कालापासून जगत आली; त्यांनी वैभवेही भोगली, पण त्यांनी जगण्याचे तत्त्वज्ञान मात्र आत्मसात केले नाही. परिणामी जगणे हे नुसते जगणेच राहिले. पाश्चात्यांप्रमाणे त्यात अर्थपूर्ण जीवनोत्सुकता निर्माण झाली नाही अशा आशयाचे कुठेतरी मार्मिक विवेचन केले आहे. ते या ललितसाहित्य निर्मितीच्या संदर्भात खुद्द माटयांबद्दलच जाणवून जाते !

माटयांच्या ठिकाणी दिसणारी ही जाणीव न्यूनगंडाची वा थोडीफार ओशाळगतपणाची आणि म्हणून आत्मविश्वासाचा पूर्ण अभाव असणारी आहे—अव्यापारेषु व्यापार करू धजणाऱ्या, पण जाग्या मनाच्या ठिकाणी असते तशी आहे असे म्हणणे अन्यायाचे ठरेल. त्यांच्या या पवित्र्याचे कारण त्या कालातील वाङ्मय व्यवहारात सापडेल असे वाटते. दिवाकर कृष्ण, वामनराव चोरघडे, य. गो. जोशी यांच्यासारखे लेखक लिहिते झालेले असूनही माटयांनी कथालेखन सुरू केले तो काल म्हणजे फडके—खांडेकर—माडखोलकर यांच्या नावावरच मोडतो. त्यांच्या तथाकथित रंगतदार कथांवरून कथावाङ्मयाची वैशिष्टये निश्चित करू पाहणारे माटे विचकले नसते तरच नवल ! त्यातच माटयांचा पिंड तत्त्वचिंतक वैचारिक लेखकाचा. वाचनाच्या अंगानेही ललितसाहित्याचा गाढ म्हणता येईल असा त्यांचा परिचय कमी. त्यामुळे विकल्या जाणाऱ्या कुरमुऱ्यातच, फारसा निरक्षीरविवेक न राखता, मोत्याची लक्षणे नक्की करणे त्यांनी पत्करले असावे. त्या काळची फडक्यांची 'कलावादी' कथा आणि खांडेकरांची 'जीवनवादी' कथा नीट लक्षात घेतली तर तिच्यावर भिस्त ठेवून कथास्वरूपाची कल्पना बेतू पाहणाऱ्या माटयांसारख्या लेखकाचा जर काही गोंधळ झाला तर आश्चर्य वाटायला नको. कथा लेखनाचे तंत्र, लघुकथेच्या तंत्रामंत्राची कैची असे जे उल्लेख माटे आपल्याला कथालेखनाबाबत न जमणारे अंग स्पष्ट करताना करतात ते त्या काळाच्या पार्श्वभूमीवर मोठे अर्थपूर्ण व नेमकी दिशा दाखविणारे होतात.

कादंबरीबाबत तर असे दिसते की १९५६ च्या सुमाराला श्री. ना. पेंडसेही प्रतिष्ठित झाले होते; पण माटयांचा कल मात्र केतकर पद्धतीकडे झुकलेला दिसतो. 'जपाच्या माळेतल्या मण्यांप्रमाणे या लेखनातील पात्रे लेखकाच्या बोटाच्या चलनवलनावर फिरत आहेत... कम्युनिझम... हा मंत्र कृतीने जपणारी बुद्धिमान तरुण मंडळीही लेखकाने पाहिली. अशाच एका तरुणाचे जीवन रंगविणे आणि आपल्याला कळलेला त्या मंत्राचा अर्थ विशद करणे असा दुहेरी हेतू मनात बाळगून हे प्रस्तुतचे लेखन झालेले आहे.' असे प्रा. चंद्रकुमार डांगे यांनी 'पश्चिमेचा वारा' बद्दल लिहिले आहे (म. सा पत्रिका आक्टो.-डिसें. १९५६) वास्तवाहून भिन्न वा वरवरच्या ढोबळ अवलोकनाचा आधार, मूलभूत वैचारिक संघर्षाची उपेक्षा आणि यामुळेच फक्त आभासमय लेखन असे आणखीही काही दोषस्वरूपी विशेष त्यांनी रास्तपणे टिपलेले आहेत.

एकूणच, माटयांचे ललितलेखन बिनधास्तपणे झालेले लेखन दिसत नाही.' पारमार्थिकांनी केलेला रामदासाचा पराभव' किंवा 'मूळची गीता दुसरी असली पाहिजे' या सारखे लेखन सोडा, पण 'रसवंतीची जन्मकथा' सारख्या समीक्षात्मक लेखनातही जो एक आक्रमक निःशंक पवित्रा दिसतो तो त्यांच्या ललितलेखना मागील भूमिकेत दिसत नाही. त्याचा मोठाच परिणाम त्यांच्या लेखनावर झालेला आहे.

'कथा बहुतांशी खरी असली, तिच्या मूळ पिंडातच काही रस असला, वाङ्मयाच्या व कथांनाच्या बळावर तो विशेष मधुर बनविता आला असला आणि विशेषतः शेवटी वाचकांच्या भावना उल्हासित अथवा व्यथित होतील असे वाटले म्हणजे ती कथा बऱ्यापैकी तरी आहे असे मी समजतो,' ही 'पाझरच्या काठावरून', मध्ये त्यांनी कथेबद्दल मांडलेली स्वतःची संकल्पना त्यांच्या कथांना जरूर लागू पडते. या कसोटीवर त्यांच्या कथा उतरतात. प्रत्यक्ष सत्याशी असणारा संदर्भ माटयांची कथा कधी धोक्यात येऊ देत नाही. कल्पनेचे

कलमही असे सत्य सांभाळूनच होते. लेखनाचा बाज माटे असाच ठेवताना दिसतात.

असे दिसते की माटयांची सरसकट भूमिका मार्ग-दर्शक निवेदकाची आहे. 'सांगितले तर थरकाप होईल, पण जे झाले ते सांगितलेच पाहिजे' (शंभू शिखरीचा राजा). 'रामभरोसीला काय झाले होते?' (रामभरोसी पुन्हा धन्याच्या दारात), 'देव स्वतः तर आलेच पण रुक्मिणीलाही घेऊन आले हे सांगायचे राहूनच गेले' (नासलेले अमृत मधुर झाले) असे उल्लेख पुष्कळ ठिकाणी आहेत. 'शेवंतीचा खराटा' मध्ये तर प्रारंभी "माझ्या ओळखीची आणि थोडीबहुत माझी स्नेही झालेली पूर्वास्पृष्ट समाजातील माणसे आता हळूहळू नाहीशी होऊ लागली आहेत. 'सगाजीबोवा' हा शतायुषी मांग गृहस्थ वाङ्मयरूपाने माझ्या 'अनामिके' त वस्ती करून राहिलेला कोणी कोणी तरी पाहिला असेल; त्याचे स्मरण मला शेवटपर्यंत राहील... आज दुसऱ्या एका अस्राप जीवासंबंधाने लिहिण्याची उर्मी मला आलेली आहे. ही एक झाडूवाली बाई आहे. झाडूवालीचे चरित्र ते काय असणार?" असे सांगितले गेल्याचे दिसते. निवेदनाच्या विश्वातले लेखकाचे अस्तित्व तेही प्रकट असे, इथे उपस्थित असल्याचे दिसते. इतरत्र अप्रकट असले तरी ते जाणवल्यावाचून राहत नाही.

हे निवेदन एका सीध्या सरळ रेषेत वाटचाल करते. व्यक्तिमनाचे दर्शन घडविताना ते वेध घेते तो फक्त दोनच मितींचा वा परिमाणांचा. त्या त्या व्यक्तीच्या कृतिउक्ती आणि त्याशी तर्कदृष्टचा संलग्न असणारा मनाचा दर्शनी स्तर माटयांचे निवेदन मार्मिकपणे टिपते. पण अन्तर्मनाचा अज्ञात टप्पा किंवा प्रसंगी तर्काला हुलकावणी देणारी मानसिक गुंतागुंत त्यांच्या निवेदनाच्या कक्षेत येत नाही. परिणामी तिसऱ्या मितीला वा परिमाणाला त्यांचे कथानिवेदन मुकते. प्रतिमेसारख्या अनेकार्थव्यंजक माध्यमाची किंवा आशयाचे पदर उलगडणाऱ्या 'ध्वनी' ची योजनाही त्यांच्या कथेत होताना दिसत नाही.

एखाद्या निवेदकाने आपल्या भूमिकेवर घट्ट राहून केलेले निवेदन या दृष्टीने प्रस्तुत लेखनाकडे पाहू लागले की लक्षात येते, याचा निवेदक कसलेला आहे. गोष्ट असो, हकीकत असो किंवा 'इंद्रायणीच्या वाळवंटात,' 'अजानवृक्षाच्या सावलीत' सारखे 'प्रथम पुरुषी निवेदन असो, ते आकर्षक वा वेधक बनविण्याचे कसब त्याला उत्तम प्रकारे अवगत झालेले आहे. माणसे उभी करताना बोजड वाटणार नाही अशा तऱ्हेने तो त्यांचे समाजजीवन, त्याविषयीची माहिती बारकाव्यासह मांडतो. 'बन्सीधर, तू आता कुठे रे जाशील?' मधील कातकऱ्यांचे जीवन, 'कृष्णाकाठचा रामवंशी' मधील रामोशी जीवनाची कैफियत, 'पुरंदरचा नामा' मधील ग्रामीण शेतकऱ्यांचे जीवन, 'एका अस्पृष्टाच्या डायरीतील पाने' मधील अस्पृश्यांचे जीवन अशी उदाहरणे या संदर्भात सहजपणे देता येतील.

व्यक्तिदर्शन आणि प्रसंगचित्रण यांना निवेदनप्रधान लेखनात एक खास स्थान असते. त्यांच्याबद्दल काही खास अपेक्षाही असते. सूक्ष्मता, संमिश्रता फारशी लक्षात न घेता त्यांचे थोडेफार भडक, ठसठशीत, नाटयपूर्ण, सहजगम्य— म्हणून वेधक ठरेल असे स्वरूप तिथे अभिप्रेत असते.

प्रसन्न— मराठमोळी— डौलदार भाषा, सुसंस्कारित रसिकता आणि अंतरीचा कळवळा यामुळे कथात्म निवेदनाबरोबरच त्यांचे अ–कथात्म निवेदनही सरस उतरले आहे. 'हास्याचा शोध,' 'शेवंतीचा खराटा,' 'माझे मनोराज्य,' 'श्रीनिवासरावांची गोड निराशा' इ. लेखनाची याबाबतीत साक्ष काढता येईल. 'मी सध्या एवढेच धोरण ठेवलेले आहे की, आपण लिहीत असलेला मजकूर सुरस आहेसे वाटले म्हणजे झाले' ही जी माटयांनी 'उपेक्षितांचे अंतरंग' च्या प्रास्ताविकात अपेक्षा व्यक्त केलेली आहे तिची पूर्तता होईल असेच त्यांचे लेखन आहे हे कुणीही मान्य करील. कारण व्यक्तिदर्शन व प्रसंगचित्रणाबरोबरच निवेदनावरील पकड, वातावरणनिर्मिती, नेमक्या गोष्टींचेच कथन, कुतुहलजागृती, रससंभव, वर्ण्यविषयाबद्दलचा जिव्हाळा, वैचारिक अधिष्ठान इत्यादी विशेषही त्यांच्या लेखनात दिसून येतात.

पण माटयांची कथा 'रंजक' नाही हेही लक्षात येते. फडक्यांच्या रंजनप्रधान काळात जन्मूनही, त्यांच्या तंत्राचा धाक मनात बाळगूनही ती पूर्णपणे 'अ–रंजक' राहिलेली आहे. (तशीच ती निव्वळ बोधप्रधानही नाही!) तत्कालीन रसिकाभिरुचीच्या कोष्टकात न बसणाऱ्या तिच्या स्वरूपाचे कारण मात्र माटयांची बंडखोरी वगैरेत दिसत नाही. तसे श्रेय तिला देणे माटयांनाही आवडणार नाही. कारण कलारूपाविषयी

...५

तयार झालेल्या संकेतांची जाणीवपूर्वक मोडतोड करू पाहणाऱ्या आणि नव्या कलास्वरूपाच्या संघटनेचा ध्यास घेणाऱ्या प्रयत्नांची साधी चाहूलही त्यांच्या अशा लेखनात जाणवत नाही. तो त्यांचा पिंडही नव्हे. त्यामुळे मराठी कथेच्या वाटचालीचा आलेख काढताना समीक्षकाला त्यांच्या लेखनाशी फार काळ रेंगाळावे लागत नाही.

विचारप्रवणतेमुळे त्यांची कथा 'रंजक' होण्यापासून बचावते हे उघड आहे. त्यांची वैचारिक भूमिकाही लक्षात घेण्याजोगी आहे. ते तसे हिंदुराष्ट्राभिमानी, पण सनातनी म्हणू असे नव्हेत. भौतिकशास्त्रे आणि सामाजिक प्रश्न याविषयी दिसून येणारी जाग (awareness) हा त्यांचा उल्लेखनीय विशेष. त्यामुळे परंपरा आणि नवता यांचे एक मिश्रणच त्यांच्या व्यक्तिमत्त्वात झालेले दिसते.

"हास्याचा शोध" या त्यांच्या पहिल्या कथेतूनच त्यांचा सामाजिक कल स्पष्ट झालेला आहे. संतजीवनावरील त्यांच्या कथांतही हे सामाजिक जाणिवेचे सूत्रच प्रामुख्याने मिरविताना दिसते.

'उपेक्षितांचे अंतरंग'च्या प्रास्तविकात ते लिहितात, "(या) गोष्टी उपेक्षितांचे अंतरंग व्यक्त करण्यासाठी लिहिलेल्या... त्या सर्वांनाच 'गोष्ट' हे नाव शोभण्यासारखे आहे असे नाही...हे उपेक्षितही अनेक प्रकारचे... त्या सर्वांचे मुख्य मनोगत सामाजिकाकडे वळलेले..." या संग्रहातील आणि नंतरच्याही त्यांच्या कथांचे प्रामुख्याने असणारे स्वरूप यावरून स्पष्ट होते. ललितलेखनाच्या परिणामक्षमतेची एक अटकळही त्यांच्या मनात तयार झाली होती असे दिसते. 'चित्रपट' या आत्मवृत्तात त्यांनी याची स्पष्ट कबुलीही दिलेली आहे. तिथे ते लिहितात, "'अस्पृष्टांचा प्रश्न' हा ग्रंथ आखवंद माहिती, विवेचन, उपपत्ती, सूचना इत्यादींनी खरोखर गजबजलेला आहे, पण त्याच्याकडे समाजाचे लक्ष गेले नाही; त्याच ग्रंथात चार-सहा ओळींत आलेल्या एका हकीकतीला मी जेव्हा ललितवाङ्मयाचे रूप दिले तेव्हा त्या अस्पृष्टांच्या प्रश्नाकडे सरसकट वाचकवर्गाचे लक्ष एकदमच वळले."

जीवनाच्या भिन्न क्षेत्रातील उपेक्षितांच्या अंतरंगाचा वेध त्यांनी घेतलेला आहेच; पण बांधिलकी वगैरे शब्दांचा जन्मही न झालेल्या काळात त्यांनी अनागर ग्रामीण जीवनाचा आणि अस्पृश्यांच्या जीवनाचा घेतलेला वेध आवर्जून टिपावा असाच आहे. त्याच्या मागची प्रेरणा रूचिपालट वा नाविन्यप्रेमाची मुळीच नाही. माटयांचे हे ऋण आता सर्वमान्य झालेले आहे. डॉ. आनंद यादव यांनी तर त्यांना मराठी ग्रामीण कथेचे हरिभाऊ असे म्हटले आहे. (ग. ल. ठोकळांना यादव मराठी ग्रामीण कथेचे ना. सी. फडके म्हणतात, यावरूनही माटयांचा गौरव सिद्ध व्हावा !)

"कशाचा संसार", 'शेवंतीचा खराटा,' 'एका अस्पृष्टाच्या डायरीतील पाने', 'नाथनाक आणि देवकाई यांची काळझोप', 'मंगळवेढयाचे कुसू' अशा कथांतून प्रामुख्याने त्यांनी सामाजिक विषमतेच्या प्रश्नालाच हात घातला आहे. अस्पृश्यांबद्दल त्यांना वाटणारा कळवळा जिवंत, सच्चा असल्याचेच जाणवते. एका 'अस्पृष्टाच्या डायरीतील पाने' ही कथा तर सवर्णसमाजाच्या दांभिकपणावरील जळजळीत भाष्यच आहे. त्यातही मुस्लिमांसारख्या परधर्मीयांना मुक्तसंचाराची परवानगी आणि अस्पृश्यांसारख्या स्वकीयांना मात्र बंदी, मुस्लिम हरिजनांबद्दल कृतीने दाखवीत असलेली समानता या समाजाच्या दृष्टीने विपरीत वाटणाऱ्या जागांवर माटे बोट ठेवताना दिसतात. 'आपले प्रॉव्हिडंट फंड, आपली पेन्शने, आपल्या हक्काच्या रजा, आपल्या आजारपणाच्या रजा, आपल्या प्रासंगिक रजा म्हणजे लांबून आपल्याकडे पाहणाऱ्यांना ती एक नवलकथाच वाटते. त्यांच्यातील मर्म ज्यांना कळले ते संतापाने फणफणतात. आणि ज्यांना कळत नाही ते कपाळाला हात लावतात.' या 'शेवंतीचा खराटा'तील ओळी आजसुद्धा विचार करायला लावतात. वाचकाला अंतर्मुख करून आत्मपरीक्षणास प्रवृत्त करण्याचे कसब माटयांच्या ललितलेखनात दडलेल्या तत्त्वविचारात यामुळेच जाणवते. या वर्गाच्या अज्ञानाचे शल्य त्यांना बोचते.

ज्योतिबा फुले, आगरकर, महर्षी शिंदे, म. गांधी, आंबेडकर, सावरकर आदींनी सातत्याने मांडलेल्या सामाजिक विषमताविरोधी मतांच्या परंपरेतच माटयांची भूमिका वसणारी आहे. 'माझे मनोराज्य'सारख्या लेखनात त्यांच्या भूमिकेचा सामाजिक कल अगदी 'प्रथमपुरुषी' स्वरूपात प्रकट होतो. तिथे त्यांनी लावलेला सूर 'सर्वेऽपिसुखिन:सन्तु' असा आहे. त्यांची स्त्रीविषयक भूमिकाही अशीच आहे. माटयांच्या जीवनविषयक दृष्टिकोणातील सामाजिक समानतेच्या या विशेषीचा गौरवदायी उल्लेख अनेकांकडून झालेला आहे.

पण एक विशेष मात्र समीक्षकांच्या नजरेतून सुटलेला दिसतो. तो आर्थिक समानतेविषयीचा होय.

माटयांच्या पुरोगामी व उदारमतवादी सामाजिक दृष्टिकोणाचे मूळ भूतदया वा भावनात्मक कनवाळूपणा हे नव्हे. त्याला एक निश्चित असे वैचारिक अधिष्ठान आहे. माटयांना अभिप्रेत असणारे तत्त्वज्ञान 'विज्ञान-बोधा'चे आहे. तसे पहायला गेले तर आगरकरांच्या 'ऐहिकसुखाची परमावधी' या सूत्राचेच ते एक उत्क्रांत रूप म्हणता येईल. विज्ञान वा भौतिकशास्त्राची तकशुद्ध व परिणामकारकरित्या बाजू मांडणारा विचारवंत असा माटयांचा लौकिक आहे. आणि या भौतिकशास्त्र किंवा विज्ञान यांच्या प्रगतीचा प्रमुख आधार अर्थवाद आहे. जीवनाचा भौतिक पातळीवरून केला जाणारा विचार आहे याची त्यांना नेमकी जाणीव दिसते. त्यामुळेच त्यांनी त्यांना न मानवणाऱ्या मार्क्सवाद वा कम्युनिझम-चाही विचार केला आहे, 'पश्चिमेचा वारा' या कादंबरीत कम्युनिझमची चिकित्सा हे वैचारिक सूत्र प्रधानपद मिरवताना दिसते. 'विवेकमंडन' सारख्या लेखसंग्रहातील 'भूतदयेची आवश्यकताच उरू नये'सारखा लेख त्यांना उमजलेला मार्क्सवाद वा कम्युनिझमच स्पष्ट करू पाहतो. यावद्दलच्या वाचनाचा परिणाम म्हणूनच की काय माटे 'भूतदया आणि परोपकारबुद्धी हा काही सामाजिक आपत्तीनिवारणाचा व्यापक आणि टिकाऊ उपाय नव्हे. या निवारणाला दुसरा काही इलाज शोधला पाहिजे', या मतापर्यंत तिथे पोहोचलेले दिसतात. मानवी जीवनात वखेडा निर्माण करणाऱ्या साठा करण्याच्या स्वार्थी वृत्तीचेच उच्चाटन होईल अशी सर्वच जीवनोपयोगी वस्तूंची गरजेवरही मात करणारी विपुल समृद्धी असा एक उपाय त्यांनी इतरत्र सुचविलाही आहे. धनाच्या समान वाटणीची संकल्पना नैसर्गिकरित्या उतरणे कठीण असे त्यांना वाटते.

माटयांना असणारी ही अर्थवादाची जाण वेगळी व महत्त्वाची आहे. त्यामुळेच ते एका वेगळ्या शोषक-शोषित संबंधाची आणि तज्जन्य वेगळ्या शोषणप्रक्रियेची सूचना देऊ शकले आहेत. कामगाराच्या श्रमशोषणाचा मार्क्सप्रणीत सिद्धांत जमेल त्या कुवतीने गिरणगावाची वा गिरणीमालक-मजूर संबंधाची चित्रणे करीत काही लेखकांनी मराठी वाचकांच्या भेटीला आणलेला होता. पण त्याहून मूलगामी आणि व्यापक अशा एका शोषण-प्रक्रियेची काहीशी जाणीव फक्त माटयांनीच ललित-लेखनाद्वारा स्पर्शिलेली दिसते. त्यामुळेच की काय त्यांच्या लेखनात औद्योगिक क्षेत्रातील मालक-मजूरसंबंध वगैरे प्रश्नांचा खल फारसा दिसत नाही. या संदर्भात माटयांचे लक्ष अ-नागर ग्रामीण भागावर केंद्रित झालेले दिसते. या भागाच्या होणाऱ्या आर्थिक शोषणाची त्यांनी सूचित केलेली जाण फार महत्त्वाची आहे.

'पुरंदरचा नामा', 'हास्याचा शोध', 'श्रीनिवास-रावांची गोड निराशा', 'रामभरोसी पुन्हा धन्याचा दारात' इत्यादी कथा काळजीपूर्वक पाहिल्या तर त्या व त्यानंतरच्या काळाच्या दृष्टीनेही माटे त्याद्वारा सूचित करीत असलेला 'अर्थ' संबंध मोठा अभिनव वाटतो. नेमकेपणी हेरून, काटेकोरपणे विस्तारिले गेले नसले तरी इतर अनेक कथांतून चित्रित केल्या गेलेल्या जीव-नाचे कारण म्हणता येईल असे एक भौतिक सूत्र त्यांच्या मनाला स्पर्शून गेलेले आहे हे समजते. अशा तऱ्हेने भाव-लेली तत्त्वचिंतने ललित साहित्यात शेवटी ललित-साहित्याचे कायदेकानू सांभाळून आली पाहिजेत असे म्हटले जाते. माटयांच्या ललितलेखनाला असे कायदे-कानू लावणे फारसे अर्थप्रद ठरणारे नाही. लेखनाच्या झुबक्यात समाविष्ट झालेले तात्त्विक विचार बोचतात का, त्यांचे अस्तित्व उपरेपणाने जाणवते का इतपतच त्याबाबतीत विचार करणे बरे. या दृष्टीने माटे यशस्वी झाले आहेत असेच म्हणता येईल. गोष्ट असो वा हकी-कत असो, माटयांनी आपल्या विचारांना निवेदनाच्या ओघात व्यवस्थितपणे जागा करून दिली आहे.

अस्वच्छता, अडाणीपणा, लाचारी, दीनवाणेपणा, दौर्बल्य, आत्मविश्वासाचा अभाव, अकारण संताप, अविचारी कृती यासारख्या व्यक्ती आणि समाज या दोन्हीबाबत दुर्गुण ठरणाऱ्या विशेषांना जन्म देणाऱ्या दारिद्र्य या आर्थिक प्रमुख कारणाच्या मुळाची आणि त्याचेही कारण असणाऱ्या श्रमाचे अवमूल्यन करून होणाऱ्या शोषणाची माटयांना जाणीव झालेली असावी असे दिसते. या संदर्भात त्यांनी शोषितांची म्हणून जी व्यक्तिनामे टिपलेली आहेत (उदा. नामा, कोंडो. पारू, चिमी, येश्या, गेन्या, कोयना इ.) ती सर्व कृषिजीवन जगणाऱ्या खेडवळ ग्रामीणांची आहेत. माटयांनी या सूत्रावर जास्त जोर दिलेला दिसत नाही; नाहीतर त्यांना जाणवून गेलेल्या अनेक प्रश्नमय गोष्टींची नेमकी कारण परंपरा ते सहजपणे स्पष्ट करू शकले असते. पुरंदरच्या नाम्याची किंवा त्याच्या सोबत्याची दयनीय

स्थिती काय; कोयना हेलकरिणीची स्थिती काय, त्या सर्वांना सतावणारे सावकार काय; कृष्णाकाठचा रामवंशी सत्याची किंवा तारळखोऱ्यातील पिऱ्या मांगाची दरोडेखोरी काय; इतकेच नव्हे, तर पिऱ्या, तवा,मंजुळा शेवंता इ. अस्पृश्यांच्या जगण्याची हलाखी काय– त्या साऱ्या तुकड्या तुकड्यांनी टिपल्या गेलेल्या जीवनदर्शनाच्या बुडाशी शेतीप्रधान ग्रामीण भागाचे होणारे शोषणच कारण म्हणून वावरते आहे हे त्यांनी नक्की दाखविले असते. 'हास्याचा शोध' मधील मुंबईत भेटणारा प्रत्येक बुभुक्षित हा विस्थापित अनागर आहे, शेतीवर भागणे सर्वस्वी अशक्य म्हणून शहराकडे– औद्योगिक केंद्रांकडे वळलेला तो शेतकरी आहे हेही कदाचित त्यांच्या लक्षात येऊ शकले असते.

या गोष्टी माटचांच्या ध्यानी आल्या नाहीत याचा बाऊ करण्यात मुळीच अर्थ नाही कारण तशी काही अपेक्षा करणेच चूक ठरेल. जे काही जाणवले त्याच्या आधारावर माटचांनी आपल्या कथेला निश्चितपणे 'रंजना'चे साधन होण्यापासून वाचविले आहे. इतकेच नव्हे, तर (कलेची पथ्ये सांभाळता आली नाही तरी) मराठी ग्रामीण कथेची पायाभरणी करताकरताच एका नेमक्या आर्थिक जाणिवेच्या संभाव्य आणि योग्य वैचारिक अधिष्ठानाची सूचनाही देऊन ठेवली आहे.

माटचांचा संप्रदाय निर्माण झाला नाही. मराठी कथेत तो तसा निर्माण होणे शक्यही नव्हते. पण नेमक्या वैचारिक अधिष्ठानाची कथालेखनालाही असणारी जरुरी लक्षात घेऊन माटचांनी अंगुलीनिर्देश केलेल्या ग्रामीण भागाच्या आर्थिक शोषणाच्या सूत्रावर नंतरच्या ग्रामीण लेखकांची नजर खिळली असती तर मराठी ग्रामीण कथेचे स्वरूप निश्चितच वेगळे दिसले असते. ग्रामीण दुःखाचे, अडाणीपणाचे, अस्वच्छतेचे नेमके कारण अधिक चिंतनाने त्यांना नक्कीच समजले असते. त्याचा परिणाम होऊन त्यांच्या कथालेखनाचा बाज बदलून गेला असता. किमान 'वास्तववाद', 'कलावाद' वगैरे समीक्षापूत गोंडस नावाखाली नाविन्याभिलाषी शहरी अभिरुचीला हवे तेच पुरवीत राहण्याचा आणि नागरांच्या मिळणाऱ्या टाळचांमुळे सुखावण्याचा जो उद्योग पुढच्या ग्रामीण कथाकारांनी केला तो टळला असता!

सुदैवाने आनंद यादव, रा. रं. बोराडे, भास्कर चंदनशिव, शेषराव मोहिते इ. काही निवडक ग्रामीण कथाकारांना ही जाणीव होऊ लागलेली दिसते आहे. त्यांच्या प्रयत्नांतून नवी मराठी ग्रामीण कथा साकार होईलही. उद्या जेव्हा कधी अशा ग्रामीण कथेची दिंडी निघेल तेव्हा जोतिबा फुले, विठ्ठल रामजी शिंदे, बाबासाहेब आंबेडकर यांच्या समवेत श्री. म. माटे यांचीही पालखी ठेवावी लागेल!

■

## साभार स्वीकार

### चरित्रे-आठवणी-गौरवग्रंथ

**कालपक्ष :** सरोजिनी देशपांडे; अभिषेक प्रकाशन, नागपूर; १९८६; रु. ५० △ **प. पू. आई कलावतीदेवी यांचे संक्षिप्त चरित्रे :** नारायण गंधे; ज्ञानेश प्रकाशन, संगमनेर; १९८६ △ **वा. रा. ढवळे–व्यक्ती आणि कार्य :** गुं. फ. आजगावकर, मॅजेस्टिक समोर, गिरगाव, मुंबई ४; १९८६; रु. ३० △ **शारदृत्त :** स. ह. देशपांडे; सुपर्ण प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. २५ △ **साधुसंतांचा मेळा :** बी. एम. लोणकर; सौ. विमलाबाई लोणकर; पुणे ९; १९८६; रु. ४५ △ **कै. मा कृ. शिंदे :** गुं. फ. आजगावकर; गुं. फ. आजगावकर, मॅजेस्टिकसमोर, गिरगाव, मुंबई ४; १९८६; रु. ५ △ **गणगोत :** (४ आवृत्ती); पु. ल. देशपांडे; मौज प्रकाशन, मुंबई; १९८६ रु. ४० △ **समिधा :** एम. ए. शेख संपा. पै. इस्माईलसाहेब मुल्ला स्मृतिग्रंथ समिती, सातारा; १९८६; रु. ६० △

# श्री. म. माटे आणि भाषा / रमेश वा. धोंगडे

श्री. म. माटे यांचा भाषाविचार– विशेषतः मराठी भाषा विचार– आणि त्यांचे स्वतःचे भाषाविषयक कार्य या दोन गोष्टींचा विचार प्रामुख्याने करायचा आहे.

१

**रसवंतीची जन्मकथा** या आपल्या ग्रंथात माटे (१९४३क) यांनी काव्याबाबतची आपली मते मांडली आहेत. पद्यमयता हा काव्याचा एकमेव साधारण गुण-विशेष आहे असे या ग्रंथाचे सूत्र आहे. काव्यविषयक चर्चेमध्ये माटे काही भाषाविषयक मते मांडतात. सृष्टी-तील पशुपक्ष्यांच्या आवाजाचे अनुकरण माणूस प्रथम करू लागला. ही अनुकरणे म्हणजेच मूळ धातू. उदा-हरणार्थ सापाचे पालापाचोळ्यातील सर सर करीत जाणे यापासून सृ धातू. त्यापासून साप हे नाम. माट्यांच्या मते भाषेत मुळात सर्व शब्द असे नादानुकारी होते. अर्थात् हा भाषाविचार खूप जुना आहे. शब्द म्हणजे नामकरण हे मत माटे स्वीकारतात. मात्र राग, लोभ, ईर्ष्या या मनातील वस्तुजाताचे नामकरण कोणत्या नियमाने झाले असावे हा प्रश्न त्यांना पडत नाही. अनुभव आणि त्यांचे पृथःकरण यातून शब्दसंख्या वाढत गेली असे माटे मानतात. यात दोन अडचणी आहेत. प्रत्येक शब्द हा नामकरणाचा परिणाम असे म्हणता येणार नाही. **आणि, काय, परन्तु, जर,** यांसारखे शब्द हे भाषेच्या संरचनेतून उद्‌भवतात हे नाकारता येणार नाही. भाषा म्हणजे केवळ शब्दनिधी हा विचार खरे म्हणजे युरोपात अठराव्या शतकातच मागे पडला होता. दुसरे असे की शब्द म्हणजे बाह्य जगातील वस्तूचे नामकरण अशी भूमिका घेतल्यावर शब्दांना फक्त निर्देशन–अर्थ उरतो. प्रत्यक्षात शब्दाशब्दातील संबंधा-तून, भाषेच्या पद्धतीतूनही शब्दांना अर्थ प्राप्त होतात. या भाषिक–अर्थाचा विचार डावलता येणार नाही.

माट्यांच्या भाषाविचारात आणखी एक विचित्र मत येते. शब्दानंतर वाक्यरचना आली हा तो विचार. म्हणजे मुळात भाषा ही फक्त शब्दनिधी होता. सुट्या सुट्या शब्दांनी वस्तुनिर्देश करणारी ती साधी यंत्रणा होती. पुढे माणसांनी या शब्दांचे वाक्य केले. अगदी लहान मुलाच्या भाषा–संपादनाचा विचार केला तरी हे मत पटणार नाही. शब्द आणि वाक्य हे घटक विश्लेषणाचे आहेत; प्रत्यक्ष उक्ती या घटकांच्या लहानमोठेपणाने झाली असे म्हणणे योग्य नाही.

वाक्याचा बंध तयार झाल्यावर त्या बंधाशी खेळताना माणसांनी नवीन शब्द तयार केले असाही एक विचार माटे मांडतात. उदाहरणार्थ, **फूल तांबडे आहे** या वाक्यात **तांबडे** या जागी वेगवेगळी विशेषणे माणसांनी वापरली असतील. अर्थात वाक्यबंधातून नवीन शब्द तयार होण्याची प्रक्रिया ही अल्प प्रमाणात असते.

बोलता येण्यातून गद्य आणि गाता येण्यातून पद्य अशी उपपत्ती मांडून माटे गायलेले लवकर ध्यानात राहाते म्हणून पद्य वाढले असावे असा अंदाज करतात. मात्र पद्य– रचनाकार हा प्रथम बोलतो ही गोष्ट नजरे-आड केल्याने काव्यनिर्मिती ही सामान्य भाषाव्यवहारा-तील एक विशेष कौशल्य आहे, त्याची तुलना बोलण्याशी करता येणार नाही. हा विचार माट्यांना सुचत नाही. भाषा, भाषेची रचना, भाषेचे घटक, संज्ञापन–प्रक्रिया, भाषेचे दैनंदिन व्यवहारातील स्थान, माणसाची कला-त्मक वृत्ती, भाषेचा काव्यरूप आविष्कार, भाषासंपादन आणि भाषा–परंपरा या गोष्टींचा फारसा खोल विचार न केल्याने माट्यांची एकंदरच मते वादग्रस्त ठरतात.

काव्याचे एकमेव लक्षण म्हणजे गेयता हे सांगताना माटे एक प्रयोग करावयास सुचवतात. जुन्या वृत्तातील काव्य बाकीचा सर्व भाग कायम ठेवून नवीन वृत्तात लिहिले तर ते जास्त परिणामकारक होते हा तो प्रयोग. पुढे काव्याला गद्याचे रूप देऊन त्याचे स्वयंभू बळ काय आहे हे पाहता येईल असे ते सांगतात. माधवराव पटवर्धनांचे मत असेच होते असे सांगून माटे स्वतः

**केकावली** गद्यात लिहून तसे सिद्ध केल्याचे उदाहरण देतात. **दुसरे कोणी देश मोठे संपन्न असतील पण आम्हाला आमचा महाराष्ट्र देशच प्रिय आहे** या गद्य वाक्यापेक्षा **बहु असोत सुंदर संपन्न की महा। प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा।**' ही काव्यपंक्ती जास्त सरस वाटते ती तिच्या गेयतेमुळे असे माटे म्हणतात.

या सर्व उदाहरणात अर्थ आणि रूप यात विभिन्नत्व आहे हे गृहीत आहे. गद्य–वाक्य आणि पद्य–पंक्ती यात अर्थदृष्टचा समानत्व आहे हे म्हणणे खरे नाही. अर्थ आणि ज्ञान किंवा माहिती यांच्यात केलेली ही गल्लत आहे. अगदी साधेच उदाहरण द्यायचे तर माटयांच्याच उदाहरणातील पद्यपंक्तीत **सुंदर. संपन्न,** आणि **महा,** अशी तीन विशेषणे गद्य अवतारात फक्त **मोठेसंपन्न** या स्वरूपात उरतात. **असोत** आणि **असतील** यांचे अर्थ सारखे नाहीत. पद्यपंक्तीमधला **एक** हा अर्थपूर्ण शब्द गद्य-वाक्यात लुप्तच होतो. म्हणजे वरवर पाहता दोहोत फरक नाही असे वाटले तरी अर्थाच्या दृष्टीने दोन्ही पंक्ती भिन्न आहेत. गेयता हा रूपाचा भाग जरूर आहे; पण रूप आणि अर्थ हे एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. भाषा म्हणजे शब्द, शब्दांचे रूप वेगळे आणि अर्थ वेगळा यासारखी सर्वसामान्य पण गैर मते माटे मांडतात इतकेच.

याच सुमारास सांगली येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या भाषणात माटे (१९४३ ख) यांनी मराठी भाषेबाबतची काही गाऱ्हाणी मांडली आहेत. महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन करून त्यात मराठी ही बोधभाषा वापरण्याच्या प्रस्तावाचे ते स्वागत करतात. मुंबईचे निम्म्याहून जास्त लोक मराठीभाषक आहेत. म्हणून ती महाराष्ट्रात सामील करावी ही मागणीही ते हिरीरीने करतात. 'महाविदर्भ' राज्याची मागणी त्या काळात त्यांना सुखावते. उलट, निजामशाहीतील मराठी-भाषकांवर उर्दूची सक्ती करण्यास त्यांचा प्रखर विरोध आहे. मराठीच्या जोपासणीसाठी माटयांनी दाखविलेली ही आस्था त्यांच्या स्वभाषाप्रेमाचे द्योतक आहे.

माटयांचे स्वभाषा, स्वदेश, आणि स्वधर्म यांवरचे प्रेम प्रामाणिक पण डोळस आहे. मराठी वाङ्मयात एक भक्ति-रसाचा टाळ तरी वाजवतो किंवा शृंगाररसाचे तुणतुणे तरी. याहून वेगळे मराठी लेखकांकडे काही नाहीच याची त्यांना चीड आहे. ब्रिटिशपूर्व काळात आपण इतरांकडून वेळीच नवीन ज्ञान हस्तगत न केल्याची चूक केली तर ब्रिटिश अमदानीत प्रत्येक गोष्टीसाठी पाश्चात्यांकडे पाह-ण्याची दुसरी चूक आपण करत आहोत असे ते बजावतात. इथल्या समाजाचा विचार करणारे समाजशास्त्र, त्याच्या आर्थिक गरजांची दखल घेणारे अर्थशास्त्र आणि त्याच्या भावना व्यक्त करणारे वाङ्मय तयार व्हावयास हवे असे ते आग्रहाने सांगतात. निसर्ग विज्ञान, सामाजिक विज्ञान, आणि वाङ्मय यात स्वतःच्या पायावर उभे राहण्याची गरज राजवाडयांपासून तो माटयांपर्यंत सर्वच विचारवंतांनी सांगितली आणि आजही ती सांगण्याची परिस्थिती बाकी आहे हे दुर्दैव.

**साहित्य धारा** या ग्रंथात माटे (१९४९ ख) यांचा **भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी** असा लेख आहे. यातही शब्द म्हणजे वस्तूंचे नामकरण हीच पूर्वीची भूमिका माटे घेतात. त्यांच्या मते शब्दसंख्येत वाढ होणे म्हणजे भाषा समृद्ध होणे. रूपकांच्या मार्फत शब्दवाढ होण्याचा (खरे म्हणजे अर्थविस्तार होण्याचा) एक मार्ग खुला होतो. ही रूपके त्यांच्या नावीन्याने भाषकांना आकर्षित करतात. पण त्यांचा वापर सर-सकट होऊ लागला की त्यातले रूपकत्व विसरले जाते आणि तोच अर्थ त्याचा मुख्य अर्थ बनतो. भाषेचा शब्द-निधी हा असा अर्थदृष्टया बदलत राहतो. रूपकांची योजना हे केवळ साहित्याचे क्षेत्र नव्हे. आपल्या रोजच्या भाषेत अनेक रूपके दडलेली असतात. आज आपण **हरताळ** हा शब्द विशिष्ट अर्थाने वापरतो. मुळात **हरताळ** हा शब्द हरताळीचे चूर्ण याच्याशी संबंध दाख-विणारा होता. ते चूर्ण पोथी लिहिताना अक्षर खोडण्या-साठी वापरीत. त्याचा रूपकात्मक वापर होऊन आजचा हरताळ हा शब्द रूढ झाला असावा. भाषेत वेगवेगळया प्रकारची रूपके दडलेली असतात. माटयांचा हा विचार संस्कृतातील अभिधा आणि लक्षणा या दोन प्रकारच्या शब्दार्थ– विचाराशी जुळणारा आहे. संस्कृत काव्य-शास्त्रात लक्षणेचे अनेक प्रकार सांगितले आहेत.

शब्दकोशात विसरलेल्या रूपकांची दखल घेतली जात नाही; कोशकर्त्याचे ते काम नव्हे असे माटे सांग-तात. पण व्युत्पत्ती देताना कोशकर्त्याला मागे जावे लागतेच. सर्वच रूपके शोधणे हे कुणालाच जमणार नाही हे या मागचे खरे कारण असते.

उसनवारी, नवनिर्मिती या शब्दनिधी वाढवणाऱ्या इतर मार्गांचा माटे उल्लेख करत नाहीत. याचे कारण कदाचित या लेखाचे मूळ प्रतिपाद्य हे असावे. रूपकांनी

शब्दार्थ बदलतात, नवे अर्थ रूढ होतात. ही रूपके भाषक वापरतात. यात नावीन्य आणि वैविध्य येण्यासाठी निरनिराळ्या पेशातील, धंद्यातील रूपके भाषेत यावयास हवीत; त्यासाठी विविध सामाजिक स्तरावरच्या माणसांनी वाङ्मय-लेखनाच्या प्रांगणात उतरायला हवे असे माटे म्हणतात. त्यातून नवीन रूपके कशी येऊ शकतील याची काही काल्पनिक उदाहरणेही ते देतात.

माटयांना कोणती भाषा अभिवृद्ध व्हावयास पाहिजे होती ? तर तत्कालीन वाङ्मयात जी वापरली जात होती ती. भाषेप्रमाणे ज्ञानाच्या क्षेत्रातही ब्राह्मणी वर्चस्व त्यावेळी होते हे माटे (१९४३ ख) स्वतःच कबूल करतात. म्हणजे ब्राह्मणेतर वर्गाने वाङ्मय-निर्मिती करून नवीन रूपके भाषेत आणावीत अशी त्यांची सूचना आहे. यात वाङ्मयाची भाषा एकसंघ असते, तिला बोलीचा दर्जा असतो, तिची समृद्धी म्हणजे भाषेची समृद्धी अशी विवाद्य गृहिते आहेत. एकीकडे विविध लेखकांनी आपापल्या बोलीतून लेखन करावे असे आपण म्हणतो तर दुसरीकडे त्यामुळे वाङ्मयात वापरली जाणारी भाषा समृद्ध होईल असेही आपण म्हणतो. यातील विसंगती आपणास जाणवत नाही.

दुसरे असे की ब्राह्मणेतर वर्गातले लोक दैनंदिन जीवनात त्यांच्या अनुभवविश्वातील रूपके वापरत नव्हतेच असे म्हणता येणार नाही. माटयांना ती फक्त लिखित वाङ्मयात यावयास हवीत. एखाद्या विशिष्ट वर्गाची बोली प्रमाण मानली जाते; तिच्यात वाङ्मय-परंपरा निर्माण होते; पण म्हणून इतर बोलींनी तिला दिलेल्या देणग्या म्हणजे अखिल भाषेची समृद्धी हा समाज भाषेच्या सर्वंकष व्यवहाराच्या अज्ञानावर आधारलेला आहे. रूपके शोधून वाङ्मयद्वारा ती प्रसारित करून भाषा समृद्ध करण्याचा प्रयत्न भाषक करत नाहीत. कारण रूपकांची आवश्यकता ही संज्ञापनाचा एक भाग असते आणि वाङ्मय-लेखन हे अनेक प्रकारच्या संज्ञापनांपैकी एक आहे– महत्त्वाचे आहे पण एकमेव नव्हे.

भाषा-अध्ययनाबाबत माटे (१९५० क) काही मते मांडतात. आजकालच्या विद्यार्थ्यांना भाषाज्ञान नाही याचे कारण त्यांची बुद्धी कमी असे नसून दोष शिक्षण-पद्धतीचा आहे असे ते सांगतात. 'डिरेक्ट मेथड' मुळे विद्यार्थी धीटपणे बोलायला शिकले पण व्याकरण, शुद्धलेखन, व्युत्पत्ती यांचा त्यांना गंध राहिला नाही. पाठांतराची सवय गेली. घरचा सराव अनावश्यक ठरला. त्यामुळे त्यांचे भाषाज्ञान अपुरे राहिले. पाठांतर, व्याकरण, आणि व्युत्पत्ती ही भाषा-अध्ययनाची महत्त्वाची अंगे आहेत ही पारंपरिक विचारसरणी माटयांना मान्य होती असे दिसते. भाषेचा सराव आपला आपण करायचा असतो, बोलण्यापेक्षा लिहिणे महत्त्वाचे, भाषेचे शब्द योग्य रीतीने वापरण्यासाठी त्यांची व्युत्पत्ती माहिती असणे आवश्यक आहे, व्याकरण शिकल्याने भाषा सुधारते वगैरे पारंपरिक समज यामागे आहेत. भाषा-सुधारकांनी शुद्धलेखनाला टोला दिला याच्यावर माटे यांचा राग आहे. पण जुन्या शुद्धलेखनात काय गैरसोयी होत्या, शुद्ध रीतीने लेखन करायचे म्हणजे काय, भाषासुधारकांनी नेमके काय चुकीचे केले याची चर्चा माटे करत नाहीत. माटयांची एरवीची तर्कनिष्ठ भूमिका येथे दिसत नाही.

**आजकालचे विद्यार्थी** या आपल्या ग्रंथात पुढे माटे महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांच्या राष्ट्रीय स्तरावरील मागासलेपणाची चर्चा करतात. मराठी माणूस हा मुळातच अबोल. विशेषतः इंग्रजीमध्ये बोलायची वेळ आली की तर तो मुखदुर्बळच बनतो. महाराष्ट्राने राष्ट्रीय कीर्तीचे इंग्रजीचे प्राध्यापक निर्माण केले नाहीत. याचे कारण शिकवण्यापलीकडे आपण इंग्रजीशी संबंध ठेवत नाही. इतरत्र आपण मराठी वापरतो. यातून आपले मातृभाषाप्रेम दिसते पण इंग्रजी मार खाते. म्हणजे स्वभावातील घुमेपणा आणि मातृभाषेइतका इंग्रजीचा वापर न करण्याची प्रवृत्ती या दोन गोष्टींमुळे आपले इंग्रजी मागे पडते. स्वभाव बदलता येत नाही. दुसरीकडे मातृभाषेवर प्रेम करू नका असेही म्हणता येत नाही. माटयांना हे न सुटणारे प्रश्न आहेत असे वाटते. एखाद्या भाषिक समूहाला पिंडगत स्वभाव-वैशिष्टये असतात का, ही तथाकथित स्वभाव-वैशिष्टये त्या समूहाच्या सांस्कृतिक संकेतांतून निपजत नाहीत का, ती बदलायची तर सामाजिक परिस्थितीत कोणते बदल अपेक्षित आहेत, मातृभाषेचा अभिमान म्हणजे काय, परभाषा उत्तर रीतीने संपादणे म्हणजे स्वभाषाभिमान सोडणे हे कितपत खरे आहे असे अनेक प्रश्न या निमित्ताने विचारात घेणे आवश्यक ठरेल. यातूनच आपाततः न सुटणारे असे जे दोन प्रश्न आहेत त्यावर उत्तरे सापडतील. माटे मात्र वेगळयाच रीतीने यांची उत्तरे शोधतात.

त्यांचे पहिले उत्तर असे की इंग्रजीचा सराव होण्या-



अनुक्रमणिका

साठी परप्रांतात प्रवास करावा. पण हा उपाय खर्चिक आहे. शिवाय उत्तम इंग्रजी बोलणारे परप्रांतीय प्रवास न करताच तसे बोलू शकतात असे माटेच सांगतात. दुसरे उत्तर असे की, मराठी माणसे आपण बोलताना चुका करू या भीतीने बोलतच नाहीत. इतर प्रांतीय लोक धडाक्याने इंग्रजी बोलतात. मातृभाषेचा अभिमान क्षणभर बाजूला ठेवून आपण धडाक्याने इंग्रजी बोलण्याची सवय शाळा-कॉलेजातून केली पाहिजे हे माटयांचे यावरचे अखेरचे उत्तर. इंग्रजी भाषा यावयास हवी, उत्तम प्रकारे यावयास हवी हा माटयांचा आग्रह प्रामाणिक आहे. पण ती न येण्यामागे जी दोन जटिल कारणे त्यांनी सांगितली आहेत ती जटिल नाहीत. त्यांचे अखेरचे उत्तर दुसऱ्या प्रश्नाला छेदणारे आहे. मातृभाषेचा अभिमान बाजूला ठेवा आणि इंग्रजी शिका ही माटयांची भूमिका राष्ट्रीय स्तरावर आपण मागे पडू नये या कळकळीतून निर्माण होते. कदाचित् माटे म्हणतात त्याप्रमाणे त्या काळात ती अप्रिय वाटण्याचा संभव असेल. माटयांना त्यामुळे स्पष्टवक्तेपणाचे श्रेय द्यावयास हवे. पण याच बरोबर उत्तम इंग्रजी येणे म्हणजे मराठी न येणे आणि मराठी न येणे म्हणजे अस्मिता नसणे ही जी गृहीते माटयांनी स्वीकारली आहेत असे दिसते ती गृहीते चुकीची आहेत हेही लक्षात घ्यावयास हवे. माटयांच्या काळात दिसणारा इंग्रजीबाबतचा भयगंड आजही दिसतो आणि आजही आपले स्वभाषाप्रेम हे या भयगंडाच्या प्रतिक्रियेतूनच उद्‌भवलेले दिसते. समाजातील विचारवंत जेव्हा जुजबी उत्तरे शोधतात, केवळ समजावर आधारलेले निष्कर्ष गृहीते म्हणून स्वीकारतात तेव्हा प्रत्येक क्षेत्रात अशा छोटया छोटया कोंडयाच निर्माण होतात. अर्थात् विचार करून जो समाज बदलत नाही किंवा सकस विचारांच्या आधारे ज्या समाजातील विचारवंत प्रश्नांना सामोरे जात नाहीत, तो समाज काळाच्या रेटयाबरोबर नाखुषीने, नकळत का होईना बदलत जातो ह्यात समाधान मानणे अगदीच वाईट नाही.

भाषाविचाराच्या दृष्टीने माटे (१९५६क) यांचा **अनुवाद अथवा भाषांतर** हा **विवेक-मंडन** मधला लेख महत्त्वाचा आहे. सुरुवातीलाच भाषांतर म्हणजे शब्दशः भाषांतर आणि अनुवाद म्हणजे फक्त अर्थाशी इमान (आज ज्याला रूपांतर, आधारित वगैरे शब्दांनी संबोधले जाते ते) असा फरक ते करतात. मात्र पुढे त्याची चर्चा व त्याचे अधिक स्पष्टीकरण नाही. माटयांची १९४३ मधील रूप विरुद्ध अर्थ ही विभागणी येथेही दिसते. भाषांतर म्हणजे एका कुपीतील उत्तर दुसऱ्या कुपीत ओतणे ही विष्णुशास्त्री चिपळोणकरांची भूमिका त्यांना आवडते यातूनच हे स्पष्ट होते. भाषेला स्वतःचे संदर्भ असतात, तिच्यात सांस्कृतिक संदर्भ दिसतात, आणि तिचा वापर विशिष्ट संदर्भात केला जातो. कोणत्याही वाक्य-बंधाच्या भाषांतराचा विचार करताना या तीन संदर्भांचा विचार अटळ असतो. कोणत्याही दोन भाषांत एका विशिष्ट वाक्यबंधाच्या संदर्भात या तीनही संदर्भांच्या बाबतीत समांतर पर्याय सापडणे अशक्य असते. माटे यातील सांस्कृतिक संदर्भाचा विचार प्रामुख्याने करतात. वाक्यबंधातील सांस्कृतिक संदर्भाचे दुसऱ्या भाषेत भाषां-तर करताना माटयांच्या मते ज्या अडचणी असतात त्यावर उपाय आहेत:

अ : शब्दशः भाषांतर करणे. अडचण : ते कळत नाही.

आ : समानार्थी संदर्भ शोधणे. अडचण : ते सापडत नाहीत.

इ : विवरणात्मक भाषांतर करणे. अडचण : ते चपखल नसते.

ई : सोडून देणे. अडचण : सौंदर्याची हानी होते.

उदाहरणार्थ :

मूळ इंग्रजी : They Preferred Barabbas to Jesus.

अ : त्यांनी येशूच्या ऐवजी बॅराबसलाच पसंत केले.

आ : त्यांनी तुकारामाला बाजूला सारून मंबाजीस पसंत केले.

इ : सज्जन आणि दुर्जन यांपैकी कोणाला ठेवून घ्यावे असा प्रश्न पडला असता, वेडया लोकांनी दुर्जनालाच ठेवून घेतले.

यात आ हा पर्याय चांगला वाटला तरी नेहमीच तो सापडेल असे नाही. अर्थात् अ–आ–इ–ई यातील निवड ही सापेक्ष असते. भाषांतराचा हेतू, भाषांतराचा अपेक्षित वाचक, वाक्यबंधाचे वाङ्मयीन स्थान आणि त्याचा संदर्भ या गोष्टींवर ही निवड ठरते. माटे याची चर्चा करत नाहीत.

उदाहरणार्थ, ख्रिस्तपुराणाच्या संदर्भात तुकारामाचा उल्लेख अनुचित ठरेल; कवितेच्या भाषांतरात त्यातल्या भावपर अर्थाला महत्त्व राहील तर बातमीच्या भाषां-तरात त्यातील निवेदन आणि त्याचा अनुक्रम महत्त्वाचे राहतील. संस्कृत सारख्या भाषेची मोडणी समजण्यास

शब्दशः भाषांतर उपयुक्त ठरेल तर कादंबरीसारख्या वाक्यवधाच्या भाषांतरात एखादा सांस्कृतिक संदर्भ बाजूला सारला तरी चालेल. मूळ भाषेची मोडणी समजून घेण्याचा हेतू असेल तर शब्दशः भाषांतर आवश्यक ठरेल तर अनभिज्ञ वाचकासाठी विवरणात्मक भाषांतर उपयोगी पडेल.

माटयांनी स्वतः भाषांतराचे चांगले आणि यशस्वी प्रयत्न केले. माटे (१९४५) हे याचे एक उत्तम उदाहरण. भाषांतराच्या अनुभवातून त्यांनी मांडलेले विचार, सांगितलेल्या अडचणी मार्गदर्शक आहेत. काही केले तरी मुळातला रस भाषांतरात जसाच्या तसा उतरत नाही हे माटे यांचे निरीक्षण महत्त्वाचे आहे. अर्थात् यामागे रूप आणि अर्थ हे विभिन्न नाहीत हे त्यांना मान्य नसलेले तत्त्व कारणीभूत आहे.

शब्द, पदवंध, वाक्य हे भाषाविश्लेषणाचे घटक आहेत. भाषांतरात ते पायाभूत मानता येत नाहीत. मूळ पाठ्यातील वाक्यरचना आणि भाषांतरातील वाक्यरचना यांचा मेळ बसलाच पाहिजे असा आग्रह धरता येणार नाही हे माटयांचे विधान या दृष्टीने उल्लेखनीय आहे. भाषांतरात भाषांतरकाराने पदरचे काही घालू नये हीही माटयांची सूचना मोलाची आहे. कारण हा मोह कित्येकांना टाळता येत नाही. अर्थात सुलभतेसाठी भाषांतरकाराला पाठ्यानुरूप असे काही द्यावे लागते हेही तितकेच खरे. विशेषतः विवरणात्मक भाषांतरात विस्तार आणि पदरचे घालणे यातल्या सीमारेषा अस्पष्ट होतात. भाषातरकाराला दोनही भाषा उत्तम यावयास हव्यात आणि भाषांतर हे भाषांतर म्हणून जाणवू नये हे माटयांचे मत कोणासही पटेल.

माटे हे ज्ञानाचे संग्राहक होते. माटे (१९४९ ख) स्वतःच **माझी विद्वत्ता** या लेखात तशी कबुली देतात. अर्थात् संग्राहकताही असणे हा दुर्मिळ गुण आहे. ज्ञानाला दत्तक घेणारेही कमीच. विज्ञान, इतिहास, समाजशास्त्र, साहित्य, तत्त्वज्ञान अशा विविध विषयांवरचे त्याकाळी उपलब्ध असलेले ज्ञान माटयांनी मिळवले होते. तार्किक आणि व्यावहारिक भूमिकेतून त्याची ते उत्तम मांडणी करीत. यात स्वतःच्या समाजाच्या हिताचा विचार कधी सुटला नाही हेही खरे. पण भाषेबाबत मात्र माटयांनी त्याकाळी उपलब्ध असलेले ज्ञान मिळवले होते असे दिसत नाही. भाषेच्या उपयोजनाबाबतही त्यांनी केलेली विधाने फक्त त्यांच्या स्वतःच्या अनुभवावर आधारलेली आहेत. किंवा तिचे उपयोजन याबाबत काही सैद्धान्तिक विचार माटयांनी केला होता असे दिसत नाही.

## • २ •

माटयांनी विपुल लेखन केले. वैचारिक लेख, कथा, कादंबरी, चरित्र, अनुवाद असे विविध प्रकारचे वाङ्मय त्यांनी लिहिले. माटयांच्या भाषाशैलीचा संपूर्ण विचार अल्पविस्तारात करता येणार नाही. तथापि माटयांच्या भाषेतील काही महत्त्वाचे विशेष सांगता येतील.

२.१ माटयांच्या लेखनात संस्कृत शिष्ट शब्दांचे प्राचुर्य नाही. देशी शब्द वापरण्याकडे त्यांचा ओढा दिसतो. आत्ताच्या मराठी वाचकास असे अनेक शब्द कदाचित माहीतही नसतील :

(टीपा : १. माटयांच्या सर्व ग्रंथांतली ही उदाहरणे नव्हेत.
२. संबंधीत ग्रंथातीलही सर्वच उदाहरणे येथे दिलेली नाहीत.
३. कंसात दिलेले अर्थ माझे. प्रश्नचिन्ह अर्थाबाबत शंका दाखवतात.
४. यातील बरेचसे इंग्रजी शब्द हे माटयांनी स्वतः वापरलेले आहेत.
५. काही शब्दांबाबत मुद्रणदोष नाकारता येत नाही.)

माटे (१९३३) : आस्फाळणे (आपटणे), टिकारणे (धुपाटणे, काठी), दरद बाळगणे (अविश्वास, भीती बाळगणे).

माटे (१९३४) : पायगोवा उत्पन्न होणे (स्थैर्य येणे). कापडी (यात्रेकरू, प्रवासी), उठकळा येणे (स्थलांतर करण्यास भाग पडणे)

माटे (१९४३ क) : चोखट (स्वच्छ, स्पष्ट), नद (नदी), चघळ (चोथा), सुंदर राखडी (सुंदर ओळ ?), घुणा लावणे (ब्रेक लावणे), गर्गशा (गर्जना), आवार (व्याप्ती).

माटे (१९४७) : पोशाखाची तवा (पद्धत ?), जुनवान लोक (जुने लोक)

माटे (१९४९ ख) : पगदस्तीपणा (सावधानता), चपटे (धपाटे), दरादर ओढणे (फरफटत नेणे), सदोबी वृत्ती (ढोंगी वृत्ती?), आपंगिता नसणे (वाली नसणे ? देखभाल करणारा नसणे ?), आटोप दाखवणे (?) टावकी (?)

अनुक्रमणिका

माटे (१९५० क) : अंदेशा (अंदाज), गयाळीपणा (गवाळेपणा), चणीने डरजुली (?).

माटे (१९५० ख) : गम खाणे (सोसणे,) एतावता (यावरून), चेचवड (वोटचेपे, कणाहीन, लीन), सलुख (सलोखा).

माटे (१९५४) : आपल्या वर्गाचा सरदार (मेहेरवानीतला, ओळखीचा), कौसाल करणे (मसलत, कट करणे), मुगोर फुटणे (मुंगारा फुटणे ? कोंब फुटणे ?), दरद (पर्वा ? भीती), लघिमा (चमत्कार ? सिद्धीने केलेली गोष्ट ?)

माटे (१९५६ क) : चोखट नमुना (उत्तम नमुना), चूप (मजा, गंमत), ताजवा (तराजू).

माटे (१९६२) : मुरवण करणे (मुरवणे ?), दुःखाचा भाजाकार (?)

२.२ देशी शब्दांच्या वापरावरोवर नवीन शब्द तयार करून वापरण्याचे प्रावल्यही माटयांच्या भाषेत दिसते. या नवनिर्मितीत संस्कृतचा वापर दिसतो तसाच मराठीच्या साधक प्रत्ययांचाही वापर दिसतो. त्यामुळे ही निर्मिती वोजड, क्लिष्ट वाटत नाही. मराठीच्या मोडणीत ती सहजपणे वसते.

माटे (१९३३) : मांसनिवृत्ती आणि मांसप्रवृत्ती (शाकाहार आणि मांसाहार).

माटे (१९३४) : प्रियकरी (प्रेयसी), लघुत्व घेण (कमीपणा घेणे)

माटे (१९४३ क) : मनरंजन (मनोरंजन), वाढाव (वाढ), अर्धुक (½, अर्धा) रसोद्ग्रहण (रसग्रहण), ऐतिह्य प्रमेय (परंपरेने आलेले ?).

माटे (१९४७) : सनातनी (सुधारक,) कंटकपणा (काटकपणा).

माटे (१९४९ ख) : मानव (मानवजात), प्रसिद्धक, लघुवस्त्र (हातरुमाल), दत्तक ज्ञान (उसने घेतलेले), घेवारीपणा (घेणे), निधिधारक— संग्रहकार— ग्रहणशील (माहितगार), देखणेपण (पाहण्याची शक्ती), गार्हस्थ्य (गृहस्थीपणा).

माटे (१९५० क) : मांसाशन (मांसाहार), दंतधावन (दात धुणे).

माटे (१९५० ख) : मानीव (मानलेला), जाणीक (जाण), छळक (छळ करणारा), किंवदन्ती, प्रतिसहकार (असहकाराच्या विरुद्ध ?), रोट (पाव, ब्रेड), परिग्रहफाल्गुता (साठा करण्याची व्यर्थता).

माटे (१९५६) : भुकिस्त (भुकेला), दुर्निवार्य, अनोक्ती (अत्युक्तीच्या विरुद्ध).

२.३ निसर्ग विज्ञान आणि सामाजिक विज्ञान यांचे माटयांचे वाचन बरेच होते. त्यांच्या लेखनात, विशेषतः प्रतिपादनाच्या पद्धतीमध्ये ते जाणवते. शब्दस्तरावर त्याचा दृश्य परिणाम म्हणजे माटे वनवीत असलेले पारिभाषिक शब्द सोपे पण अर्थवाही पारिभाषिक शब्द आवर्जून वापरणे हा माटयांचा तिसरा लक्षणीय गुणविशेष आहे.

माटे (१९३३) : पायगोवा (stake)

माटे (१९३४) : वास्तविक (facts), वस्तुविश्लेषण (मनोविश्लेषण या शब्दाविरुद्ध).

माटे (१९४३ क) : घटकावयव (segment. अर्थात येथे अवयव एवढा शब्द पुरेसा होता.) अलंकारमूल (figurative) विरुद्ध परमार्थ (literal)

माटे (१९४७) : आवेग (impulse), दलित (depressed), अस्पृष्ट (untouched)

माटे (१९५० क) : निर्णयरूप (finality), स्तवक (stage), वोधभाषा (medium of instruction).

माटे (१९५४) : वस्तुजात/दिक् (space), स्वरवाहिका (radio set), गानमंजूषा (phonograph), रूपवाहिका (television) set)

माटे (१९५६ क) : पाठान्तर (पाठभद), पठन (पाठ करणे, पाठांतर)

माटयांच्या लेखनात जसे संस्कृत शब्दांचे अवडंबर नाही तसेच इंग्रजी शब्दांचाही वडेजाव नाही. इंग्रजी शब्दांच्या उच्चारावावत म्हणूनच काटेकोरपणाही नाही. माटे (१९४३ ख) Shelley चे लेखन शैली असे करतात तर Louis Pasteur चे लेखन पहा : [ माटे (१९४९ ख)] लुई पाश्चूर असे करतात. परभाषा अध्यापनातील अचुकतेच्या हव्यासापायी आज आपण इंग्रजीतून आदान

केलेल्या शब्दांचे मराठीकरण होऊ देत नाही–पूर्वी मराठीकरण झालेल्या फर्ग्युसन, इस्पितळ, कॉलेज, पोष्ट यासारख्या शब्दांना उलट आपण मूळ रूपास आणत आहोत. गेल्या वीस वर्षांतली ही इंग्रजी–शुद्धी मोहीम चिन्त्य आहे.

२.४ अर्थात माटयांनी वापरलेल्या शब्दांची काही रूपे आज प्रचलित नाहीत: (टीप : कंसात आज प्रचलित असलेली रूपे दिली आहेत.)

माटे (१९३४) : सुधरित (सुधारित), रोषनाई (रोषणाई)

माटे (१९४३ क) : उरफाटे (उफराटे), चवकशी (चौकशी), पतकरणे / पत्करणे (पत्करणे).

माटे (१९४३ ख) : शाहणा (शहाणा)

माटे (१९४९ ख) : अश्या (अशा)

२.५ शब्दांच्या रूपाप्रमाणे त्यांच्या लिंग-वचनातही वेगळेपणा आढळतो :

माटे (१९३४) : रिक्षे (पुं.ब.व.), वास्तविके (न. पुं. ब.व.)

माटे (१९४९ ख) : गुप्तात राहणे, लाच द्यावा. (पुं)

माटे (१९५० ख) : माणूस (न.पुं.)

माटे (१९५४) : हिताहिते (न.पुं.ब.व.)

२.६ क्वचित् प्रसंगी माटे अति जुने शब्द वापरतात.

माटे (१९४३ ख) : वीरावतंस सावरकर

माटे (१९५६ क) : चिल्हर (?)

माटे (१९६२) : नव्हो (नव्हे)

२.७ आजच्या मराठीशी तुलना करता माटयांच्या वापरातील काही शब्दांचे अर्थ वेगळे आहेत.

माटे (१९४७) : यात तात्पर्य नाही. (अर्थ)

माटे (१९५० ख) : उंच अर्थाने (वरच्या अर्थाने)

माटे (१९५४) : भावणे (मानवणे)

२.८ माटयांची वाक्यरचना सरळ आणि सुटसुटीत असते.

"पण भवानी तसें कोठून करणार ? माणसांनी तिच्या हातीं जें शस्त्र द्यावें तें तिनें त्याला दिलें ! ती पुढें कोठें जाणार ? हें जसें, तसेंच ब्रह्मविदांचे आहे."

(माटे १९३४ पृ. ६८)

अर्धविराम, कोलन वापरून वाक्ये मिश्र वाटतात पण ती वाक्ये साधीच असतात. अर्धविराम, कोलन ही चिन्हे पूर्णविरामाच्या जागी येतात इतकेच :

१६५० पॅलेस्ताईनमधून जेकबनें इजिप्तमध्यें देशांतर केले; १५३५ पहिला फिनिशिगाचा राजा अहमिश याने आशियावर स्वारी केली; १५०० हिंदुस्थानचे मूळ रहिवासी दास बनले व आर्यांचा गंगेच्या खोऱ्यात प्रवेश झाला; १४९० इजिप्तमधून ज्यू लोकांचें देशांतर झालें; १३०० जोशूआ याने कॅनन येथे वसाहत केली;

(माटे १९३४ पृ. ११)

ही लकब भाषांतराप्रमाणे ललित साहित्यातही रहाते. "पण इतके मात्र खरे की, कशावर तरी माझी श्रद्धा उरली होती. ती कशावर उरली होती हें मात्र मला तेव्हा सांगता आले नसते." (माटे १९४५ पृ. २१२)

"कोणी म्हणत आम्ही सर्वांहून चांगले प्रतिपादक आहोत; आमचेच बोलणे जास्त उपयोगाचे आहे; ज्याची आज जरूर आहे तेच आम्ही शिकवितो; पण हे जे आमचे दुसरे प्रतिस्पर्धी आहेत ते काय वाटेल ते सांगत बसतात."

(माटे १९४५ पृ. २१७)

ललित साहित्यातले ग्रामीण पात्रही अगदी याच ढंगाने बोलते :

"कारवारनी, जरीमरीनं तडाका दिला; प्वार पटापट मेली; येताळ जरीमरी आता जरा निवल्यावानी झाल्याती. ह्ये बग, या द्येवमानसाला नीट्ट संबाळ; अग द्येवाचा बाळ हाइ; ह्येला घव्हाचा तुकडा घाल; मास्कांड घालू नग." (माटे १९४१ पृ. १३)

"बंछी सुमारे बारा वर्षांचा असावा. उन्हाने आणि उघडयावरच्या वापराने त्याचा चेहरा रापला असला तरी तो लालवट गोरा होता; नाक काहीसे लांब असून, कपाळातून निघताच उचललेले असल्यामुळे याचा रुंदट चेहरा सुशोभित दिसे; बंछीचे डोळे घारे बदामी रंगाचे असून, उन्हाच्या तिरिपीने त्यात तांबडया रेषा उमटलेल्या होत्या; त्याच्या डाव्या गालावर लहानसे निळसर लहासे असून ओठ सारखे मिटून धरण्याची त्याला सवय होती; गेल्या दोन वर्षांपासून त्याच्या हनुवटीवर एक लांबच्या लांब वण पडला होता..." (माटे १९४१पृ.१२)

नेमकी आणि साधी वाक्यरचना हा माटयांच्या भाषेचा विशेष दिसतो. वैचारिक वाङ्मयात यात आणखी एक खुबी माटे वापरतात. अर्थदृष्टया रचना वेधक करण्यासाठी ते दोन सलगच्या वाक्यातून विरोध मांडतात. हा विरोध कधी शब्दांचा असतो, कधी वाक्यरचनेचा असतो, तर अनेकदा विचाराचा असतो.

"'मला हा धर्म नको' या वाक्यात 'धर्म' शब्दावर

जोर नाही; 'हा' या दर्शक सर्वनामावर जोर आहे."

(माटे १९३४ पृ. १०८)

"ज्या पुरुषांना व ज्या स्त्रियांना नीतीची आंच आहे ती चांगली राहतात. बाकीचे बिघडून जातात."

(माटे १९३४ पृ. १२०)

"अन्यायाची चीड येणे हे फारच चांगले आहे. पण ज्याला आपण अन्याय समजतो तो खरोखरीचा अन्याय आहे हे ठरवावयास बुद्धीला माहितीरूप ज्ञानाचे पुष्कळच संस्कार झालेले असावयास हवेत." (माटे १९३४, पृ.१९६)

"प्रतिभाशाली लोकांपैकी कित्येकांच्या तोंडातून ती गद्यरूपाने बाहेर पडते व इतर कित्येकांच्या तोंडून पद्यरूपाने बाहेर पडते. ज्यांना निदान मनात तरी गाता येतें त्यांच्या तोंडून ती पद्यरूपाने अवतरते व हें ज्यांना साधलेले नाही त्यांच्या तोंडून ती गद्यरूपाने प्रकट होते. प्रतिभेच्या उत्कटत्वाचा व त्याच्या गानरूप बहिस्फोटाचा अवश्य संबंध नाही. तो तसा आहे असे कवी मानतात हे चूक आहे." (माटे १९४३ क, पृ. ९८)

दयाळू, मायाळू, उपकारकर्ता परमेश्वरस्वरूप आहे, असे ऐकणारांना वाटू लागतें. तसें वाटू देणें बरोबर नाही. समाजांतील इतर व्यक्तीपेक्षा तो जास्त चांगला हें मान्य केलें पाहिजे; पण देव तेथेचि जाणावा हे मात्र खरें नाहीं. (माटे १९६२ पृ. १११)

या सरळ मांडणीचा तोटा मात्र माटयांच्या ललित साहित्यात जाणवतो. माटयांच्या कथेचे प्रस्तुतीकरण निवेदन पद्धती स्वीकारते. हे निवेदन सरळसोट असते. त्यात स्पष्टीकरणही असते. मग ते **उपेक्षितांचे अंतरंग** (माटे १९४१) असो, **माणुसकीचा गहिंवर** (माटे १९४९ क), पश्चिमेचा वारा (माटे १९५६ ख) असो, की **भावकथा** (माटे १९५७), भावनांची मांडवी (माटे १९५९) मधील **वाया गेलेले लग्न** ही कथा तर वृत्तपत्रीय वार्तेच्या वळणाची आहे.

· ३ ·

माटयांचा भाषाविषयक विचार हा फारसा प्रगत नाही. हे आपण पाहिले. माटयांची भाषाविषयक कामगिरी पाहताना आपण काही भाषिक घटकांचा विचार केला. त्या कामगिरीची संपूर्ण दखल अल्प विस्तारात घेता येणार नाही हेही आपण मान्य केले. उदाहरणार्थ, माटयांच्या लेखनाची तुलना ही त्यांच्या आधीच्या लेखकांच्या लेखनाशी आणि समकालीनांच्या लेखनाशी करावी लागेल. माटयांच्या वैशिष्टयांचा परिणाम उत्तरकालीन लेखकांवर काय आणि कसा झाला हे पहावे लागेल. माटे हे शिक्षणक्षेत्राशी संबंधित असल्याने आणि त्यावेळच्या वाङ्मयीन क्षेत्रातील धुरीण असल्याने त्यांच्या लेखनाच्या परिणामांची शक्यता लक्षात घ्यावी लागेल. आपण जे माटयांचे भाषाविशेष पाहिले त्यात आणि माटयांच्या भाषाविषयक भूमिकेत काही संबंध सापडतात. वेगवेगळया स्तरावरच्या लेखकांनी वाङ्मय लिहावे असे म्हणणारे माटे स्वतः समाजातील वेगवेगळया स्तरांबाबत वैचारिक (पहाः माटे १९३३, १९४९ ख, १९५० ख, १९५४, १९५६ क, १९६२) आणि ललित (पहाः माटे १९४१, १९४९ क) लेखन करतात. मराठीच्या बोलींचा वापर यानिमित्ताने माटयांनी ललित लेखनात केला आहे. माटयांचा स्वभाषाभिमान आणि त्यांच्या भाषेतील देशी शब्दांचे प्राबल्य यात संगती आहे. उलट, इंग्रजीसारख्या परभाषेचा अवलंब ज्ञान मिळविण्यासाठी हवा आहे असे म्हणणारे माटे वैचारिक लेखनात स्वतः तो करताना दिसतात.

## संदर्भ


माटे श्री. म. (१९३३) **अस्पृष्टांचा प्रश्न**. शं. रा. दाते, सदाशिव पेठ, पुणे

–(१९३४) **विज्ञानबोध**. माटे, नातूबाग, पुणे

–(१९४१) **उपेक्षितांचे अंतरंग**. माटे, नातूबाग, पुणे

–(१९४३ क) **रसवंतीची जन्मकथा**. माटे, सत्कार समिति माटे, नातूबाग, पुणे

–(१९४३ ख) **महाराष्ट्र-साहित्य-संमेलन**. सांगली. माटे, नातूबाग, पुणे

–(१९४५) **आपापले हितगुज**. माटे, नातूबाग, पुणे

–(१९४७) **माटे, व्यक्ति आणि वाङ्मय**. य. गो. जोशी, पुणे

–(१९४९ क) **माणुसकीचा गहिंवर**. माटे, नातूबाग, पुणे

–(१९४९ ख) **साहित्य-धारा**. मॉडर्न बुक डेपो, पुणे

–(१९५० क) **आजकालचे विद्यार्थी**. श्री लेखन वाचन भांडार, पुणे

–(१९५० ख) **विचार–शलाका.** कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे

–(१९५४) **साहित्य–मंजरी.** माटे, नातूबाग, पुणे

–(१९५६ क) **विवेक–मण्डन.** व्हीनस प्रकाशन, पुणे

–(१९५६ ख) **पश्चिमेचा वारा.** माटे, नातूबाग, पुणे

–(१९५७) **भावकथा.** कुलकर्णी ग्रंथागार, पुणे

–(१९५९) **भावनांची मांदवी.** व्हीनस प्रकाशन, पुणे

–(१९६२) **विचार–मंथन.** व्हीनस प्रकाशन, पुणे

■

## नवीन आजीव सभासद

जून ८६ ते जुलै १९८६ पर्यंत

पुणे विभाग : मिलिन्द कर्वे, चंद्रशेखर देशपांडे, गिरीश देसाई, वृंदा कार्येकर, सुधा मांडके, विनय-कुमार भगत, व. कृ. जोशी, दिलीप आठवले, तारा जाधव, वसुधा रानडे, कृ. द. भावे, चंद्रकांत दातार, शैलजा जोशी, जी. जी. दिवाण, अविनाश कुलकर्णी, अनंत झांजले, कृ. वि. फडके, प्रभा देवी, दीपक बेडेकर, आशा ओक, भास्कर सोमण, शोभा घोलप, निर्मला महादेव कावळे, सिताराम शिंदे, (बोरी बुद्रुक)

पुण्याबाहेरील : प्रभाकर देशपांडे (धुळे) सुलभा भानगावकर (धुळे) संभाजी जाधव (कोल्हापूर) शैलजा टेंगशे (कोल्हापूर) धनंजय आचार्य (डोंबिवली) वा. ना. ठाकूर (झाडगाव) रत्नागिरी विजया शेवडे. (अहमदाबाद) श्याम मानव (नागपूर) ▭

## साभार स्वीकार

### प्रवास, राजकीय, सामाजिक व इतर

**जिवाभावाचा गोवा** : मधू मं. कर्णिक; प्रतिमा प्रकाशन पुणे ३०; १९८६ रु. ४५ △ **शाहू छत्रपती आणि लोकमान्य** : य. दि. फडके; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ७५ △ **मराठी मासिकांचे पहिले शतक** : वा. द. सातोस्कर; शुभदा सारस्वत पब्लि. प्रा. लि., पुणे; १९८६; रु. ३५ △ **मुले व गुन्हेगारी** : लीला अल्वारीस; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३५ △ **गर्द** : अनिल अवचट; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ४० △ **शूटिंग** : श्री. दा. पानवलकर; मौज प्रकाशन, मुंबई; १९८५; रु. ६५ △ **अबोली वार्षिकांक** : तुकाराम नाईक–संपा. हरिहर आठलेकर, सावंतवाडी; १९८६; रु. १२ △ **आचार्य शं. द. जावडेकर साहित्य सूची**; नागोराव कुंभार; सौ. प्रेमा कुंभार, लातूर; १९८५; रु. ६ △

▭

### लेख-ललितलेख-प्रबंध

**सोनेलुमियेर** : पद्मजा फाटक; सुपर्ण प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३० △ **काव्यरत्नावली** : शकुंतला आठवले; प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ३५ △ **संकलन** : श्री. बा. जोशी; प्रेस्टीज पब्लिकेशन्स, पुणे ३०; १९८५; रु. ५० △ **प्राचीन मराठीतील प्रणयाख्याने व रुपळाख्याने** : डॉ. शिवाजी गडळकर; म. सा. परिषद, आंध्र प्रदेश, हैदराबाद; १९८५; रु. १८ △ **हैदराबाद विमोचन आणि विसर्जन** : कै. नरहर कुरुंदकर / द. पं. जोशी–संपादित; मराठी साहित्य परिषद आंध्र प्रदेश; हैदरा-बाद; १९८५; रु. ५५ △

# आठवणीतील माटे



## १. पिता व आचार्य : म. श्री. माटे

शेवटची दोन वर्षे बापूंच्या कसोटीची ठरली. अत्यंत असाध्य अशा रोगाने ग्रासलेले शरीर. या रोगाशी झगडा करण्याची तीव्र इच्छा आणि निश्चय. रोग असाध्य आहे या कल्पनेमुळे मनावर निराशेचे किती दाट सावट पडले असेल हे कल्पनेनेच जाणून घ्यायला हवे. त्यात पुनः पुन्हा शस्त्रक्रिया, आत्यंतिक पीडा, वेदना. वाचन अशक्य. हिंडणे-फिरणे अगदीच आवरलेले. कोणतेच कार्य, संस्थेचे, सामुदायिक अभ्यासाचे, अशक्य. अशा स्थितीत बहुधा माणसे हातपाय गाळून जे अटळ त्याची वाट पहात बसतील. पण; बापूंनी ही दोन वर्षे फार कारणी लावली. आपले पूर्वीचे लेख एकत्र करून त्यात काटछाट करून ते घासूनपुसून पुस्तक रूपाने प्रसिद्ध केले. 'सुश्रुत' मासिकात आपल्या आजाराची, त्यावरच्या उपचाराची आणि त्यातल्या त्रुटींची संपूर्ण हकीकत प्रसिद्ध केली. अत्यंत त्रयस्थ बुद्धीने. आपल्या जवळचे जुने कागदपत्र–विशेषतः पत्रव्यवहार बाहेर काढला आणि बहुतेक सगळा समक्ष निकालात काढला– पन्नास पन्नास वर्षांपूर्वीची पत्रे त्यात होती. "या सगळ्या गोष्टी आता जुन्या झाल्या आहेत, त्यापैकी बरीच माणसे पण मरून गेली आहेत, बरेच वादविवाद झाले, सगळे आता माझ्या हाताने, माझ्या समोर निकालात निघू दे. यातून आणखी वाद, खेकटी उभी राहायला नकोत, उगाच लोकांना उपद्रव करण्यासारखे कोलित कोणाला तरी मिळायचे." असे मला सांगून हे सर्व अग्नीच्या स्वाधीन केले. त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट केली म्हणजे आपले आत्मचरित्र याच काळात पूर्ण केले. त्याला नाव दिले 'मी व मला दिसलेले जग' प्रत्येक मनुष्यच भोवतालच्या परिस्थितीशी नाते ठेवून असतो. अगदी अटळपणे. पण ही परिस्थिती समजावून घेऊन तिच्यात सुधारणा करण्यासाठी, बदल करण्यासाठी सबंध आयुष्य वेचलेल्या या माणसाला आपले चरित्र लिहिताना 'दिसलेल्या जगाची' जाणीव जास्त तीव्रतेने व्हावी हे साहजिकच होते. याच चरित्राच्या निमित्ताने, मला वाटते, त्यांच्या निरनिराळ्या कार्यात सहभागी झालेले विद्यार्थी, सुहृद या सगळ्यांच्या ऋणांचे त्यांनी कृतज्ञतापूर्वक स्मरणही करून घेतले. या संबंधात त्यांनी त्यांच्या स्वतःच्या आईचे आणि माझ्या आईचे केवळ स्मरणच केलेले नाही– उपकारच स्मरले आहेत. सनातनी वळणाच्या या दोन स्त्रियांनी या माणसाच्या मनाची तळमळ जाणून त्यांच्या अस्पृष्टता दूर करण्याच्या कामी अडथळा केला नाही, सहकार्य केले. सत्तर वर्षापूर्वी अगदी जुन्या पद्धतीच्या घरात वाढलेल्या या दोन्ही स्त्रियांना सुरवाती सुरवातीला या माणसाला समजून घेणे किती जड गेले असेल याची कल्पनाच आता येणार नाही. बापूंना ती होती आणि म्हणूनच सगळ्यात जास्त कृतज्ञतेची भावना व्यक्त झाली आहे ती या दोघींच्या

बाबतीत. मृत्यूपूर्वी केवळ काही महिनेच त्यांनी आत्मचरित्र पूर्ण केले. आणि विज्ञानावर, निश्चित कार्यकारण भावावर निष्ठा असणाऱ्या या माणसाच्या तोंडून कळवळून उद्गार निघाले, "परमेश्वरा, मी कुणाचं काय पातक केलंय की मला पाहू देत नाहीस, अन्नच काय पाणी पण गिळू देत नाहीस ?" खरेच, कशासाठी असे झाले ? आपली सगळी हयात 'जे का रंजले गांजले' त्यांच्यासाठी झिजवलेल्या माणसाचे असे हाल का व्हावेत ? त्यांची शेवटची दोन वर्षं ही एक आजही मनाला क्लेश देणारी, त्याबरोबरच त्यांच्या जबर इच्छाशक्तीचा प्रत्यय देणारी, मनाला उत्साहित करणारी !

बापू हे सगळ्यांचे 'मास्तर' –प्रोफेसर झाले तरी शेकडोंना मास्तर म्हणूनच ठाऊक असलेले, बहुतेकजणांच्या 'माटेमास्तर' म्हणण्यात सवयीचा, आदराचा भाग होता तर काहींच्या मनाने तुच्छतेचा. 'साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद मला, मी मास्तरच राहिलो असतो तर मिळाले असते असे वाटत नाही.' असे ते अनेकदा म्हणावयाचे. कोणाला शाळेत, कोणाला कॉलेजात ते प्रत्यक्ष शिक्षक होते पण आम्हा दोघा बहीणभावंडांना त्यांच्यासमोर वर्गात बसायचा योग कधीच आला नाही. ताईचा सगळा अभ्यास हिंदीचा आणि मी हायस्कूलमध्ये येण्यापूर्वीच ते कॉलेजात गेले आणि मी कॉलेजमध्ये येण्यापूर्वी ते निवृत्त झाले होते. कधी कधी माझा शाळेतला अभ्यास घ्यायची त्यांना लहर येई. विषय इंग्रजी व्याकरण. त्यांचा हातखंडा विषय. आमचे व्याकरणाचे पुस्तक त्यांनी पाहिले आणि कपाळाला हातच लावला. "यात रूट्स दिलेत का ?" या प्रश्नाला माझे उत्तर "रूटस् म्हणजे काय?" माझे आणि माझ्या पुस्तकांचे अगाध ज्ञान पाहून ते हतबुद्धच झाले. वर्गात ते चांगले शिकवीत असतील पण मला शिकवायला बसले की एकदम रागवत, शिक्षणातली प्रगती त्यांना अजिबात मानवत नसे. पण त्यांच्यासारखा अन्य शिक्षक आम्हा बहीणभावंडांना अन्य कोणताच मिळाला नाही. याचं मुख्य कारण आमचं घर म्हणजे 'निरंतर' शिक्षणाचं केंद्र होतं.. त्यांना अशी सवय होती की, कोणत्याही गोष्टीचं चिंतन चालू असले तरी ते बहुतेक वेळी प्रगट असे. मग ते वर्गावर शिकविण्याच्या व्याकरणाच्या किंवा ज्ञानेश्वरीच्या तासाचं असो, एखाद्या व्याख्यानाचं असो किंवा लिहावयास घेतलेल्या लेखाचं असो. नातू-मोडक समोर असोत, गोविंदस्वामी असोत, नाहीतर जेरूशा (रूबेन)– शामा (देवधर) असोत. हे प्रकट चिंतन सर्वांच्या अनुभवाला आलेले आले. आम्ही नित्याचेच श्रोते होतो. आमच्याशिवाय पुष्कळदा बाबा (माझे मेव्हणे प्रा. फडके) असत त्यांची राजकीय मतं निराळी आणि मग चर्चेला रंग चढे. शिवाय ह्या चर्चेचे श्रवण करायला, क्वचित त्यात भाग घ्यायला आम्हाला बंदी नसे. कधीकधी मुद्दाम बसवून घेऊन ऐकवीत. कोणताही विषय असला तरी अशा प्रकट चिंतनातही तो कधी नीरस, जड असा होत नसे. बापूंच्या या प्रकट चिंतनामुळे आमचे अप्रत्यक्ष शिक्षण किती झाले याची कल्पना आता येते. केवळ हरतऱ्हेची माहिती मिळत गेली, एवढेच नव्हे, तर विचार करण्याच्या पद्धतीला शिस्त लागली. पक्के वळण लागले. शिक्षकाचे खरेखुरे काम हे आहे आणि असावयास हवे तशी माझी समजूत आहे. ही बापूंनी आम्हाला दिलेली सर्वात मोठी देणगी. पिता आणि आचार्य दोघांचे काम त्यांनीच केले.

प्रत्येकाला आपापले आई-बाप हे आदरणीयच वाटत असणार, वाटायला हवेत. मग ज्या पित्याने ही देणगी दिली त्याची महती पुनः पुन्हा आठवावी, कृतज्ञतेने आठवावी हे किती स्वाभाविक आहे !

## २. कार्याध्यक्ष माटे : म. श्री. दीक्षित

साहित्य-परिषदेच्या आखाड्यात कै. श्री. म. तथा बापूसाहेब माटे ईर्षेने उतरले तेच मुळी कार्याध्यक्ष या नात्याने. स. प. कॉलेजमधून निवृत्त झाल्यावर व लेखनाखेरीज अन्य क्षेत्रातून अंग काढून घेतल्यानंतर, साठाव्या वर्षी परिषदेसारख्या प्रतिष्ठित साहित्यसंस्थेच्या कार्यात त्यांनी एकप्रकारे स्वतःला झोकून दिलं. बापूसाहेब कार्याध्यक्ष असताना मी माझी सरकारी नोकरी सांभाळून रिकाम्या वेळेत त्यांचेकडे तास दीडतास लेखक म्हणून काम करत होतो. एके दिवशी परिषदेची 'सकाळ' मधील जाहिरात वाचून मी त्यांना विचारलं, 'बापूसाहेब, मला परिषदेत लावून घ्याल का ?' त्यावर ते हसत म्हणाले, "खुळा आहेस की काय ? परिषद तुला फक्त

७५ रु. वेतन देणार. त्यापेक्षा आहे तिथेच उत्कर्ष करून घे."

"पण माझी वृत्ती साहित्यात व सार्वजनिक कार्यात रमणारी आहे. पगार कमी चालेल. पण मला संधी द्या. त्यातून ही नोकरी गावातल्या गावात आहे. रोज सहा–सात मैल सायकलिंग करण्याचा मला आता कंटाळा आलाय."

"असं म्हणतोस ! ठीक आहे. कर अर्ज."

अशा रीतीने माटे यांचं बोट धरून परिषदेच्या पायरीला माझा पाय लागला. तो दिवस १ एप्रिल १९४७ हा होता. पोटार्थियांनी मला अर्थातच 'फूल' ठरवलं. मी हिंदुत्वनिष्ठ आणि सावरकर प्रेमी असल्यामुळे माट्यांची माझ्यावर अधिकाधिक मर्जी बसू लागली. पण त्यांनी आत्मकथेत म्हटल्याप्रमाणे काही काँग्रेसप्रेमी कार्यकर्त्यांना 'हे कसेसेच वाटू लागले.' वास्तविक माटे यांनी आपली राजकीय मते परिषदेच्या कार्यात कधीही येऊ दिली नाहीत. त्यांची निष्ठा केवळ साहित्याला नि साहित्यविषयक कार्याशीच निगडित राहिली. दुर्दैव मात्र असं की, विशिष्ट राजकीय मतांमुळे, खरं म्हणजे नेहरू-लेडी माऊंटबॅटन संबंधातील लेखामुळे, १९४९ च्या पुणे संमेलनात त्यांचेवर कार्याध्यक्षपदाचा राजीनामा देण्याचा प्रसंग ओढवला. पुढे गांधीवधोत्तर वातावरण निवळल्यावर १९५२ ते ५५ या काळात ते पुन्हा अविरोधपणे कार्याध्यक्ष झाले.

परिषदेत बापूसाहेब जवळजवळ रोज येत व दोन-तीन तास काव्यशास्त्रविनोदात घालवून कामही करत. वा. दा. गोखले, गं. भा. निरंतर, मंगरूळकर असे उत्साही चिटणीस त्यांच्या दिमतीला होते. चिटणीसांच्या वा इतरांच्या कामात ते सहसा ढवळाढवळ करत नसत. कारण ते मुळी स्वतःच हाती घेतलेल्या काही चिरस्थायी योजना पूर्णतेला नेण्याच्या कामात गर्क असत. उद्या काय करायचं, परवा काय, असं त्यांचं नित्य चिंतन चालू असे. संकल्पिलेल्या कामाचं, कुणाला भेटायचं, कुणाकडून देणग्या मागायच्या याचं ते टिपण करून ठेवीत व काम फत्ते झालं की, यादीतून नावं खोडून टाकीत, आणि वर पुन्हा नव्यांची भर घालीत. काही वेळा पुण्यात वा परगावी मला सोबत म्हणून बरोबर नेत. त्यांच्यासोबत १९४९ साली केलेला दोन्ही खानदेशचा प्रचार दौरा मी कधीही विसरणार नाही. पुण्यात असोत वा परगावी असोत, हाती घेतलेल्या कामांसाठी देणग्या गोळा करून आजीव सदस्य करायचे हा सदैव डोक्यात एकच विषय. आपल्या कितीतरी चहात्यांना नि विद्यार्थ्यांना त्यांनी आजीव सदस्य केलं.

चिपळूणकर सभागृह, त्या सभागृहातील 'वा. गो. आपटे संदर्भग्रंथालय आणि मराठी वाङ्मयाच्या एकादश खंडी योजनेची पायाभरणी ही तिन्ही कामे बापूसाहेबांच्या एकटयाच्या कर्तृत्वातून उभी राहिली. वार्षिक वाङ्मय समालोचनात्मक व्याख्याने आयोजित करून ती पत्रिकेत अथवा स्वतंत्र पुस्तकरुपाने प्रकाशित करण्याची प्रथा त्यांच्याच कारकिर्दीतली. दोन-तीन वर्षांनी ती नंतर खंडित झाली. चिपळूणकरांच्या संदर्भात गमतीने मला मला एकदा सहज म्हणाले, "अरे, त्या प्रेमकवीच्या नावाने सभागृह होतं आणि मराठी भाषेच्या शिवाजीचं इथे काहीच नाही म्हणजे काय ! याच्या डोक्यावर शास्त्रीबोवांच्या नावे एक सभागृह उभारून दाखवतो. ग्रंथालयालाही अनायसा जागा होईल." चार चहाती मंडळी हाताशी धरून योजनापूर्वक काम करण्याचा केसरीप्रबोध, महाराष्ट्र सांवत्सारिक, केळकर गौरव ग्रंथ, विज्ञानबोध, अस्पृश्यनिवारण इत्यादी पूर्वानुभव त्यांच्या पाठीशी होता. कार्याध्यक्ष या नात्याने त्यांच्या एकूणच कामात मोठा झपाटा असे. धनी वेलणकर, भालजी पेंढारकर, बृहन्महाराष्ट्र शुगरचे आगाशे, प्रो. बोंडाळे नि त्यांचे आप्त गोठोस्कर अशा कितीतरी व्यक्तींकडून मोठ्या देणग्या मिळवून ते धडाक्याने कामाला लागले. त्यांच्या या प्रचार मोहिमेतून तत्कालीन-कलेक्टर स. गो. बर्वेसुद्धा सुटले नाहीत.

बर्व्यांच्या ऑफिसात माटे मला घेऊन गेले होते. दहा मिनिटांची दिलेली वेळ संपताच बर्वेसाहेबांनी घंटा वाजवून सूचना दिली व उठून हात जोडत म्हणाले, "ठीक आहे. करतो विचार." दोन दिवसांनी टपालाने बर्व्यांचं एक पाकीटपत्र. बापूसाहेब ते फोडून पाहतात तो आत चार-सहा ओळीचं एक पत्र व त्यासोबत ५० रुपयांचा चेक. कडवट चेहऱ्याने डोळे बारीक करत मला म्हणाले, "अरे, याने जरा निराशाच केली की. चेक परत करतो." आर्जवी शब्दात टाकोटाक मग पुन्हा एक पत्र– "चिपळूणकर सभागृहासाठी आपण पाठविलेली देणगी स्वीकारणे आपणा उभयतांस शोभादायक नाही. सबब परत करीत आहे. राग मानू नये. किमान १०१ रु. तरी पाठवावेत. कळावे, हे विनंती." गोळी बरोबर लागू पडली. तशी देणगी येताच मग आभाराचं प्रशंसापर

भरघोस पत्र. कामाची ही अशी तळमळ आणि हातोटी होती.

खानदेश दौऱ्यात चाळीसगाव, जळगाव, अमळनेर नि धुळे या चार शहरी दोन-दोन दिवस माजी विद्यार्थ्यांचे घरी तळ देऊन, व्याख्यानं झोडून, गाठीभेटी घेऊन बापूसाहेबांनी पाच सहस्रांची खंडणी गोळा केली. अशा रीतीने दीड-दोन वर्षांत सुमारे सोळा सहस्रांची (हा त्यांचाच आवडता शब्द) रक्कम जमवून 'माला' कारांना माधवरावांच्या डोक्यावर बसवण्याची जिद्द त्यांनी पुरी केली. हे कार्य करीत असतानाच गोपीनाथ तळवलकरांचे मार्फत बोलणी करून, लकडा लावून त्यांनी परिषदेचे आद्य चिटणीस 'आनंद' कर्ते वा. गो. आपटे ट्रस्टकडून दहा सहस्रांची देणगी मिळवून त्यांच्याच नावाचं ग्रंथालय चिपळूणकर सभागृहात थाटलं. या सभागृहातील चिपळूणकरांचं तैलचित्रसुद्धा चित्रकार गोंधळेकरांकडून त्यांनी देणगीरुपानेच मिळवलं.

माटे यांनी आरंभिलेल्या एकादश खंडात्मक वाङ्मयेतिहास योजनेची संकल्पना आणि तिची कार्यवाही याबाबत पुढेपुढे मतमतांतराचे बरेच वादळ उमटले आणि त्यामुळे ते फार अस्वस्थ झाले. हे कार्य ते केवळ आपल्या मर्जीनुसार रेटत होते अशी स्थिती नव्हती. भल्याभल्या तज्ज्ञांशी पत्रव्यवहार नि चर्चा करून, टिपणे मागवून त्यांनी मुख्य संपादक व लेखक यांचा एक ताफा उभा केला होता. पण वर म्हटल्याप्रमाणे योजनेच्या स्वरुपाबाबत प्रतिकूल प्रतिक्रिया उमटत गेल्या नि योजनेचं घोडं अडखळू लागलं. वास्तविक योजनेबाबत बेडेकर, सरदार आदी अनेकांचे मतभेद प्रामाणिक होते. पण बापूसाहेबांनी या सर्वांना एकाच दावणीत गोवून "ते आपले मत्सर करतात, श्रेय मिळू देत नाहीत, निव्वळ बुद्धिवाद करतात, कर्तृत्वाच्या नावाने शून्य" अशी ठाम कल्पना करून घेतली व त्यामुळे कार्याध्यक्ष पदाच्या दुसऱ्या कार्यकाळात त्यांना फार मानसिक क्लेष झाले. पुढे जोग, पेंडसे, कृ. पां. कुलकर्णी प्रभृतींच्या आग्रहाखातर नवी सप्तखंडी योजना राबवण्यास ते राजी झाले. पण ते एकूण नाखुषीनेच नव्या योजनेच्या कार्यवाहीसाठी निर्वाहक मंडळासारख्या दोन-तीन समित्या परिषदेने नेमल्या तेव्हापासून त्यांचं या कामातून लक्ष पार उडालं. समित्यांमुळे फक्त वेळ व पैसा खर्च होतो, काम लांबणीवर पडते आणि करणाऱ्याचे पाय मागे ओढले जातात असं त्यांचं स्पष्ट मत होतं. १९५५ च्या अखेरीस बापूसाहेबांना कर्करोगाने गाठलं, त्यांचे परिषदेत येणं कमीकमी होऊ लागले आणि वाङ्मयेतिहास योजना दप्तरी मरगळ येऊन पडली. २५ डिसेंबर १९५७ रोजी त्यांचा मृत्यू होईपर्यंत किंवा त्यानंतर १९६२ पर्यंत योजनेत कोणाकडूनही कसलीही प्रगती झाली नाही.

१९६२ च्या ठाणे संमेलनप्रसंगी परिषदेच्या वार्षिक साधारण सभेने, सारे पूर्वानुभव ध्यानी घेऊन, योजनेच्या कार्यवाहीचे सर्वाधिकार प्रा. रा. श्री. जोग यांना दिले. एकापरीने कै. माटे यांच्या कार्यपद्धतीचा हा विजय होता. कै. जोग असे भले गृहस्थ की, सर्वाधिकार मिळूनही त्यांनी सरदार, बेडेकर आणि क्षीरसागर या तिघांचं एक सल्लागार मंडळ नंतर नेमून घेतलं व सोयीसोयीने चौथा, तिसरा व पाचवा असे तीन खंड पुढल्या नऊ-दहा वर्षांत सिद्धीस नेले. त्यानंतर दुसरा व पहिला खंड (संपादक मालशे व तुळपुळे) १९८० ते ८५ या काळात प्रसिद्ध झाले व सहावा (१९२१ ते ४७ चा) आता प्रसिद्धीच्या उंबरठ्यानजीक येतो आहे. माटे यांना या कामी नियतीची साथ नव्हती असंच माझ्यासारख्याला आपलं वाटतं. आपण रुजवलेल्या रोपट्याचं वृक्षात रुपांतर होऊन तो फलपुष्पांनी भारलेला पाहण्याचं त्यांच्या नशिबी नसावं. "संकल्प आणि सिद्धी यात परमेश्वराची इच्छा उभी असते" हे गडकरीवचन कधीकधी हे असं सार्थ होतं.

कार्याध्यक्ष माटे यांच्या कारकिर्दीतील एक वादग्रस्त प्रसंग शेवटी सांगतो– पंचवीसएक वर्षांपूर्वी संमेलनाध्यक्ष हा घटनेप्रमाणे परिषदेचा अध्यक्ष असे व कार्यकारी मंडळाच्या सभेचे निमंत्रण त्याला माहितीसाठी पाठवण्यात येत असे. १९५३-५४ साली वि. द. घाटे या दोन्ही नात्याने परिषदेशी संबद्ध होते व माटे कार्याध्यक्ष होते. १३ जून ५४ रोजी परिषदेच्या कार्यकारिणीची व वा. सा. सभेची बैठक सकाळ-दुपार होती. सकाळच्या सभेला घाटे आले व सभा सुरू झाल्यावर काही सूचना करू लागले तेव्हा बापूसाहेबांना समज द्यावी या शब्दात त्यांना म्हणाले 'आपणाला या सभेत बोलण्याचा अधिकार नाही. कृपा करून बोलू नका.' घाटे अर्थातच हे ऐकून संतप्त झाले व काठी आपटत बाहेर निघून गेले. हा सर्व प्रकार ऐकल्यामुळे दुपारची वार्षिक सभा सचित गंभीर वातावरणातच सुरू झाली. कार्यक्रम

...७

अनुक्रमणिका

पत्रिकेवरील सर्व कामे आटोपल्यावर मात्र घाटे यांनी अरेतुरेच्या भाषेत माटयांनी केलेल्या अपमानाची हकीकत सभेला सांगितली. उभयबाजूने मग मोठाच गडबडगोंधळ उडाला. धूर्त मंडळी सभा सोडून जाऊ लागली. राग थोडा शांत झाल्यावर घाटयांनी सभा बरखास्त केली व रागारागानेच ते सभागृहाबाहेर पडले. हा वादळीप्रसंग पुढे कोण चूक, कोण बरोबर यासंबंधी महिनाभर वृत्तपत्रीय चर्चेचा विषय होऊन बसला. व्यक्तिगत स्वरूपाचे हे प्रकरण विसरून घाटे-माटे पुढे प्रसंगोपात्त एकमेकांशी बोलू लागले. माटे यांच्या अंत्ययात्रेसमयी घाटे उपस्थित राहिले. मोठयांचे राग नि लोभ हेसुद्धा मोठेच असतात. दोघांनाही याप्रसंगात उतावीळपणा नडला असं माझं प्रांजळ मत मी त्यावेळी 'मौजे'त निनावी पत्र लिहून प्रकट केलं होतं. आजही ते कायम आहे..

## ३. माटे–साठे : शं. गो. साठे

प्रो. श्री. म. माटे यांनी कुटुंबाच्या चरितार्थासाठी जन्मभर शिक्षणक्षेत्रात अध्यापनाचे काम केले; पण त्यांचे कार्यक्षेत्र तेवढयापुरते मर्यादित नव्हते. अस्पृश्यता निवारणाची चळवळ हे त्यांनी स्वतःसाठी निवडून घेतलेले पहिले सामाजिक कार्य होय. सुरुवातीपासून त्यांना स्पृश्य लोकांकडून कडवा विरोध सहन करावा लागला. होतकरू विद्यार्थ्यांना हाताशी घेऊन, अस्पृश्य वस्तीत रात्री, हातात कंदील, झाडू घेऊन जायचे, जागा साफ करून तिथल्या मुलांना शिकवायचे (आणि त्यासाठी क्लास चालवून मिळालेला पैसा खर्च करावयाचा) हे एक दिव्यच होते. पण बापूसाहेबांनी हे आव्हान पत्करले, इतकेच नव्हे तर समर्थपणे पेलले. बापूसाहेबांच्या त्या वेळच्या ज्या विद्यार्थ्यांना या समाजकार्यात सहभागी होण्याची संधी मिळाली ते खरे भाग्यवान– असे माझ्यासारख्या नंतरच्या 'पिढी'तील विद्यार्थ्याला सतत वाटत आले आहे.

अस्पृश्यता हटवायची असेल तर त्यासाठी समाजाच्या सर्व थरांचे प्रबोधन होणे जरूर आहे हे ओळखून त्यांनी 'समाज विचार मंडळ' सुरू केले. हा त्यांच्या कार्याचा दुसरा टप्पा. या निमित्ताने त्यांच्या भोवती उत्साही तरुण कॉलेजविद्यार्थ्यांचं एक पथकच जमा झाले. त्यांच्या निकटवर्ती विद्यार्थ्यांची ही दुसरी पिढी. हे विद्यार्थी साधारणपणे ५/७ वर्षे त्यांच्या सान्निध्यात राहत, नंतर त्यातील एकेकजण नोकरी, व्यवसायानिमित्त दूर जात आणि त्यांच्या जागी नवीन विद्यार्थी सामील होऊन त्यांचा एक नवा गट किंवा 'पिढी' निर्माण होई.

विद्यार्थ्यांची एकेक पिढी असे म्हटले तरी त्यात तारांची कुंपणे नव्हती. अस्पृश्यता चळवळीतील आबासाहेब पटवर्धन, रघुनाथपंत दिवेकर अशांसारखे त्यांचे विद्यार्थीस्नेही किंवा नंतरच्या पिढीतील डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, प्रा. दातार वगैरे मंडळींची बापूसाहेबांच्या घरी नेहमी गाठ पडत असे. (डॉ. सहस्रबुद्धे तर आमच्या बरोबर 'महाराष्ट्र सांवत्सरिका'च्या संपादक मंडळात होतेच.) आमच्या नंतरच्या 'पिढी'तील 'झंकार'चे मोडक प्रा. अरविंद मंगळूरकर, अकाली निधनामुळे सर्वांना चटका लावून गेलेला कविमित्र श्रीनिवास पाटणकर– ही सर्व मंडळी आधीपासूनच आमच्या चांगल्या परिचयाची होती.

१९३० साली 'केसरी' पत्राला पन्नास वर्षे पुरी झाली. एवढया दीर्घ काळात 'केसरी'च्या स्तंभांतून विविध विषयांवर वेळोवेळी माहितीपूर्ण लेख वाचकांपुढे ठेवण्यात आले. या सुवर्णमहोत्सवाचा एक भाग म्हणून 'केसरी प्रबोध' नावाचा एक ग्रंथ काढावा व त्यात महाराष्ट्रातील विद्वानांनी 'केसरी'तील विचारधनाचे विषयवार वर्गीकरण करून त्याचा आढावा घ्यावा- अशी योजना आखण्यात आली. त्यासाठी जुन्या टिळकस्मारक मंडळातील वरच्या मजल्यावर खुर्च्या, टेबले टाकण्यात आली. शिस्त म्हणून लहानथोर– सर्व अधिकारी व्यक्तींनी कचेरीत बसून आपापले लेख पुरे केले. या कामाची सर्व जबाबदारी प्रो. माटे यांच्यावर टाकण्यात आली होती. व त्यांनी ती समर्थपणे पार पाडली. सहकाऱ्यांना बरोबर घेऊन त्या सांघिक शक्तीच्या बळावर केवढे प्रचंड कार्य करता येते याचे आदर्श उदाहरण डॉ. केतकर यांच्या 'ज्ञानकोशा'च्या रूपाने सर्वांसमोर होतेच.'केसरी प्रबोधा'च्या यशानंतर, साहजिकच, त्यांची दृष्टी, लहानलहान कोश-सदृश्य ग्रंथ संपादनाकडे वळली.

मी त्यांच्या वर्तुळात आलो ते १९३०-३१ साल असावे. त्या सुमारास 'महाराष्ट्र सांवत्सरिक' या ग्रंथाची कल्पना निघाली तेव्हापासून त्या संकल्पित ग्रंथाची सर्व जबाबदारी प्रो. माटे यांच्यावर सोपविण्यात आली. येथपासून त्यांच्या कार्याचा तिसरा टप्पा सुरू झाला असे म्हणता येईल. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचे सम्यक् दर्शन घडावे हा हेतू मनाशी बाळगून त्यांनी ग्रथाची जुळवाजुळव केली. निरनिराळ्या देशांतील 'इयरबुके' जमवून, त्यातील तपशीलाचा तौलनिक अभ्यास करून, त्यांत आवश्यक ते फेरबदल करून त्यांनी ग्रंथाचा आराखडा तयार केला. गोळे, राजमाचीकर वगैरे मित्रपरिवारासह आम्ही या 'सांवत्सरिका'च्या दैनंदिन कामावर रुजू झालो. वर्गातला कुणीतरी एक विद्यार्थी 'मॉनिटर' म्हणून काम बघतो त्याप्रमाणे मी या 'महाराष्ट्र 'सांवत्सरिक' कचेरीचा सेक्रेटरी होतो. या ग्रंथाची कल्पना बापूसाहेबांच्या मनात प्रथम रुजली तेव्हापासून (अगदी पहिले पत्र लिहिले तेव्हापासून) दीडदोनवर्षानंतर ग्रंथ प्रसिद्ध झाला तेव्हापर्यंत या ग्रंथरचनेचा बारीकसारीक तपशील (लहान मुलाचे बोट धरावे त्याप्रमाणे) त्यांनी हिंडवून दाखवला आहे. कुणाही शिष्याने कृतज्ञतेने अखेरपर्यंत जपून ठेवावे असेच हे गुरू-ऋण आहे.

त्यांच्या घरी गावातली प्रमुख दैनिके येत. नेहमीचे आम्ही तिघे-चौघे सकाळी त्यांचे घरी गेलो की, एकेकजण एकेक दैनिक उलगडून त्यांत इतका गर्क होई की, बापूसाहेब बैठकीच्या खोलीत आले तरी कधीकधी आमचे त्यांच्याकडे लक्ष जायचे नाही. मग ते 'हे वाचनालय नाही' असे हसून म्हणत आमच्यापुढची वर्तमानपत्रे उचलून दूर ठेवीत !

जुन्या टिळक स्मारक मंदिराच्या वरच्या मजल्यावर 'महाराष्ट्र सांवत्सरिक' ग्रंथाची कचेरी होती ('कचेरी' हा त्यांचा खास शब्द. त्यांनी कधी 'ऑफिस' म्हटले नाही. तसेच त्यांचे जावई प्रा. फडके यांचा उल्लेखही ते नेहमी 'आमचे जामात' असा करीत. इतराप्रमाणे 'आमचे जावई' असा कधीही नाही.) जिना चढून वर गेल्यावर उजव्या हाताच्या खोलीत बापूसाहेबांची बैठक असे. सेक्रेटरीला हाताशी घेऊन ते पत्रव्यवहारांचे व गाठीभेटीचे काम तिथे उरकीत. संपादक मंडळातील इतर सदस्यांसाठी खोलीलगतच्या प्रशस्त गॅलरीत टेबल खुर्च्या मांडल्या होत्या.

हे कचेरीचे काम (सुट्टीचा दिवस सोडून) सकाळी अकरा पासून संध्याकाळी पाचवाजेपर्यंत शिस्तीत चाले. ही कडक शिस्त बापूसाहेबांनी स्वतःच्या बाबतीतही काटेकोरपणे पाळल्याचे एकदा आठवते. 'त्याचे जुने' निकटचे स्नेही मुंबईचे प्रख्यात मोतीवाले खानविलकर (बापूसाहेब त्यांना प्रेमाने 'खानसाहेब' म्हणत) यांच्या मुलीचे (आजच्या प्रसिद्ध लेखिका वसुंधराबाई पटवर्धन) पुण्यातच लग्न झाले तेव्हाचा प्रसंग. लग्नाच्या भोजनाचे आग्रहाचे निमंत्रण खानसाहेब देऊन गेले, पण भोजनाची वेळ कचेरीच्या वेळेआड येते. असे लक्षात येताच, भोजनाला न जाता, आपल्या या मित्राचा दोष त्यांनी ओढवून घेतला.

बापूसाहेबांना काही गोष्टींबद्दल खंत वाटत असे. त्यांच्या अस्पृश्यता-निवारणाच्या कामामुळे प्रतिष्ठित स्पृश्य समाजाने 'महार माटे' म्हणून त्यांची सतत अवहेलना केली. तसेच त्यांच्या शिक्षकाच्या पेशामुळे सुरुवातीच्या काळात तरी 'माटे मास्तर' म्हणून त्यांच्या कार्याची उपेक्षाच झाली. 'महाराष्ट्र सांवत्सरिक' या ग्रंथात 'कालगणना' नावाचे एक स्वतंत्र प्रकरण सुरुवातीस आहे. प्राचीन काळापासून मानवी समाजाच्या प्रगतीस कारणीभूत झालेल्या ठळक घटनांची नोंद ज्या ज्या ग्रंथात आढळेल तिथून ती वेचून, कालानुक्रमे तिची मांडणी करून—त्या सगळ्यांचे एक धावते चित्र वाचकांसमोर उभे करावयाचे अशी ही एक अभिनव कल्पना होती. ही साकार करण्यासाठी संपादक मंडळातील सर्व सदस्य कित्येक दिवस झटत होते, पण या कल्पनेचे स्वागत तर राहोच, पण जाणत्या वाचकांनी 'कालगणने'ची फारशी दखलही घेतली नाही. आपल्या परिश्रमाचे हे विपरीत फलित पाहून 'हेचि फल काय मम तपाला' अशा विचाराने बापूसाहेब कष्टी होत. 'विज्ञानबोध' या ग्रंथाचे भारे अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडले. त्यात त्यांना जबर आर्थिक फटका बसला. या सगळ्या घटनांमुळे पुष्कळदा 'माझ्या हाताला यश नाही हेच खरे' असे ते खिन्नपणे म्हणत.

'सांवत्सरिक' नावावरून एक गंमत आठवते. प्रो. ना. सी. फडके कोल्हापूरहून आले की पुण्यात त्यांचे नातेवाईक दाते यांचे घरी उतरत. (माझ्या आजोळच्या घरगुती संबंधामुळे मी 'एवढासा' असल्यापासून फडके मला ओळखत.) 'सांवत्सरिका'चे काम चालू असता त्यांची गाठ पडली की ते नेहमीच्या मिस्किलपणे विचा-

रीत, "काय रे, तुझ्या माटयांचं श्राद्धपक्षाचं सध्या काय चाललंय ?" मग काय चाललंय ते प्रत्यक्ष दाखविण्यासाठी मी त्यांना एक-दोनदा वापूसाहेवांच्या 'कचेरी'त घेऊन गेलो. माटे यांनी आनंदाने त्यांचे स्वागत करून ग्रंथावद्दलची माहिती दिली आणि फडक्यांनीही मोकळेपणाने त्यावद्दल प्रशंसोद्गार काढले.

'केसरी प्रवोध', 'सांवत्सरिक' अशासारख्या योजना हाती घेऊन तडीस नेल्यामुळे, सहकाऱ्यांना वरोवर घेऊन काम करण्याचे आणखी वरेच मनसुवे त्यांनी आखले होते. वादकोश, हिंदुत्वकोश हे त्यातील ठळक होत. या दोन्ही कोशांची पूर्वतयारी म्हणजे कच्चा आराखडा. माणसांची व साधनांची जमवाजमव हेही सुरू झाले होते. 'महाराष्ट्र सांवत्सरिक' ग्रंथाची नंतरच्या वर्षाची एक छोटी आवृत्तीही प्रसिद्ध झाली, पण वाकीची कामे कायमची मागे पडली.

कोशवाङमयाचे पर्व संपल्यावर वापूसाहेव ललित साहित्याकडे वळले आणि 'झंकार'मधील त्यांच्या लघुकथांमुळे त्या वाङमय प्रकारातही त्यांनी आपली खास मुद्रा उमटविली.

ते साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले त्यावेळी मी पोरसवदा तरुण राहिलो नव्हतो. अध्यक्षांचे भाषण तयार होत असता त्यातला काही भाग त्यांनी तोंडी सांगावा व मी तो 'लेखक' म्हणून पूर्वीप्रमाणे उतरून घ्यावा अशी मी त्यांना विनंती केली आणि त्यांनीही ती मोठ्या आनंदाने मान्य केली.

पत्रे किंवा लेख स्वत: लिहावयास घेतला तर एक छोटे डेस्क पुढे ओढून खाली वैठकीवर वसून ते कुठेही न थवकता झपाझप लिहित; पण पुष्कळदा खोलीत येरझारे घालीत ते तोंडाने मजकूर सांगत व विद्यार्थी 'लेखक' तो उतरून घेई. आदल्या दिवशी सुरू केलेला लेख अर्धाच राहिला असेल तर शेवटचा काही भाग ते वाचावयास सांगत व मगच पुढचे लेखन सुरू होई. अशा वेळी ते म्हणत, "गाईची धार काढण्यापूर्वी आधी तिच्या सडांना थोडे दूध लावावे तेव्हा कासंडीत धारेचे दूध येऊ लागते, तसे आहे हें !"

ते संथ गतीत मजकूर सांगत. शब्दांचे उच्चारही स्वच्छ असत; त्यामुळे लिहिणाराला कसलीही अडचण पडत नसे, पण पुष्कळदा 'लेखका'चा हात मधेच थवके. 'रोज रात्रीचा पाच मैलांचा तकाटा', अमकीतमकी योजना 'गावुटली' किंवा 'समाजाने थोडी 'चिणचीण' केली' अशासारखे कधी कानांवर न पडलेले शब्दप्रयोग ऐकले की आमचा गोंधळ उडाला तर नवल कसले ? मग हसून ते म्हणत, "लिही तू. तेच वरोवर आहे !"

वापूसाहेवांची चर्या दिसण्यात उग्र आणि रागीट असली तरी त्यांची विनोदवुद्धी त्यांच्या वोलण्यात वरचेवर चमकून जाई. आचार्य अत्रे यांच्याकडून नव्या नाटकाचे निमंत्रण आले की (सहसा कधी जाग्रणे न करणारे) वापूसाहेव आवर्जून जात. 'साष्टांग नमस्कार' पाहून आल्यावर त्यातील कित्येक विनोद (विशेषत: 'भोजराज प्राईज नाही तरी राजभोज प्राईज खास मिळेल' किंवा 'टि. म.चा वा. वि. होण्यापेक्षा एस.एम. आर.चा टी.सी.') ते पुन्हा पुन्हा सांगत आणि प्रत्येक वेळी तितकेच खळखळून हसत.

'सांवत्सरिक', 'विज्ञानवोध' वगैरे कामे चालू असतानाची गोष्ट आहे. सातारहून त्यांचा एक नातेवाईक मुलगा पुण्यास त्यांचेकडे आला. त्याने काहीतरी छोटा कामधंदा शिकावा म्हणून वापूसाहेवांनी त्याला टिळकरोडवरील जोगांच्या दुकानात सायकल दुरुस्तीचे काम शिकण्यासाठी ठेवला. वापूसाहेव मधूनमधून त्याची विचारपूस करीत आणि तोही 'ठीक चालले आहे' असे उत्तर देई. असे पाच-सहा महिने लोटल्यावर त्यांनी त्या मुलाला विचारले, "काय रे, दुकानात तू एकटा आहेस— दुसरे कुणी नाही. समज, एक गिऱ्हाईक सायकल हातात घेऊन आले. त्याला घाई आहे, तावडतोव सायकल दुरुस्त करून हवी आहे. हँडल वाकडे झाले आहे, एक-दोन पंक्चरे काढायची आहेत— तर तू आधी काय करशील?" त्यावर त्या मुलाने ताडकन उत्तर दिले, "मी आधी जोगांना वोलावून आणीन." पुढे कित्येक दिवस तो मुलगा दिसला की आम्हाला हसू आवरणे कठीण जाई. पुढे व्यवसायानिमित्त आमच्या गटातील त्यांचे विद्यार्थी पांगले. मी पुण्यातच राहिलो. वापूसाहेवांची गाठ पडली नाही असे वरेच दिवस गेले तर ते घरी येत. गप्पागोष्टी होत. सगळ्यांची विचारपूस करीत. त्यांना अतिशय गरम चहा लागतो हे घरी सर्वांना माहीत झाले होते. त्यांच्या सांगण्याप्रमाणे कपात कितीही चहा ओतून दिला तरी ते सगळा चहा कधी पीत नसत. थोडा तरी कपात वगळून ठेवीत. वर्षानुवर्षे त्यांच्या या लकवीत कधी फरक पडला नाही.

त्यांच्या व्यक्तिमत्वावर प्रकाश टाकणाऱ्या (आणि

आमच्या सतत अनुभवाला आलेल्या) आणखी एका गोष्टीचा उल्लेख करावयास हवा घरी आल्यावर गप्पागोष्टी होऊन ते जायला निघाले की जाता जाता एखादा किस्सा सांगून ते स्वतः खळखळून हसत व ऐकणारांनाही हसवून जात. ते शिक्षक होते त्या शाळेचे एक मुख्याध्यापक. कुत्सित बोलण्यासाठी प्रख्यात होते. सल्ला घेण्याचा वरपांगी आव आणून एकदा त्यांनी बापूसाहेबांना म्हटले, "काय हो, पुढच्या महिन्यापासून समजा शनिवारी शाळा सकाळची केली, तर काय होईल ?" आपल्या सद्याची मुख्याध्यापक महाशयांना कसलीही कदर नाही हे माटे ओळखून होते. 'शाळा सकाळची भरली तर–' या प्रश्नाला त्यांनी 'भरेल की' असे गंभीर मुद्रेने उत्तर देऊन ते तिथून तडक निघून गेले. हा विनोद ते पुष्कळदा सांगत; संभाषण संपवून घरी निघण्याआधी हसण्यासारखे गमतीदार न बोलता ते गेल्याचे सहसा मला आठवत नाही.

बापूसाहेबांनी तिकिटे काढून कुटुंबियांसमवेत कधी सिनेमा पाहिला असे वाटत नाही. पण त्यांना आग्रहाने इंग्रजी सिनेमाला नेण्याचा विक्रम आम्ही दोनदा केला आहे. एकदा ते आमच्याबरोबर (थोडेसे कुरकुरतच) 'वेस्टएंड' मधे आले. बॅ. आगरवालही आमचेबरोबर होते. पहिल्या महायुद्धाच्या पार्श्वभूमीवर आधारलेली ती एक गाजलेली फिल्म होती. 'ठीक आहे' या पलीकडे त्यांनी टीकाटिपणी केली नाही. नंतर एकदा रास्ता पेठेतील 'अपोलो' मध्ये 'गुड अर्थ' ही फिल्म लागली. आमच्या आग्रहाला मान देऊन ते पुन्हा आमच्याबरोबर आले. त्यासंबंधी बोलताना 'या क्षेत्रातले जे सगळ्यांत चांगले ते हेच ना ?' एवढीच त्यांची प्रतिक्रिया ! "यातले देखावे व इतर चिनी वातावरण अमेरिकेतल्या स्टुडिओत निर्माण केलेले आहे" असे आम्ही सांगून पाहिले, पण त्यांच्या अभिप्रायात फारसा बदल झालेला दिसला नाही !

प्रो. माटे यांच्या हाताखाली असंख्य विद्यार्थी शिकून गेले. त्या सर्वांजवळ बापूसाहेबांसंबंधीच्या अनेक आठवणी असणे स्वाभाविक आहे. त्यात आमच्या पिढीतील विद्यार्थी-गटाच्या आठवणींत वेगळेपण ते काय असणार आहे ? काही असले तर ते एवढेच की 'सांवत्सरिकाच्या, जवळपासच्या तीनचार वर्षांत कचेरीची शिस्त की आणखी कशामुळे म्हणा, बापूसाहेबांशी जवळजवळ रोज संबंध येत गेला. त्यामुळे औपचारिकपणा जाऊन त्याला हळूहळू कौटुंबिक घरगुतीपणाचे स्वरूप आले. आमच्या नोकऱ्या, लग्ने, प्रापंचिक अडचणी– या सगळ्यांत ते लक्ष घालीत. काही प्रसंगी तर आमच्यासाठी 'योग्य' ते करून, नंतर 'अमुक अमुक केले' असे सांगण्यासाठी नंतर ते घरी येत !

प्रो. माटे साताराच्या मातीत वाढलेले, त्यामुळे त्यांच्यावर कुणी टीका केली तर ती मुकाट्याने सहन न करता, उलट टोला हाणण्याची संधी ते सहसा वाया घालवीत नसत. अशावेळी निकटच्या स्नेह्यालाही ते दुखवून जात. त्यामुळे आचार्य अत्रे यांच्याशी असलेले जिव्हाळ्याचे संबंध न जुमानता बापूसाहेबांनी त्यांच्याशी एवढा वाद घातला की त्यामुळे साहित्यक्षेत्रात प्रचंड खळबळ माजली. पुढे उतारवयात याच बापूसाहेबांनी, मागचे सगळे विसरून, एका सत्कार समारंभात, बाकीचे सर्व हार दूर ठेवून या मित्राचाच हार तेवढा गळ्यात ठेवला ! त्यांचा घाटे-माटे वादही असाच गाजला. बापूसाहेबांच्या लेखनातील काही विधानांमुळे त्यांनी श्रीपादकृष्ण कोल्हटकर व प्रो. वामन मल्हार जोशी यांचा भक्तगण दुखावला गेला.

हे सर्व येथे सांगण्याचे कारण त्यांच्या एका वादातून माझ्यासारखा पामरही सुटला नाही; किंबहुना माझ्यामुळेच ते वादळ निर्माण झाले. त्याची थोडक्यात हकीकत अशी :

श्री. शि. ल. करंदीकरांनी 'त्रिकाळ' हे प्रथम साप्ताहिकाच्या स्वरूपात सुरू केले तेव्हापासून मी त्यांचा सहकारी होतो. पुढे 'त्रिकाळ' चे दैनिकात रूपांतर झाल्यावरही बरीच वर्षं मी संपादक मंडळापैकी एक होतो (श्री. करंदीकर यांचाही मी जुना विद्यार्थी.) त्या सुमारास प्रो. माटे यांचे 'रसवंतीची जन्मकथा' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. 'काव्य' या वाङ्मयप्रकारासंबंधी त्यांनी एक सिद्धांतवजा असे विधान केले होते की, गेयता हेच काव्याचे व्यवच्छेदक लक्षण आहे. अर्थात आम्हा (रोमँटिक) तरुण वर्गाला ते पटणे शक्य नव्हते. मग मी या विषयावर खांडेकर, कवि यशवंत वगैरेंच्या मुलाखतवजा 'जबान्या' घेऊन बापूसाहेबांविरुद्ध आघाडी उघडली. माटे स्वस्थ थोडेच बसणार ? त्यांनीही प्रतिटीकेची तोफ डागली. व पुढे बरीच रणधुमाळी माजली. त्यात संपादक शि. ल. करंदीकरही सामील झाले. त्यांनी माट्यांच्या सातारी पेहेलवानी मातीचा उल्लेख करून जास्तच डिवचले. बापूसाहेबांनी त्यांनाही खणखणीत

उत्तर दिले. या सगळ्या प्रकरणांत माझ्यावर ते नाराज होते यात नवल नाही; पण माझ्यावरचा राग व्यक्त करताना त्यांनी लिहिले की, साठे याने माझे आणखी शंभर अपराध केले तरच कदाचित मला त्याच्यावर रागावणे शक्य होईल. त्यांच्या या उद्‌गारांनी मीच शरमिंदा झालो !

बापूसाहेबांची मूळची अधु दृष्टी वयपरत्वे जास्त-जास्तच क्षीण होत गेली. नव्या पुस्तकाची प्रत हाती देताना सुरुवातीच्या काळात 'माझे फारा दिवसांचे मित्र... अशासारखा लांबलचक प्रस्ताव करुन नंतर 'सप्रेमभेट' असे लिहून ते स्वाक्षरी करीत. दृष्टी अधिकाधिक मंदावत गेली तसा आधीचा प्रस्तावही संकोचत गेला. शेवटच्या दुखण्याशी झुंज देत देत लिहिलेल्या पुस्तकाचे वेळी तर 'सप्रेम भेट' हेही गळून पडले. आता असल्या उपचाराची गरजही नव्हती. उरले फक्त वरच्या ओळीत 'साठे', खाली 'माटे !' त्यात सगळे आले !

## ४. आम्ही श्रीपाद महादेवांचे विद्यार्थी : सरोजिनी बाबर

आम्ही मंडळी तशी मराठमोळी. साधीभादी. त्यातून १९४० मध्ये पुण्याला नव्यानं आलेलो. आमच्या मुखी सातारी गावरान भाषा रुळलेली. पुण्याच्या भाषेचं वळण वेगळं. तशात आमच्या घरी महाविद्यालयाची पायरी कुणीही न चढलेलं. त्यामुळे सहाजिकच मी पुण्याच्या स. प. महाविद्यालयात जायला लागले तर पहिल्यांदा फार भुलून जायला झालं.

एक तर पुणं गाव मोठं. त्यातून ही स. प. महाविद्यालयाची दगडी मोठ्ठी इमारत. इथं परीटघडीचे अगर इस्त्रीचे कपडे घालून वावरणारे फार. इंग्रजी शब्दांचा वापर अनेकांच्या बोलण्यातून येणारा. तशी खरंच गडबडून जायला झालं.

पण आमच्या डी. पी. जोशींनी कुणाकुणाच्या ओळखी करून दिल्या. माझे वडील लेखक. समाजसुधारक. शिक्षकांच्या चळवळीतले अग्रणी. त्यांच्या अनेकांच्या ओळखीपाळखी. त्यामुळे प्रा. श्री. म. माटे यांचेशी त्यांचा परिचय झाला न् त्याच क्षणापासून बापूंनी (प्रा. माटेंनी) आमचं पालकत्व स्वीकारलं. मुलींनी खूप शिकलं पाहिजे असं त्यांचं म्हणणं. तशातच मी बहुजन समाजातून आलेली. खेड्यापाड्यात शिकलेली. डोईवरच्या पदराची. पायघोळ साडीची. अंगभर वस्त्रांची. साधीभोळी. मला बघून त्यांची नजर हसली. जिव्हाळ्यानं बोलली, "तू खूप शीक. मी शिकवीन." बापूंनी भाषा केली. जिवात जीव आला आणि मग कावऱ्याबावऱ्या नजरेनं महाविद्यालयात वावरणाऱ्या माझा जीव तिथं स्थिरावला. "इथं जायला हरकत नाही. शिकायला अवघड नाही." असा माझ्या मनानं कौल दिला न् मी बापूंच्या तासाला नियमित जाऊ लागले.

पाठ्यपुस्तकापेक्षा साहित्यविषयक कल्पनाविलासात बापूंनी आम्हाला मंत्रमुग्ध करून सोडलं. "माझा मऱ्हाटाची बोल कवतुके। परि अमृतातेही पैजा जिंके। ऐसी अक्षरे रसिके। मेळवीन ॥" ह्या ज्ञानदेवांच्या कल्पनेचा खुलासा त्यांनी आम्हाला आळंदीला नेऊन तिथल्या अजानवृक्षाच्या सावलीत बसवून केला. ज्ञानदेवकालीन समाजमनाची कल्पना देत देत आम्हा विद्यार्थ्यांनी समाजसेवेचं व्रत कसं स्वीकारणं अगत्याचं आहे त्यातलं सोदाहरण विवेचन केलं. ज्ञानदेवांच्या समाधीचं दर्शन घेताना माय मराठीचा अभ्यास मनापासून करण्यासाठी वचनबद्ध केलं. महाविद्यालयातील वर्गाप्रमाणंच बापूंनी त्या वर्गाबाहेरच्या विश्वातही आम्हाला शिकवायला सुरुवात केली.

मला आठवतं. बापू मधूनमधून सायंकाळच्या वेळी त्यांच्या सवडीनुसार आम्हाला टिळकरोडवरील टिळक स्मारक मंदिरात बोलवायचे. अशा वेळी आपली सामाजिक बांधिलकी कशी असावी, कशी नसावी त्यातले धडे गिरवायला सांगताना आपला अनुभव ऐकवायचे. लोकांच्या कामाचा परिचय सोदाहरण करून द्यायचे. अनेकांचे बरेवाईट दाखले त्यांच्या मुखातून कानावर पडले की, आमचं पण मन सामाजिक चळवळीत रमून जायचं. आपणही समाजाच्या हिताचं काही करावं अशा मोहात गुंतून पडायचं.

बापू मुळातच रुबाबदार शरीरयष्टीचे. त्यामुळं आविर्भावासह त्यांनी प्रकट केलेले समाजसुधारणाविषयक विचार, अध्यात्म, गीता, भक्ती, दुर्बल वैराग्य

किंवा राष्ट्रघातक मनोवृत्ती अशा विषयांवरील त्यांचं भाष्य ऐकताना फार बरं वाटायचं.

बापू तसे श्रद्धाळू होते. ज्ञानदेव, तुकाराम, जनाबाई, एकनाथ इत्यादी साधुसंतांनी विठोबाचं केलेलं गुणगान त्यांना मानवायचं. त्यांचं अभंग संकीर्तन नजरेखालून घालताना ते गहिवरून जायचे. त्या कारणानं ह्या संतमंडळींचं काव्य आणि कार्य विधायक दृष्टिकोनातून त्यांनी समजावून दिलं की, आमचे कान तृप्त व्हायचे "पाहुणे घरासी आले ऋषीकेशी" या संदर्भात तुकोबारायांची उडालेली धांदल गडबड बापू आमच्यासमोर असे साक्षात उभे करायचे की, आपल्या मनानं देहू आळंदीच्या काठावरील इंद्रायणीलादेखील आम्ही मनोभावे दंडवत घालावा! तुकोबांच्या भावविश्वात रमून जाताना हा महाभाग आपलं सर्वस्व त्यांच्या चरणी अर्पण करायला तयार व्हायचा! ...झालंच तर आळंदीचे ज्ञानदेव निवृत्ती ही भावंडं आपल्या नित्याच्या जीवनासाठी भीक्षांदेही करीत. कार्यमग्न असली तर छोटया मुक्ताईला मी खेळवीत बसेन असं सांगताना उरीपोटी दाटलेलं त्यांच्या ठायीचं वात्सल्य बापू जणू आम्हा विद्यार्थ्यांवरच शिंपताहेत असा भास व्हावा एवढ्या आत्मीयतेनं ते आम्हाला शिकवायचे. अवघड विषय सोपा करून सांगताना जणू ते आमचे पालक बनत. आम्ही विचारलेल्या शंकाकुशंकांनी सुखावून जात. आमच्यातील ज्ञानलालसा वाढत्या वयाचं लेणं ल्यावी असा त्यांचा आग्रह असे. सर्व प्रकारचं ज्ञान आपल्या विद्यार्थ्यांना व्हावं अशी त्यांची हौस असायची.

त्यामुळं बापूंच्या हाताखाली शिकताना व वावरताना आम्ही साजिवंत होत असू!

मात्र बापूंना कधीही वावगं खपत नसे. घंटेच्या ठोक्यासरशी सर्वांनी वर्गात आलंच पाहिजे असा त्यांचा कटाक्ष असे. त्याचबरोबर एकमेकांशी कुजबुजत वा डिवचत न बसता वर्गात लक्ष जाग्यावर ठेवून त्यांचं सांगणं ऐकलंच पाहिजे असाही ते आग्रह करीत. रोजचा तास सुरू होताना "सभ्य गृहस्थ हो, काल आपण कुठवर आलो आहोत?" असं त्यांनी विचारलं की, त्यांच्या नजरेच्या टप्प्यात येणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यानं चटकन् उठून काल बापू शिकवताना कुठं थांबले होते ते सांगितलं म्हणजे ते मनापासून हसायचे. डोळे किलकिले करीत शाबासकी द्यायचे. पण जर का चुकलंच कुणी तर मग असे रागावायचे की, भीतीनं अंगावर काटा आलाच पाहिजे... "ध्यानात ठेवा, उद्यापासून हे चालणार नाही! ..." असं सांगत त्यांनी शिकवायला सुरुवात केली तरी मनातला त्यांच्या रागातला धसका लवकर कमी व्हायचा नाही.

मला आठवतं, आमच्या बी. ए. च्या परीक्षेच्या वेळी बापू कुठंही भेटले तरी अभ्यासातलं महत्त्वाचं काय ते वाच म्हणीत. पुस्तकातल्या पानांचे क्रमांक सांगायचे. एकदा-दोनदा तर त्यांनी घरात जेवतानाही मला व्याकरणातले बारकावे समजावून दिले. आणि परीक्षा आठवड्यावर आली म्हणताना प्रश्नपत्रिका काढायला सांगितली. क्षणभर त्या वेळी जीव धसकला पण मग माघार घेऊन भागणार नव्हतं तर केला निर्धार. भीत भीत का होईना काही प्रश्न लिहून काढले. बापूंना दाखवले तशी बापू एवढे खूप झाले की, बोलायचं काम नाही.

एकदा अशीच खूप गंमत झाली. आमच्या वर्गावर एक पाहुणे आलेवते. कोल्हापूरचे. तर त्यांनी काही प्रश्न विचारले असता उत्तर देताना माझ्या मुखी 'लई' हा शब्द रुळला तशी ते पाव्हणे बोलून गेले, "गावंढळ आहेस! अशी भाषा वापरून तू बी. ए. होणार नाहीस!" त्यासरशी मी गांगरून गेले. भराभरा बापूंकडे जाऊन अशानं असं आहे म्हटलं तर तेही क्षणभर गंभीर झाले. पण मग लगेच म्हणाले, "ह्या बोलण्याकडे लक्ष देऊ नकोस. जुन्या काळच्या साहित्यात लई हा शब्द वैभव या अर्थानं आला आहे. असूदे तो तुझ्या वापरात चालेल..."

आजकाल माझ्या लेखनात हा शब्द आला की, वर्गातला तो प्रसंग नजरेत भरतो. न् बापूंचे हे उत्तर कानात घुमते. लोकसाहित्यात तर हा शब्द मानाचा. सर्वसामान्यांच्या बोलण्यातला. मी तो मनसोक्त वापरते. कधी "फार फार" या अर्थानं, कधी "भरगच्च" या अर्थानं तर कधी 'वैभवशाली' या अर्थानं. माझं हे गावरानपद मला भावतं न् मग बापूंची याद काढीत मी कोण काय म्हणेल ह्याचा विचार मनात येऊच देत नाही!

महाविद्यालयात असताना 'पेन फ्रेंडशिप' या माझ्या कथेचा बोलबाला झाला. कौतुक झालं. पण बापू मला रागावले, "इतक्यात कथा लिहायची नाही. पोक्तपणा येऊ दे, तोवर निबंध लिहावा."

त्यावेळी मी गप्प राहिले. काय बोलू? माझा डोई-

वरचा पदर खांद्यावर घसरलेला त्यांना खपत नव्हता आणि आमच्या वर्गातील मुलामुलींची प्रेमप्रकरणं ज्यांना चालत नव्हती तिथं माझ्या कथेतली तसली भाषा त्यांना खपावी कशी ? म्हणून मनात आलं, "तुम्ही लिहिता कथा तर मग आम्हीच का नाही लिहू ?" असं बोलावं. पण हिंमत झाली नाही. फाड्किनी तोंडात बसली असती यातली खात्री तर होतीच पण गुरुजींना उलटा शब्द केल्याचं कळलं तर घरातही पाठ सैल होणार यात शंका नव्हती म्हणून जीभ आवरली...पण मग लक्षात आलं "मंगळवेढ्याचं कुसू" सारखी बापूंची कथा लिहिण्याची ताक़द आपल्यात कुठाय ? मीच आपली समजूत घातली न् मग काही लिहिलंच तर ते बापूपर्यंत जाणार नाही याबद्दल दक्ष राहिले !...

पण आता जेव्हा मी लोकगीतं न् साधुसंत किंवा पंढरी न् देहू न् आळंदी किंवा पैठण या संदर्भात कथात्मक लेखन करते तेव्हा बापूंचं बोलण आवर्जून लक्षात येतं. अशा कथा विश्वात रमताना न् वाचकांकडून शाबासकीची पावती घेताना बापूंना काय म्हणायचं होतं ते मला कळतं, मन गहिवरून जातं...बापूंची फार आठवण येते...कल्लोळत्या हरिनामातील अर्थ उमगतो. बापूंच्या ठायीच्या रसिकतेची कल्पना येते न् मग–

झाला झाला झणत्कार
आले आले ज्ञानेश्वर

ह्या पंढरीच्या राऊळातील लोकगीतांनी दाखविलेला चमत्कार आपली नजर पाहू शकते या कल्पनेनं हरखून जायला होतं...

अशावेळी मनात येतं की, १९५२ च्या सार्वत्रिक निवडणुकीसाठी मी उभी राहिले त्यावेळी बापू फार धास्तावून गेले होते, ते बरोबर नाही. शिराळा महालात माझी उमेदवारी मान्य झालेली सांगली भागात. तिथं दहशतीचं वातावरण. माणसं भालेबर्चे न् भरलेल्या बंदुका पिस्तुलं घेऊन फिरतात हे त्यांच्या कानावर आलेलं. तशात प्रचार कार्यात फिरताना अपघात होऊन माझ्या अधू पायाला दुखापत होऊन पाय प्लॅस्टरमध्ये आलेला. तर मी पुण्याला आले. अधून मधून तर धास्तावल्या नजरेनं बापू माझ्या पाठीवरून न् तोंडावरून हात फिरवीत म्हणायचे, "तू या क्षेत्रात उतरलीस ? प्रोफेसर व्हायचं सोडून हे काय ?..."

त्यावेळी "मला कोण काही करणार नाही" याची खात्री देते त्यांना "तुम्ही निर्धास्त असा" म्हटलं तरी क्षणभर का होईना मीही बावरून जायची, "तुला कुणाचा वेडा वाकडा स्पर्श व्हायला नको" म्हणणाऱ्या बापूंच्या पायांवर डोकं ठेवून त्यांचा आशीर्वाद मागताना भांबावून जायची..."

लोकसाहित्याच्या क्षेत्रातील काम करण्याची संधी मला आमदार झाले म्हणून मिळाली. ह्या वस्तुस्थितीला त्यांनी मानलं न् मी सर्वसामान्यांच्या वाङ्मयीन सेवेत आले ह्याचा त्यांना ब्रह्मानंद झाला...!

लोकसाहित्यातील मला मिळालेली कथा गीतं सर्वसामान्यांच्या भाषेत अशी जेव्हा मी त्यांना दाखविली जेव्हा ते फार सुखावले.

घर माझं निर्मळ
ढगा वाचून आभाळ

ही लोकगीतातील कल्पना त्यांच्या पसंतीला उतरली न मग–

सासर एवडा वस नका करूसा सासवाई
दारीच्या चाफ्यापाई दूर देशाची आली जाई

ह्या ओवीला अक्षरशः सोलून काढीत तिच्यातल्या उपमा दृष्टांतातली माहिती करून देताना त्यांनी जे वक्तव्य केलं ते मी कधीही विसरू शकणार नाही.

बापूंनी मला केवळ पदवी धारण करायला शिकवलं नाही याचा आता फार अभिमान वाटतो. अशावेळी साहित्य परिषदेत नेऊन संपादन कसं करावं, शब्दकोश कसा तयार करावा, प्रुफं कशी वाचावीत, विचार करून कसं लिहावं यातले बापूंनी गिरवायला लावलेले धडे मला अजून एवढा आधार देतात की, त्या बळावर ही श्रीपाद महादेवांची विद्यार्थिनी जन्मभर त्यांचं नाव राखील यातला आत्मविश्वास बळावतो.

मी बी. ए. झाले त्यावेळची गोष्ट. मराठी विषयात माझा विद्यापीठात पहिला नंबर आला. तशी साहित्य सम्राट तात्यासाहेब केळकरांचं 'यशोदा चिंतामणी' पारितोषिक स्वीकारताना स. प. महाविद्यालयात एक समारंभ आयोजित केला गेला होता. त्यावेळी गु. द. वा. पोतदार, गु. डॉ. के. ना. वाटवे, गु प्रा. श्री. म. माटे, पूज्य साने गुरुजी, गु. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे असे कोण कोण आलेले. मी बी. ए. नंतर काय करावं यासंबंधी बोलणी निघालेली. तशी साने गुरुजी म्हणाले, "ज्या समाजात आपण जन्माला येतो. त्या समाजाचं ऋण माणसानं फेडावं. तू लोकगीतं गोळा करून ती पसा पसा वाट. वसा घे. घेतला वसा टाकू नको. उतू नको

मातृ नको." वापूंना न् दत्तो वामनांना ही कल्पना आवडली. त्यांनी होकार भरला. मी हुंकार दिला.

जन्मल्यापासून मी लोकगीतांच्या घोळघामेळ्यात वाढलेली. लोककथांच्या सहवासात रमलेली. उखाण्यांच्या जगात वावरलेली. कथा-गीतांच्या सुरात भिजून चिंब होत खेळलेली. त्या कारणानं मला त्यात काही नवीन नव्हतं. पण मी हे सारं ऐकलेलं, म्हटलेलं, सांगितलेलं. कोणी कधीच न केलेलं ना ? म्हणून पडलं कोडं. तर वापू बोलले, "पांढरं वावर काळंबी चतुर म्हणतो पेरीन मी" असं तुझी आई लेखकाचं कोडं घालते ती कोडी शीक. आईला गुरू कर. घे धडे. पोटभर गीतं गा. मनसोक्त लोककथा सांग. साने सांगतो (साने गुरुजी) तसं कर. लोक वश होतात. आपलेपणानं आपल्याशी वागतात."

लोक म्हणतात, "स. प. कॉलजचे विद्यार्थी लेखक कवी म्हणून मिळवतात. त्यांच्यावर श्रीपाद महादेवांचा वरदहस्त आहे." आणिक मग आम्ही पण अशावेळी खुशीनं मान डोलावतो. मनापासून हसत मुरकावतो अगदी डामडौलानं जगतोही.

## ५. हा गूळ, हे पैसे ! : भा. द. खेर

"आज रोख उद्या उधारं" अशी पाटी आजही कित्येक किराणा मालाच्या दुकानांतून दिसते. परंतु वापूसाहेब माटे यांना त्या पाटीवरचा मजकूर कधीच मंजूर नसे. ते म्हणायचे, "दुकानदारांची ही व्यापारी चरवलाशी किंवा मखलाशी आहे. तुम्हाला उधार माल द्यायचा नाही ना ? मग वापुड्या गिऱ्हाइकाला त्या पाटीवरचा 'उद्या' कधी भेटणार आहे का ?"

मग म्हणायचे, "तसं पाहिलं तर त्या दुकानदाराचं बरोबरच आहे. गिऱ्हाईकाला एक प्रकारे फसवूनच तो आपला व्यापारउदीम करीत असतो."

काही वेळ कुणीच काही बोलायचं नाही. मग डावा बावटा पकडून हसून म्हणायचे, "ही पाटी आता फार जुनी झाली. पाटीवरची अक्षरही गुळगुळीत झाली. त्यापेक्षा पाटीवर असं लिहिलं तर काय होईल ?"

निरर्थक प्रश्नचिन्ह, "कसं ?"

"हा गूळ हे पैसे...असं सरळ लिहिलेलं वरं नाही का ? उगाच अलंकारिक हवं कशाला ?... म्हणे आज रोख उद्या उधार..."

ऐकणाराला होकार भरल्याशिवाय गत्यंतर नसे. कारण बापूसाहेब ही आदरणीय संस्था होती.

त्यांचं हे व्यावहारिक तत्त्वज्ञान घरापासूनच सुरू होई. वापूसाहेबांनी आपली चांगली चांगली पुस्तकं स्वतःच प्रकाशित केली. दुसरा प्रकाशक त्यांना फारसा भावला नाही. त्यांच्याच भाषेत सांगायचं म्हणजे काही दुय्यम पुस्तकं त्यांनी प्रकाशकांच्या पदरात टाकली.

वेळ ठरवून प्रकाशक घरी यायचा. बहुतेक दुपारी अडीचच्या चहाच्या वेळी त्याला बोलावलं जाई. चहा घेताना तो पोरसवदा प्रकाशक अंग चोरून बसलेला असे. स्वतः चहाचे कप आत नेऊन ठेवल्यावर ते बाहेर येऊन बसत. मग प्रकाशकाच्या मागचा तक्क्या आपल्या तक्क्याजवळ आणून त्याला टेकून बसण्याची खूण करत. खास 'खाजगत' करण्याचा त्यांचा हा प्रकार असे. खाजगतीचा मान त्या प्रकाशकाला मिळाला म्हणजे तो अगदी संकोचून जाई.

मग हुंदका दिल्याप्रमाणे गालातल्या गालात हसून बापूसाहेबांचा प्रश्न यायचा, "माझं पुस्तक घ्यायचा तुमचा ठराव पक्का झाला ना ?"

प्रकाशकानं होकारार्थी मान हलवली म्हणजे विचारायचे, "आपला व्यवहार म्हणजे हा गूळ आणि हे पैसे असाच ना ?"

प्रकाशकाला काही उमगायचं नाही.

"म्हणजे रोखीचाच व्यवहार ना ?"

प्रकाशक सांगायचा, "आपला व्यवहार ठरला म्हणजे एक तृतीयांश पैसे. पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर एक तृतीयांश पैसे आणि उरलेले सहा महिन्यांनंतर !"

यावेळी बापूसाहेबांच्या तोंडावरचं हसू मावळलेलं असायचं. हसू आणि क्रुद्धभाव यांचं मिश्रण मुखावर उमटायचं. त्यातच म्हणायचे, "मी तुम्हाला हप्त्याहप्त्यानं पुस्तक दिलेलं चालेल का ? आज पन्नास पानं... उद्या पंचवीस पानं... उरलेली पानं सहा महिन्यांनी... अशा तऱ्हेनं... त्यापेक्षा हा गूळ हे पैसे हा व्यवहार बरा नाही का ?..."

...८

प्रकाशकाच्या चिकाटीला इथून प्रारंभ व्हायचा. कारण त्याला प्रत्यक्ष व्यवहार करायचा असे.

शेवटी 'होय–नव्हे' करता करता काहीशी मुरड घालून हप्तेबंदी ठरायची.

प्रकाशक निघून गेल्यावर खूण करून मला बसवून घ्यायचे. मी विचारायचा, "हा व्यवहार असा का ठरवलात?"

मिश्किलपणानं हसून म्हणायचे, "तुमच्या ध्यानात येत नाही. प्रथम टोकाचं बोलायचं असतं. पण मध्यभागी तोडायचं असतं."

"पण हा गूळ आणि हे पैसे..."

"किराणा मालाचा दुकानदार त्या पाटीप्रमाणे वागतो का? आपल्या विद्येच्या दुकानातही तेच!"

'विद्या' हा शब्द उच्चारायचे आणि लगेच विषादानं म्हणायचे, "विद्येपेक्षा किराणा मालाचा व्यापार तेजीत चालतो."

मी प्रश्नार्थक मुद्रेनं बघितलं की सांगायचे, "साधा व्यवहार बघा...बँकेत कोरा कागद गहाण ठेवला की, त्यावर कर्ज मिळतं. पण त्या कागदावर आपली विद्या उमटली रे उमटली की, बँक त्या उमटलेल्या विद्येला हिंग लावून पुसत नाही... त्यापेक्षा गुळाच्या ढेपा बँकेला चालतात."

मी उगाच पुटपुटलो, "पण विद्येचं श्रेष्ठत्व..."

"म्हणजे ती पुस्तकातली कविता ना?... विद्येनेच मनुष्या आले श्रेष्ठत्व या जगामाजी... न मिळे एकहि वस्तू विद्येनेही असाध्य आहे जी।... सुभाषितं... या अशा कविता तुम्ही सर्वथा खऱ्या धरून चालता होय?"

एकदा साहजिकच विद्यादान करणाऱ्या शिक्षकांकडे विषय वळला. म्हणाले, "मास्तर शाळेत काहीतरी विद्यादान करतात ना? मग त्यांच्या विद्येला कधी श्रेष्ठत्व आलं आहे का? एकच गोष्ट त्यांना हमखास साध्य झाली आहे. ती म्हणजे अपमान, अवहेलना दारिद्र्य..."

'या दारिद्र्याला काडी लावली पाहिजे!' हे तर त्यांचं परवलीचं वाक्य होतं. आयुष्यात दारिद्र्याचे किती तीव्र चटके त्यांना बसले होते, हे यावरून दिसतं.

परंतु हा विचार केवळ स्वतःपुरता नसे. त्या त्यांच्या विचाराला नेहमीप्रमाणे सामाजिक अधिष्ठान असायचं. तर्कशास्त्राच्या अनुमान पद्धतीत व्यष्टीकडून समष्टीकडे जाण्याची पद्धत असते ना? त्याप्रमाणे त्यांच्या विचाराची पद्धत असे. समष्टीचा विचार करताना स्वतः बापूसाहेब एखाद्या बर्फखंडासारखे वितळून जात आणि समस्त मास्तर मंडळींच्या प्रवाहात एकरूप होऊन जात. 'मास्तराने जगावे किती?' हा त्यांचा निबंध त्यातून साकार झाला.

दारिद्र्याबरोबरच मास्तरांना अपमानाला, अवहेलनेला नेहमीच तोंड द्यावं लागतं याची स्वतः भोगलेली अनेक प्रसंगचित्रं ते रंगवून सांगत असत.

खूप परिश्रम करून अनेक तरूण मित्रांना बरोबर घेऊन बापूसाहेबांनी 'हिंदुत्व कोश' तयार केला. पण त्या कोशाबद्दल सन्मान झाला तो ल. ब. तथा अण्णासाहेब भोपटकरांचा!

हा प्रसंग सांगताना ते म्हणायचे, "अण्णासाहेबांना शाल-श्रीफळ मिळालं, पण त्या कोशकर्त्यांना शालजोडीतले मिळाले."

हे सांगताना खळखळून हसायचे, पण मनातला अपमानाचा डंख ऐकणाराला जाणवायचा.

१९५० साली 'नेहरू-लियाकतअली' करार झाला. त्यावेळी बापूसाहेबांना अकल्पितपणानं तुरुंगवारी घडली. त्या वेळी त्यांनी जे जोषानं लेखन केलं ते अंगाशी येण्याचा संभव आहे, असं आम्हापैकी कित्येकांना वाटत होतं. त्या वेळी डावी छाती पुढे करून आवेशानं म्हणायचे, "हे सारं मी लिहितो आहे ना? मी कोतवालीत जाईन."

परंतु प्रत्यक्ष जेव्हा कारावास घडला तेव्हा मात्र काहीसे हादरले. ते बरोबरच होतं. जीवनात नुकतीच कुठे सुखाची सावली आली होती. जन्मभराच्या उन्हाळी संसारात सुखद, शीतल झुळुक वाहायला लागली होती. एवढ्यात त्यांच्या वाट्याला तुरुंगाची हवा आली होती. शेवटी काहीतरी समझोत्याचं लिहून देऊन त्यांची मुक्तता झाली. त्यांनी जे जे लेख लिहिले होते त्याबद्दल त्यांनी मुक्त मनानं जनतेची माफी मागितली.

अतिशय तर्कशुद्धतेनं आणि खास शैलीनं लिहिणाऱ्या या थोर साहित्यकारानं मागितलेली माफी आम्हा कुणालाच पटली नव्हती. त्यावर आमची एक बैठकही झाली. आम्ही आपापल्यापरीनं आमची नाराजी व्यक्त केली.

आमचं म्हणणं डोळे मिटून ऐकून घेतलं, पण डोळे मिटून मानलं मात्र नाही.

शांतपणानं म्हणाले, "झालं तुमचं म्हणणं! हे सारे लेख लिहिताना मी त्या त्या वेळी विचार केला नव्हता असं थोडंच आहे? माझा त्या वेळेचा विचार बरोबरच होता. पण कालांतरानं मला तो विचार बदलावा लागला. म्हणून त्या त्या वेळेचा विचार बरोबर नव्हता असं मात्र मुळीच नाही. तुम्ही हे जे बोलताहात ते परिणामावरून बोलता आहात!"

आमच्यापैकी कुणीतरी विचारलं, "तुमची त्या वेळेची मतं बरोबर होती... म्हणूनच माफी मागण्याचं काही कारण नव्हतं."

मग उद्वेगानं म्हणायचे, "जन्माच्या दारिद्र्याला काडी लावण्यासाठी काडी नुकतीच पेटवली. मी जर तुरुंगात खितपत पडलो असतो तर पेटलेली काडी विझली असती आणि पुन्हा दारिद्र्याची पाचवी पुजावी लागली असती."

आज वाटतं की, त्यांचे ते विचार बरोबर होते. अव्यवहारी माणसंच व्यवहारी माणसाला व्यर्थ हिणवत असतात. व्यवहारी असणं हा दुर्गुण थोडाच आहे?

त्यांच्या संसारात हळूहळू समृद्धी डोकवायला लागली होती. त्या गोष्टीचा आनंद त्यांच्या मनाशी सदैव गुंजत असे. स्वारी संतुष्ट दिसायची. कुणी मासिकाला लेख मागायला आला की त्याला पहिला प्रश्न विचारायचे, "हे सारं नाटपेड नाही ना?"

"साहित्याच्या आवडीनं आम्ही नुकतंच मासिक काढलं आहे...तेव्हा..."

मधेच त्याला अडवून म्हणायचे, "ते ठीक आहे. आम्ही आजवर सरस्वतीची सेवा खूप केली. आता म्हातारपणी थोडी लक्ष्मीची सेवाही करू दे की!"

लेखाचा व्यवहार ठरायचा किंवा ठरायचा नाही. परंतु मासिकाचा तो संपादक निघून गेल्यावर मिष्किलपणानं हसत माझा बावटा धरून म्हणायचे, "मधूच्या आईचं नाव लक्ष्मीच आहे हो! पण तीही माझ्या सरस्वतीच्या सेवेतच जन्मभर सहभागी झाली. आपलं नाव ती विसरून गेली. बरोबरच आहे. हिंदूसहधर्मचारिणीच आहे ना ती!"

मग खास हलक्या आवाजात म्हणायचे, "आत्ताशी कुठे ती साळढाळ खर्च करायला लागलीय."

याचा अर्थ संसारात थोडीफार समृद्धी नांदायला लागली आहे असा असायचा. पण लगेच विषय बदलला जायचा किंवा फिरायला जायची वेळ व्हायची...

एकदा मी माझा लेखन-संकल्प त्यांच्याजवळ जाहीर केला. म्हणालो, "मी आता धावती संतचरित्रं लिहिणार आहे. ज्ञानेश्वर..."

माझं बोलणं पुरतं व्हायच्या आतच म्हणाले, "आत्ताच लिहू नका... त्यासाठी खूप वाचन-चिंतन हवं!"

मी म्हणालो, "वाचन चाललंच आहे की! चिंतन करता येईल!"

माझ्या बोलण्यात थोडा करडेपणा होता. वाचन-चिंतन करणाऱ्यांनी दुसऱ्यांच्या वाचन-चिंतनाबद्दल फारशी काळजी करायचं कारण नाही, असाही भाव कदाचित् माझ्या बोलण्यात उमटला असावा.

तेही वडीलकीच्या अधिकारानं म्हणाले, "मला तुमचं मोठं नवल वाटतं. तुम्ही कादंबरी चांगली लिहिता. ते सोडून या ज्ञानाच्या प्रांतात कशाला उगाच शिरता?"

ज्ञानसाधनेची विकट वाट तुम्हाला कधीच आक्रमिता येणार नाही, असाच जणू त्यांचा इशारा होता. त्यांच्या बोलण्यावर मी काहीच बोललो नाही. मात्र माझा अहंकार कुठेतरी दुखावला गेला होता खास!

मी मुळीच गप्प बसलो नाही. काही काळानं आमच्या 'रोहिणी' मासिकातून मी संतचरित्रमाला लिहिली. पुढे 'आषाढी-कार्तिकी' या नावानं ते पुस्तकही प्रसिद्ध झालं. त्या पुस्तकाच्या दोन-तीन आवृत्त्याही निघाल्या

परंतु त्याचं कौतुक केलं तेही बापूसाहेबांनीच! 'रोहिणी' मासिकात माझा पहिला लेख प्रसिद्ध झाला. 'ज्ञानाचा नंदादीप ज्ञानदेव.' हा लेख प्रसिद्ध झाल्याबरोबर पुण्यातल्या पुण्यात मला त्यांचं पत्र आलं. त्या पत्रात लिहिलं होतं, "नंदादीप वाचला. लेख अत्युत्तम झाला आहे. संतवाङ्मयात तुम्ही चांगलेच डुंबलेले दिसता. असे अनेक शोभिवंत लेख लिहा!"

पत्र वाचून मी हरखून गेलो. पण ऐन तिशीत असून मी चढून मात्र मुळीच गेलो नाही. कारण बापूसाहेबांनीच दिलेली फूटपट्टी माझ्याजवळ होती.

बापूसाहेबांचं हे फूटपट्टी प्रकरण मोठं मजेशीर होतं. ते नेहमी म्हणायचे, "ज्याच्या त्याच्या पात्रतेची फूटपट्टी ज्याच्या त्याच्याजवळ हमखास असलीच पाहिजे. कुणीतरी आपल्याला म्हटलं की, याला बाराखड्याही येत नाहीत तर लगेच आपली फूटपट्टी काढून मोजायचं.

बरं, कुणी आपली भलावण करताना म्हटलं की, कालिदासानंतर हाच मोठा साहित्यिक झाला. लगेच पुन्हा आपल्या फूटपट्टीचा प्रयोग करायचा."

आणि मग एखादा तत्त्वबोध सांगितल्याप्रमाणे म्हणायचे, "हे पहा, खरं सत्य हे नेहमी कुठे तरी मध्यबिंदूवर असतं !"

'आपण आपल्या देवांना, संस्कृतीला सांभाळून राहिलं पाहिजे !' असं ते नेहमी म्हणत.

म्हणूनच ते संस्कृती संरक्षक मंडळाचे पदाधिकारी बनले.

आचार्य अत्रे यांचा 'ब्रँडीची बाटली' हा चित्रपट प्रकाशित झाला आणि 'अत्रे-माटे' वाद उभा राहिला. त्या वादात आम्ही बापूसाहेबांच्या बाजूचे होतो. आचार्य अत्रे यांनी त्या चित्रपटात श्रीकृष्णाची कुचाळी केली, असं आम्हालाही वाटत होतं. बापूसाहेबांनी सभा-भाषणांची झोड उठवली. शेवटी चित्रपटातला आक्षेपार्ह भाग कापून टाकण्यात आला. बापूसाहेब म्हणायचे, 'आम्ही चित्रपटाचं नाकच कापून टाकलं' तर अत्रे म्हणायचे, 'आम्ही माटयांना शे-सव्वाशे फूट फिल्मचं दान देऊन टाकलं !'

बापूसाहेब खाजगतात म्हणायचे, 'पडलो तरी नाक वर, असं म्हणण्याचा बाबूरावांचा स्वभावच आहे!'

अत्रे-माटे वाद चांगलाच रंगला. एकमेकांनी एकमेकांचे वाभाडे काढले. वाटलं होतं की, एकमेकांनी एकमेकांना केलेल्या जखमा कधीच बुजणार नाहीत. पण आमची ही बालबुद्धी होती.

माधवराव पटवर्धन आपल्या 'निवांत' बंगल्यात गेले. सकाळची वेळ होती. मी लॉ कॉलेजला त्या वाटेनं चाललो होतो.

बापूसाहेबांनी माझी सायकल थांबवली आणि म्हटलं, "चला...माधवराव गेले."

मी थबकलो. एका बाजूला अत्र्यांची छोटी मोटर उभी असलेली दिसली.

काही वेळानं 'येतोच' असं म्हणून बापूसाहेब सरळ अत्र्यांच्या गाडीत जाऊन बसले.

मला आश्चर्य वाटलं. परस्परांवर कठोर शब्दांचे घाव घालणारे हे दोन थोर साहित्यकार ! बघता बघता परस्परांच्या खुषीत दाखल होतात !

मी दुसऱ्या दिवशी त्यांना विचारलं तेव्हा म्हणाले, "आमचं खाजगतातलं वैर थोडंच आहे ? बाबूराव आपला गमत्या आहे. पण तल्लख बुद्धीचा हं !"

आठ-पंधरा दिवस गेले असतील. एके दिवशी संध्याकाळी उशिरा घरी आले.

आल्याबरोबर म्हणाले, "आज जरा उशीर झाला."

मग एखाद्या निरागस लहान मुलाप्रमाणे म्हणाले, "आज आम्ही कुठे गेलो होतो ओळखा पाहू !"

नंतर स्वतःच सांगितलं, "मी आणि अत्रे आज संध्याकाळी पर्वतीला गेलो होतो."

"पर्वतीला ?"

"होय, होय...आमचं काय बोलणं असेल सांगा पाहू ! तुम्ही कादंबरीकार आहात ना ? दुसऱ्याच्या मनातलं ओळखता तुम्ही !"

आज बोलण्याची पट्टी वय विसरलेली होती.

मीही गमतीच्या पट्टीत म्हणालो, "आम्ही कादंबरीकार दुसऱ्याच्या मनातलं काही ओळखत नाही... आमच्याच मनातलं पात्रांच्या मनी घालतो !"

मग पर्वती-भेटीचा वृत्तांत कथन केला.

सांगायला लागले, "आज अत्रे जुन्या गोष्टीत रंगून गेले होते. आपली संस्कृती, आपले जुने रीतिरिवाज कसे चांगले आहेत, त्याचं स्तवन चाललं होतं."

मधेच थांबले. नंतर मिष्किलपणानं म्हणाले, "पूर्वीच्या आपल्या बाळंतिणी कशा तऱ्हेनं पदर घ्यायच्या हे तुम्हाला माहीत असणारच! कारण तुम्ही जुन्या घराण्यातले आहात...डावीकडून उजवीकडे पदर घ्यायचा आणि पुन्हा तो पदर डावीकडं मुडपायच्या. म्हणजे डोईसरशी पदराची टोपी होते. कान-कपाळ चांगलं झाकलं जातं. वारा लागत नाही. अत्र्यांना असा पदर आवडायचा; आणि आता असा घेतलेला पदर बघायला मिळत नाही. याबद्दल त्यांना खंत वाटते. नवलच आहे मोठं !"

"असाल तसे या" असा एके दिवशी दुपारी दोन अडीचच्या सुमारास मला निरोप आला. मी लगेच त्यांच्या नातू बागेतल्या घरी गेलो. स्वतःच दार उघडायला आले. मी बघितलं तर आचार्य अत्रे पाय पसरून तक्क्याला टेकून पसरले होते.

मी क्षणभर उभाच राहिलो. "मी जरा जाऊन येतो" असं म्हणताच बापूसाहेब म्हणाले, "कुठे उन्हाचे जाता ?"

गडगडाटी हास्य करून अत्रे म्हणाले, "अहो ते उन्हातूनच आले आहेत ना ? मग ?"

अत्र्यांचं बोलणं ऐकून मला वाटलं, तो जाण्याचा इशारा असावा.

एवढ्यात बापूसाहेबांनी आत मधूच्या आईला हाळी दिली, "आपले खेर आले आहेत हं!"

थोड्याच वेळात, आतून थालीपिठाच्या तीन थाळ्या आल्या.

त्या दोघांच्या अघळपघळ गप्पागोष्टी चालल्याच होत्या. त्या गप्पांना शेंडा ना बुडखा!

अत्रे निघून गेल्यावर दार लावलं. म्हणाले, "जरा तक्क्या जवळ घ्या की!"

कानाजवळ तोंड नेऊन हळूच म्हणाले, "तुम्हाला मुद्दामच बोलावून घेतलं."

"मला वाटलंच!"

"त्याचं काय झालं, काल मी आणि बाबूराव शंकरशेट रोडवरून त्यांच्या मोटारीतून येत होतो. मधेच त्यांनी गाडी थांबवली आणि काही द्रवपदार्थ घेतला. मी चमकलो. आज माझ्याकडे दोन-अडीचला येईन म्हणाले. अहो कालचा तो द्रवपदार्थ इथे आणला असता तर त्यांच्याबरोबर कोतवालीतच जायचा प्रसंग! म्हणून तुम्हाला मुद्दाम बोलावून घेतलं!"

मीही थट्टेनं म्हणालो, "म्हणजे मलाही तुमच्याबरोबर कोतवालीत नेण्याचा विचार होता वाटतं!"

मनापासून हसले. त्यांच्या भित्र्या आणि पापभीरू स्वभावाचं मलाही हसू आलं.

माझा उलटा अंगठा तोंडाशी नेऊन मी म्हणालो, "बापूसाहेब, आपण शपथेवर सांगितलं की, आम्ही घेतो तरी कुणी त्याच्यावर विश्वास ठेवणार नाही. कोतवालीतले लोक शहाणे असतात. आज इथे माझ्या साक्षीची मुळीच गरज नव्हती."

मधूच्या आईच्या हातचं थालीपीठ तर मिळालं!"

आणि विषय बदलला.

त्यांच्या या निरागस भित्रेपणाचं मला वेळोवेळी प्रत्यंतर आलेलं होतं.

१९४८ सालचे धामधुमीचे दिवस मागे पडले होते. १९५० सालच्या तुरुंगवारीतूनही त्यांची मुक्तता झाली होती. त्या सुमारास 'सह्याद्रि' मासिकातून 'क्रांतिकारक खटले' ही माझी लेखमालिका सुरू झाली. तात्या टोपे, वासुदेव बळवंत फडके, चाफेकर बंधू, सावरकर असे खटल्यामागून खटले क्रमशः प्रसिद्ध होत गेले. हे खटले गाजत होते या गोष्टीची पावती मला लगेच मिळत होती. प्रत्येक खटला प्रसिद्ध झाला म्हणजे मला फरासखान्यातून निमंत्रण यायचं. काही प्रश्नोत्तरं व्हायची. माझी लेखमाला चालूच राह्यची. या साऱ्या गोष्टी मी बापूसाहेबांना अर्थात सांगतच होतो. काळजीयुक्त स्वरात ते म्हणायचे, "तुम्हाला प्रत्येक महिन्याला कोतवालीत जावं लागतं हे काही बरं नाही. चिंता वाटते."

मी म्हणायचा, "मी कायद्याचा अभ्यास केला आहे. आपल्या देशभक्तांवर परक्या सरकारनं भरलेले खटलेच मी रंगवत आहे. ते आपलं कर्तव्यच आहे. राष्ट्रभक्ताबद्दल लिहिणं हा गुन्हा होऊ शकत नाही."

यावर दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाले, "हं! ठीक आहे."

ती लेखमाला संपली आणि त्या लेखमालेचं 'क्रांतिकारक खटले' या नावाचं पुस्तक तयार झालं. बापूसाहेब मला म्हणत होते, "काही झालं तरी तुम्ही मोठ्या बहादुरीनं हे सारं लिहिलं आहे हे खरंच!"

मी मधेच घुसून त्यांना म्हणालो, "बापूसाहेब, या पुस्तकाला तुम्ही प्रस्तावना लिहा पाहू!"

"वा! जरूर लिहितो...फर्मास प्रस्तावना!"

आणि जेव्हा प्रस्तावना लिहिण्याची वेळ आली तेव्हा सकाळीच माझ्या घरी आले. स्वतःच खोलीचं दार लावून घेतलं. मी बघतच राहिलो.

कानाशी तोंड नेऊन हलक्या आवाजात विचारलं, "या पुस्तकाला किती खर्च आलाय? कागद वगैरे..."

"का?"

"पुस्तक रद्द करा...झालेला खर्च मी देतो."

"म्हणजे?"

"अहो, हे पुस्तक भाजून काढील तुम्हाला!"

त्याही अवस्थेत मी हसून म्हणालो, "अहो, माझं हे पुस्तक काय सावरकरांची जन्मठेप आहे?... भाजून काढायला ...?"

"तुमच्या ध्यानात येत नाही...हा जाळ आहे. माझ्या मित्राला मी होरपळू देणार नाही. तुम्ही खर्चाची कशाला काळजी करता...मी झालेला सारा खर्च भरून देतो."

त्या गोष्टीला मी जेव्हा संमती दिली नाही तेव्हा काहीशा कष्टानं म्हणाले, "ठीक आहे...पण माझ्या प्रस्तावनेची अपेक्षा करू नका!" एवढंच नव्हे तर घरी गेल्यावर मला तशी चिठ्ठीही पाठविली.

पुढे 'क्रांतिकारक खटले' या माझ्या पुस्तकाला वि. स. खांडेकरांनी फारच फर्मास प्रस्तावना लिहिली. पण बापूसाहेबांनी केवळ काल्पनिक भयगंडानं प्रस्तावना लिहिली नाही, ही खंत माझ्या मनात कायमची उरली.

आज मी जेव्हा त्या गोष्टीवर विचार करतो तेव्हा माझ्या दृष्टीनं वाटणारा तो त्यांचा भयगंड काल्पनिक मुळीच नसतो. बापूसाहेबांच्या दृष्टीनं तो खराखुरा असतो; आणि त्यातही भयगंडापेक्षा आपल्या जवळच्या माणसांबद्दलची आपुलकी अधिक असते. माणूस एकदा आपला म्हटला म्हणजे त्याच्याबद्दलची सारी काळजी वाहण्याचं काम वडिलकीच्या नात्यानं ते हमखास करत असत. त्यांची ती भीती नसे. वडिलधाऱ्या माणसाची कर्तव्यनिष्ठा असे. मग निष्कारण त्यांना भित्रेपणाचा अवगुण कशाला चिकटवायचा? ठोकळेबाज शेरेबाजी कधी करू नये, असं तेच नेहमी सांगायचे.

इतिहासाबद्दल नेहमी बोलणं निघायचं. पानिपतचा विषय निघाला म्हणजे हसून म्हणायचे, "मला मोठं नवल वाटतं...पानपतची रणधुमाळी चालली असताना सदाशिवराव भाऊंनी गर्दीत घुसायला नको होतं. त्यामुळे मराठी राज्य लयाला गेलं असं काही मंडळी आग्रहानं प्रतिपादन करतात. पण त्या वेळी भाऊला नेमकं गर्दीत घुसावंसं का वाटलं, हे आरामखुर्चीत बसून, पंख्याचा वारा घेत, चिंतन केल्याचा आव आणून सांगणं कितपत बरोबर ठरेल ? ते मुळीच बरोबर नाही. ज्यानं त्यानं त्या त्या वेळी घेतलेले निर्णय हे बरोबरच असतात !"

या त्यांच्या बोलण्यात स्वतःच्या भित्रेपणाचं समर्थन असायचं, असं मला कधीही वाटलं नाही. हे त्यांचं सांगणं प्रांजळपणाचं असे. त्यामागे विचाराची एक प्रकारची बैठक असे.

'चिंता वाहतो समाजाची' हेच त्यांचं खरं धर्मसूत्र होतं.

अस्पृश्य समाजाविषयी त्यांनी काय काय केलंय ते सर्वश्रुत आहे. त्यांची आणि माझी जवळिक होण्यापूर्वीच ते त्या कार्यापासून थोडेसे अलग झाले होते. या पुण्यात त्यांनी अस्पृश्यांच्या शिक्षणासाठी अडतीस शाळा चालविल्या होत्या. आणि घरचा कंदील घेऊन रात्रींच्यावेळी अस्पृश्यांना शिकवायला जायचे, ही गोष्ट आज किती लोकांना माहीत आहे? क्लास चालवून मिळालेली पुंजी त्यांनी त्या कामात खर्च केली. सामाजिक जिव्हाळा असल्याशिवाय, मनी माणुसकीचा गहिवर असल्याशिवाय असलं कार्य होणार नाही. गांधीजींच्या अस्पृश्यता-कार्याची सूत्रं त्यांनी हाती घ्यावीत, अशीही कल्पना निघाली होती. परंतु त्या कार्याचं धुरीणत्व कुणाकडे, अखेरचा निकालाचा शब्द कुणाकडे हा प्रश्न उपस्थित झाला तेव्हा गांधीजींनी सांगितलं, "ते सारं माझ्या हाती असेल."

बापूसाहेबांनी ती कल्पना झटकून टाकली. त्या बाबतीत बोलताना ते म्हणायचे, "असला प्रस्ताव मला कधीच मान्य होण्यासारखा नव्हता. म्हणजे काम मी करायचं आणि सूत्रं दुसऱ्या कुणाच्या हाती असायची हे मला कसं मान्य होणार ? तो प्रश्न मी निकालात काढून टाकला."

त्यांचं सारं साहित्य अनुभूतीतून निर्माण झालेलं होतं. 'शंभू शिखरीचा राजा', 'तारळखोरचा पिऱ्या', 'बन्सीधर तू कुठे रे जाशील' या गोष्टीतील माणसं सत्यसृष्टीत त्यांना भेटलेली होती. मला ते नेहमी सांगायचे, "तुम्ही नव्या मंडळींनी जिवंत कथा लिहायला हव्यात. दर शनिवारी भिकारदास मारुतीसमोर बसणाऱ्या भिकाऱ्यांच्या मालिकेतल्या माणसांची मुलाखत घ्या. एकेक भिकाऱ्याला एकेक आणा द्या. आणि त्यांच्या आयुष्यात डोकावून पहा. एकेका भिकाऱ्यागणिक एकेक कथा तुम्हाला मिळेल. या खऱ्या जिवंत कथा !"

एखाद्या दिवशी सांगायचे, "खरं तर पन्नाशी उलटल्यानंतर माणसान कथा-कादंबऱ्या लिहाव्यात. त्या वेळी माणूस खरा चिंतनशील बनतो. चिंतनाशिवाय सारं लेखन व्यर्थ आहे."

मी एकदा त्यांना म्हणालो, "हे ज्ञान, चिंतन ललितसाहित्याच्या कक्षेत फारसं बसत नाही. लेखनाचं तंत्र.."

"या साऱ्या फाकंड गोष्टी आहेत. अनुभवांच्या डोहातून सारं वाङ्मय बाहेर पडलं पाहिजे. त्यासाठी तंत्राची मुळीच गरज नसते."

तंत्राची चेष्टा करणारी य. गो. जोशींनी लिहिलेली 'ग्यानबा तुकाराम आणि टेक्निक्' ही गोष्ट त्यांना आवडायची, पण ना. सी. फडके यांनी सांगितलेला लघुकथेचा तंत्र आणि मंत्र मात्र त्यांच्या पसंतीस पडायचा नाही. 'उपेक्षितांचे अंतरंग' हे त्यांच्या लघुकथांचं उत्कृष्ट पुस्तक प्रसिद्ध झालं तेव्हा वि. श्री. मोडक त्यांना म्हणाले, "या तुमच्या कथासंग्रहातली एकही कथा

तंत्राला सोडून नाही."

मग डावा डोळा बारीक करून मिष्किलपणानं म्हणाले, " असं होय ? याला तंत्र म्हणतात होय ? मग ते आमच्या अंगात जन्मजात मुरलेलं दिसतं !"

एम्. ए. झाल्यानंतर बापूसाहेबांनी एक नाटक लिहिलं होतं. त्या नाटकाची गमतीशीर हकीगत ते सांगायचे, " आमच्या नाटकाचं नाव काय होतं माहीत आहे ? दोन पुस्तकांची नावं मी एकत्र सांधली होती. 'केवळ स्वराज्यासाठी हाच प्रेमसंन्यास !' असं भलं मोठं नाव मी माझ्या पहिल्यावहिल्या नाटकाला देऊन टाकलं. एके दिवशी त्या नाटकाचं बाड बगलेत मारून मी काकासाहेब खाडिलकरांची गाठ घेतली आणि गंधर्व कंपनीत माझं नाटक पटवा अशी त्यांना विनंती केली. काकासाहेबांनी जल्दीनं प्रकरण निकालात काढलं. ते मला म्हणाले की," अहो माटे, माझी नाटकं ज्या घरी नांदतात त्या ठिकाणी मी तुमच्या नाटकाची शिफारस करावी का ?...एका क्षणात प्रश्नाची तड लागली. नाटकाचं बाड बगलेत मारून घरी आलो."

मी विचारलं, " तुम्ही नाराज झाला असाल !"

" छे, छे ! मुळीच नाही ! कष्टी व्हायचं कारण काय ? काकासाहेब मोठा खबरदार माणूस ! त्यांच्या मनाचं चलनवलन रास्तच होतं."

" मग ते नाटक आता कुठे आहे ?"

" हात्तीच्या ! त्या नाटकाचा पत्ता त्याच्या कर्त्यालाही म्हणजे मलाही पुढे कधी लागला नाही ! ते बरं झालं ! तुमच्या तंत्रात ते नाटक बसलं नसतं म्हणजे साहित्यात उगाच एक अडगळ ठरली असती."

रोज फिरायला जाताना लेखन-संकल्पांची देवाण-घेवाण व्हायची. एके दिवशी आपल्या कादंबरीचा संकल्प सांगताना मला म्हणाले, " तुम्ही कादंबरीकार ! मला कादंबरीचं तंत्र सांगा पाहू !"

मीही गंमतीनं म्हणालो, " अनुभवातून तंत्र आपसुक येतं."

" असाच एक अनुभव कादंबरीत लिहिणार आहे... बघा आता कशी फर्मास कादंबरी लिहितो ते !"

'पश्चिमेचा वारा' ही त्यांची पहिली कादंबरी प्रसिद्ध झाली. त्या कादंबरीला हार्दिक प्रतिसाद मिळाला नाही. मग म्हणाले, " काहीसा आतबट्ट्याचा व्यवहार झाला खरा !"

त्यांचे जावई बळवंतराव फडके. ग्वाल्हेरला असायचे. ग्वाल्हेरला उन्हाळा फार म्हणून मे महिन्यात पुण्याला यायचे. बापूसाहेबांकडेच त्यांचा मुक्काम असायचा. रोज माझ्याजवळ मैनावतींच्या मुलांचं कौतुक चालायचं.

जून महिन्यात जावई आणि मंडळी ग्वाल्हेरला परतली.

त्या दिवशी संध्याकाळी माझ्या घरी आले तेव्हा सुटकेचा निःश्वास टाकून म्हणाले, " मैनावती आणि मुलं आज ग्वाल्हेरला परतली. नातूमंडळी मोठी गोड..."

मी म्हणालो, " आज तुम्हाला करमत नसेल ना बापूसाहेब..."

एकदम म्हणाले, " आजपासूनच चांगलं करमायला लागलंय्."

मी चमकून त्यांच्याकडे बघितलं तेव्हा ते म्हणाले, " मैनावतीची मुलं गोड आहेत हो ! पण आपल्या कामाचं काय ? रोज काम करूनच आपल्याला दाम मिळवावे लागतात. ही मुलं आल्यापासून नित्याचं लेखन करावंच लागतं. ते करतो. पण गंगाजळीसाठी लेखन मुळीच होत नाही "

गंगाजळी म्हणजे साठवणीचं लेखन ! ते होत नाही याची त्यांना खंत असायची. मधूच्या आईसाठी काही साठवण करायलाच हवी, ही काळजी त्यांना असायची. उगाच गप्पागोष्टी मारण्याचा त्यांचा स्वभावच नव्हता. दिसामाजि काहीतरी ते लिहावे, हा समर्थ-मंत्र त्यांनी घेतलेला होता. त्या मंत्राची सिद्धी करण्यासाठी ते झटत होते. घरच्याच माणसांसाठी त्यांनी हे व्रत घेतलेलं होतं. त्यासाठी घरच्या माणसांजवळ तडजोड करण्याची त्यांची तयारी नसायची.

त्यांच्या जेवणाच्या वेळा ठरलेल्या ! सकाळी दहा-साडेदहा आणि संध्याकाळी सात-साडेसात. ब्रह्मदेवाला जेवायला बोलावलं तरी त्यात कधी फरक होणार नाही. मराठी साहित्य संमेलनाचे ते सांगलीला अध्यक्ष होते. संमेलनाचे सारे कार्यक्रम त्यांच्या जेवणाच्या वेळेनुसार ठरविले होते, हे त्यांनीच मला अनेकवार सांगितलं होतं.

परगावी व्याख्यानाला गेले तरी त्यात कधी फरक पडला नाही. एकदा ते कुठतरी व्याख्यानाला गावाला गेले. संध्याकाळचं व्याख्यान झाल्यावर दुसऱ्या मंडळाचा कार्यकर्ता आला आणि म्हणाला, " आपण अनायासे आलाच आहात या गावात...तेव्हा रात्री आमच्या मंड-

ळात एक व्याख्यान द्या !"

त्या कार्यकर्त्याला हसून म्हणाले, "मी इथे अनायासे आलेलो नाही. वरेच प्रयास घेऊन आलो आहे. पुढच्या खेपेस तुमच्याकडे तसाच येईन !"

त्यांचं हे बोलणं मंडळाच्या त्या मुख्याला कळलं असेल किंवा नाही कुणास ठाऊक ! पण मला ती हकीगत सांगताना म्हणाले, "अहो, व्याख्यान म्हणजे काय कीर्तन आहे ? बुवा, आमच्या गावात आलात होऊ द्या आणखी एक चूष ! मी त्या मंडळाच्या मुख्याला सांगितलं मला व्याख्यानासाठी पुन्हा पत्र पाठवा. मी येईन. पण व्याख्यानात व्याख्यान देणार नाही !"

एरवीच्या व्याख्यानांच्या संदर्भात हे ठीक होतं. पण त्यांना हव्या असलेल्या चळवळींच्या संदर्भात व्याख्यान द्यायची त्यांची केव्हाही तयारी असायची अर्थात जेवणाच्या वेळा सोडून !

वापूसाहेवांचं वक्तृत्व तर उत्तमच होतं. पण स्वातंत्र्यपूर्व काळात तर त्यांच्या भाषणांना फारच धार चढली होती. देशाच्या फाळणीला तर त्यांचा तीव्र विरोध होता. पण पुढे फाळणीची योजना अटळ होत गेली. तत्पूर्वी अमानुष कत्तली झाल्या.

त्या वेळी केलेल्या भाषणातून वापूसाहेव म्हणायचे, "देशाची टोन छकलं झाली आहेत ना ? मग आम्हाला आता तरी आमच्या भागात सुखानं नांदू दे ! गांधीजी म्हणतात त्याप्रमाणे मुस्लिम आमचे वंधू आहेत. पण त्यांना आता स्वतंत्र घर करून दिलं आहे. आमच्या देशात आम्ही जे कायदे करू ते सर्वांनाच लागू पडतील. ते कायदे ज्यांना मान्य नसतील त्यांनी आपल्या नव्या घरी सुखानं निघून जावं. माणूस मेलं म्हणजे आम्ही त्याचं दहन करतो. तुम्हाला जर मेलेल्या माणसाला पुरायचं असेल तर आपल्या नव्या घरी जा आणि वाटेल ते करा. आम्ही एक वायको करतो. तुम्हाला जर अनेक वायका करायच्या असतील तर आपल्या नव्या घरी जाऊन वाटेल तितक्या वायका करा...पण या भूमीतला कायदा सर्वांना सारखा असेल."

समान कायद्याची ही अभूतपूर्व कल्पना बापूसाहेवांनी त्या वेळी मांडली होती. आज त्या कल्पनेचं महत्त्व लोकांना कळून येण्यासारखं आहे.

खरोखर मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष झाले तेव्हापासूनच त्यांच्या वाणीला-लेखणीला तेज चढायला लागलं होतं. माझा फलज्योतिषावर चांगलाच विश्वास, त्यांचा फारसा विश्वास नव्हता. परंतु साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होण्यापूर्वी ते होराभूषण दीक्षित या प्रख्यात सायनवादी ज्योतिषाकडे जाऊन आले. साहित्य संमेलनाचं अध्यक्षपद त्यांना निश्चित मिळेल असं भाकित होराभूषण दीक्षित यांनी केलं. ते खरं झालं. बापूसाहेब दीक्षितांना तसं सांगायला गेले.

त्या वेळी होराभूषण दीक्षित त्यांना म्हणाले, "माझं भविष्य खरं ठरतं असं लिहा ना तुम्ही प्रभातमधे ?"

वापूसाहेव म्हणाले, "तुमचं भविष्य खरं आलं हे मी लिहीन. पण नेहमीच तुमचं भविष्य खरं होतं, हे मी कसं लिहिणार ?"

नंतर मी वापूसाहेवांना म्हणालो, "कशाला उगाच बारीक श्लेष काढलात ? त्यांचं भविष्य खरं होतं असं लिहायला काय हरकत होती ? त्यांच्या व्यवसायाला तेवढाच उपयोग नसता का झाला ?"

"पण तसं खोटं लिहिणं बरोबर ठरलं नसतं."

जेव्हा जीवनाची संध्याकाळ झाली तेव्हा माध्यान्हीचा ताव ओसरला. त्याच वेळी नेमक्या त्यांच्या व्यक्तीमत्वाला रुबाबदारपणा आणि करडेपणा देणाऱ्या झुपकेदार मिशा त्यांनी काढल्या. सिंहाची जणू आयाळ उतरली.

मी त्यांना विचारलं, "तुम्ही मिशा काढल्या हे लोकांना बरं वाटत नाही."

"कोण हो लोक हे ? तुम्हाला विचारलं होय त्यांनी? त्यांना सांगा की, तुम्हाला आवडलं नाही तरी हा माटे आता मिशा ठेवणार नाही."

"मग म्हणाले, "अहो, चाई लागलीय मिशांना. कुरतडलेल्या मिशा चांगल्या दिसणार नाहीत म्हणून काढून टाकल्या."

तेच पुढे म्हणाले, "खरं तर कुणीच कुणावद्दल काही म्हणत नाही आणि कुणीच कुणाला सांगत नाही. लोक म्हणतात असं आपण म्हणतो. पण खरं तर आपणच आपल्याला म्हणतो."

त्यांतूनच पुढे 'माझे मानवी स्वभावाचे ज्ञान' हा त्यांचा निवंध साकारला. मानवी स्वभावाचं ज्ञान हे वस्तुतः आपलंच आपल्यावद्दलचं ज्ञान असतं, असं प्रतिपादन त्या निवंधात केलेलं आढळतं.

पुढं त्यांना कॅन्सरचं दुखणं झालं, तेव्हा तर या सिंहाची

शेळी बनली. ' माझे कॅन्सरचे दुखणे ' हा त्यांचा 'सुश्रुत' मधला लेख आजही वाचलात तरी त्यांच्या मनोवृत्तीचं दर्शन घडेल. मग त्या दुखण्यावरची काही पुस्तकंही वाचून काढली. या दुखण्यात माणूस दीड वर्ष जगू शकतो हे पक्कं झाल्यावर त्यांनी त्या अवधीत आपलं आत्मचरित्र पूर्ण केलं. ना. सी. फडके यांनी त्यांच्या तेराव्या दिवशी भाषण केल्याप्रमाणे त्यांच्या आयुष्याचा 'चित्रपट' पुरा होईपर्यंत मृत्यूरूपी तो नाग त्यांच्या गळ्याला विळखा घालून ' चित्रपट ' बघत बसला होता. त्यांच्या जीवनाचा चित्रपट पुरा झाल्याबरोबर त्या नागानं त्यांचा गळा आवळून त्यांच्या जीवनाची समाप्ती केली.

त्यांच्या एकाही कथेवर चित्रपट निघाला नाही, या गोष्टीचा कुणालाही विषाद वाटेल. परंतु आत्मकथेवरचा त्यांचा चित्रपट मात्र पूर्ण झाला.

त्यांची अंत्ययात्रा जेव्हा ' केसरी 'समोर आली तेव्हा केसरीच्यावतीनं मी त्यांना पुष्पहार घातला. माझ्या डोळ्यांत पाणी गोळा झाल्यामुळे मला त्यांचं ते अंतिम रूप दिसलं नाही. ते दिसायलाही नको होतं. त्यामुळेच मी स्मशानभूमीत गेलो नाही. कारण सरणावरचे बापूसाहेब मला बघायचे नव्हते. पंधरा-वीस वर्षं ज्यांनी आम्हाला भरभरून प्रेम दिलं, शाबासकीचा दणकट हात पाठीवरून फिरवला, चार हिताच्या गोष्टी सांगितल्या, विकट प्रसंगी धीर दिला, नेहमी आमचं भलं चिंतिलं त्या बापूसाहेबांची भरदार मूर्ती आम्ही कायमची मनी वसवली होती आणि डोळ्यांत भरून घेतली होती. त्या ठिकाणी त्यांची अचेतन मूर्ती बघण्याची आम्हाला गरजच काय होती ?

## ६. हे कार्ट नाटकाच्या जाहिराती वाटणार आहे. : शरद तळवलकर

वरील उद्‌गार कै. बापूसाहेब माटोंनी माझ्याबद्दल बी. ए. च्या वर्गात काढले होते. त्यांचे वरील शब्द ही शापवाणी न ठरता माझ्याबाबतीत वरदानच नव्हे तर आशीर्वादच ठरले आहेत. असे आताच्या परिस्थितीवरून म्हणावेसे वाटते. कारण कै. बापूसाहेबांच्या त्या उद्‌गारामागे त्यांचे अमाप प्रेम दडलेले होते. कै. बापूसाहेब माझ्याबद्दल रागाने असे बोलणे अगदी साहजिकच होते. बी. ए. (ऑनर्स) ला १९४६ मध्ये एंटायर मराठी घेतलेले आम्ही फक्त १७ विद्यार्थी होतो. पदवी परीक्षेपूर्वी कॉलेजमध्ये प्रिलिमिनरी परीक्षा असे. मुंबई विद्यापीठाच्या नियमाप्रमाणे ती आवश्यक असे. कॉलेजच्या त्या परीक्षेत पास झालेले विद्यार्थीच फक्त विद्यापीठाच्या परीक्षेसाठी पाठवले जात. परंतु मला कै. माटोंच्या विषयांतील प्रत्येक पेपरात पन्नासापैकी फक्त पाच किंवा तीन गुण होते व एका पेपरात फक्त शून्य मार्क होते. तो पेपर ' ओल्ड लिटरेचर 'चा होता. पेपर कै. बापूसाहेबांनीच काढलेला होता. प्रश्न होता " शाहीर वाङ्‌मयाबद्दल टीकाकारांची मते थोडक्यात सांगा." आता ही मते सांगायला अभ्यास करायला हवा. परंतु नुकत्याच संपलेल्या कॉलेजच्या गॅदरिंगमध्ये " भावबंधन " नाटक झाले होते. त्याच्या तालमी दीड महिना चालू होत्या. रात्री १२ पर्यंत तालमी चालत. त्यानंतर आमच्या रेसिडेन्सीत गप्पा. शिवाय माझे त्या नाटकातील कामण्णाचे काम उत्तम झाल्यामुळे मी एका अविस्मरणीय धुंदीत होतो. मग अभ्यास कसा होणार. गॅदरिंग संपल्यावर पाच-सहा दिवसांनीच प्रिलिमिनरी सुरू झालेली. परीक्षेला बसलो. लिहिणार काय कपाळ ! मग माझ्या विनोदबुद्धीने उत्तरे लिहिली. वरील प्रश्नाला उत्तर देताना मी लिहिले होते, " शाहीर वाङ्‌मयाबद्दल टीकाकारांनी इतक्या थापा मारल्या आहेत, की शाहीरांनी डफावरसुद्धा तेवढ्या थापा मारल्या नसतील." त्यांच्या व्याकरण आणि भाषाशास्त्र या पेपरातील प्रश्नांनाही मी अशीच उत्तरे दिली होती. " विभक्ती प्रत्ययांच्या अर्थाबद्दल त्यांनी प्रश्न विचारला होता. स्कॉलर लोकांनी अभ्यास केला होता. त्यांची उत्तरे चोख होती. पण मी उत्तर दिले होते. " विभक्ती प्रत्यय हा विभक्त कुटुंबासारखा आहे. तो शब्दापासून विभक्त केल्यास त्यास काही अर्थ राहत नाही. वगैरे वगैरे." आता तुम्ही सांगा, अशी विनोदी उत्तरे वाचून कोणाला राग येणार नाही ? कै. माटोंनी पेपर वर्गात वाटले, त्या दिवशी मी माझी वर्गात शोभा होणार या खात्रीने दांडी मारली होती. माझे सगळे पेपर त्यांनी बाजूला काढून ठेवले होते. सगळ्यांना पेपर वाटल्यावर माझे पेपर हातात घेऊन कै. बापूसाहेब म्हणाले, "आपल्या वर्गात हे विद्वान

'९...

गृहस्थ कोण आहेत ?" मित्रांनी नंवर विचारला. कै. बापूसाहेब म्हणाले, " नंबर चौसष्ठ " मुले गप्प. शेवटी त्यांनी आपल्या मूळच्या मास्तरी खाक्यात (पुण्यात कै. बापूसाहेब ' माटे मास्तर ' या नावानेच प्रसिद्ध होते.) दरडावून विचारलं तेव्हा माझ्या मित्राने माझे नाव सांगितले. त्यावर बापूसाहेब म्हणाले, " हे कार्ट नाटकाच्या जाहिराती वाटत हिंडणार आहे." कै. बापूसाहेबांचा संताप पाहून हसण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. माझ्या मित्राच्या अंगावर त्यांनी माझे पेपर भिरकावले होते. माझ्या मित्राने संध्याकाळी सर्व वृत्तांत मला सांगितला. युनिव्हर्सिटीच्या परीक्षेच्या फॉर्मवर सही मागण्यासाठी कै. बापूसाहेबांच्याकडे जाण्याचे धाडस होत नव्हते. शेवटी मी डॉ. वाटव्यांच्या वशिल्याने त्यांची सही मिळविली. मुंबई विद्यापीठाच्या बी. ए. (ऑनर्स) परीक्षेचा निकाल लागल्यावर कॉलेजमध्ये आलेली मार्कांची यादी कै. बापूसाहेबांनी मुद्दाम घेऊन पाहिली. माझा फर्स्ट क्लास अगदीच थोड्या मार्कांनी चुकला होता. त्यांच्या हे लक्षात आल्यावर त्यांनी माझे थोरले बंधू श्री. गोपीनाथ तळवलकर यांना चिठ्ठी पाठवली " तुमच्या धाकट्या भावाला माझ्याकडे त्वरित पाठवा." बंधूंनी मला सांगितल्यावर मी कै. बापूसाहेबांच्या घरी गेलो. वाकून त्यांना नमस्कार केला. त्यांनी मला पाठीवरून हात फिरवून जवळ बसवून घेतला आणि म्हणाले " अरे, आम्ही रागावतो ते तुमच्यावर प्रेम असतं म्हणून. मी रागावलो नसतो तर तू अभ्यास केला नसतास. बरं, उद्या तू दुपारी जेवायला ये. तू खानावळीत जेवतोस हे माहीत आहे मला. उद्या माझ्याबरोबर जेवायचं." असं म्हणून त्यांनी पत्नीला हाक मारली आणि सांगितलं, " उद्या त्यांच्या आवडीचा स्वयंपाक करा." आणि मला म्हणाले, " तुला भाजी, आमटी, काय आवडतं ते सांग त्यांना." इथेही माझा विनोदीस्वभाव जागृत झाला. चार दिवसांपूर्वीच आमच्या वर्गातील फर्स्ट क्लासमध्ये आलेली कु. जेरुशा रुबेन कै. बापूसाहेबांच्याकडे जेवून गेली होती व तिच्या आवडीची मेथीची भाजी त्यांच्या पत्नीने केली होती हे आम्हाला कळले होते. म्हणून ी म्हणालो, " सर, मलाही मेथीची भाजी आवडते" ऐकल्यावर ते मनापासून हसले आणि माझ्या पाठीवर ाप मारून म्हणाले, " तू बी. ए. हो नाहीतर आय. ।. एस. हो. तुझा विनोदी स्वभाव काही जायचा ही."

दुसऱ्या दिवशी जेवताना आमच्या मनमोकळेपणाने गप्पा झाल्या. मला म्हणाले, " तू नाटक कर. पण एम. ए. ला नाव घाल." ते जेवण मला इतकं गोड लागलं त्यामागील बापूसाहेबांचं प्रेम मला दिसत होतं. अनेक पंक्तीत व आज आमच्या व्यवसायातील माझ्या सत्कारानिमित्त अनेक ठिकाणी मी जेवलो, पण त्या दिवशी कै. बापूसाहेबांच्या घरच्या जेवणाची गोडी काही आगळीच होती. ती पुन्हा कोठे अनुभवास आली नाही.

शुद्धलेखनाबद्दल त्यांचा अत्यंत कटाक्ष असे. आम्ही सीनिअर बी. ए. च्या वर्गात होतो, तरी आठवड्यातून त्यांनी आपला एक तास शुद्धलेखनासाठी ठेवलेला होता. त्या तासाला ते आम्हाला शुद्धलेखन घालीत. आमचे शुद्धलेखनाचे कागद घरी तपासीत. पुढल्या तासाला ते वर्गात वाटताना कोणाचे काय चुकले ते सांगत. एकदा त्यांनी असेच आम्हाला शुद्धलेखन घातले होते. शुद्धलेखनातील उतारा कुठल्या तरी इतिहासातील होता. त्यात एक वाक्य होते, " राज्याचा कारभार सुरळीत चालला होता." आमच्या वर्गात खानदेशातील श्री. चौधरी नावाचा एक विद्यार्थी होता. त्याने ' सुरळीत ' या शब्दातील ' ळी 'वर अनुस्वार दिला होता. शुद्धलेखनाचे कागद वाटताना वर्गात कै. बापूसाहेब म्हणाले, " चौधरी तुझी सुरळी खूपच मोठी दिसते आहे. सगळ्या राज्याचा कारभार त्यात चालला आहे." चौधरीला आपली चूक कळून आली होती.

कै. बापूसाहेबांचा चेहरा उग्र. त्यांतून लांब कोट व त्यावर रुळणारे उपरणे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला एकदम कै. विष्णुपंत चिपळूणकरांच्या काळात नेऊन पोचवत असे. त्यांच्या त्या भव्य व उग्र व्यक्तित्वामुळे इतर विषयातील मुलेसुद्धा त्यांना घाबरत. ते प्राध्यापक म्हणून स. प. कॉलेजमध्ये आले. परंतु त्यांच्यातला मास्तर गेलेला नव्हता. शिकवताना घंटा झाल्याचे त्यांना भान राहत नसे. म्हणून ते दोन तास जोडून घेत असत. एकदा त्यांचा पहिला तास संपला होता. कै. बापूसाहेब आपल्या ओघवती वाणीने शिकवण्यात रंगले होते. वरच्या मजल्यावरील मुले मोठमोठ्यांदा बोलत जिना उतरत होती. बापूसाहेबांना ते सहन झाले नाही. ते ताडकन उठून वर्गाच्या बाहेर आले आणि त्या मुलांच्यावर ओरडून म्हणाले, " मुकाट्यानं जाता येत नाही का ? आवाज काढलात तर तोंडात मारीन." ती मुले बी. ए. च्या वर्गातील असूनही कै. बापूसाहेबांचा रुद्रा-

वतार बघून तावडतोब गप्प झाली. आजच्या कॉलेजात हे दृष्य अशक्यप्राय आहे.

अमाप वाचन, विद्वत्ता व सामाजिक जीवनाबद्दल स्वतंत्र विचारप्रणाली यामुळे कै. वापूसाहेबांशी गप्पा मारताना वेळ कसा निघून जाई ते कळत नसे. बोलण्याचा ओघ वेळेचे बंधन कधी पाळत नसे. मराठी इतिहासाबद्दल त्यांची स्वतंत्र मते होती. अशाच एका गप्पांच्या मैफलीत त्यांची ही मते आमच्या प्रत्ययास आली. बापूसाहेब कुठल्यातरी इतिहासातील प्रसंगावरून बोलत होते. "अरे, हा नाना फडणीस इतका बुद्धिमान पण याला आंग्लांच्या (इंग्रजांच्या) फौजा का विजयी होतात हे कळू नये?" "शिवाजीला रणांगणावरील आडाख्यांची जी जाण होती ती पेशवाईत राहिली नाही." "पेशवाईत जहागिरी दिल्या गेल्या आणि मराठी मुलखाची शकले झाली. ते सरदार आपल्या प्रांतापुरते जागरूक असत. "मैं मेरी झांशी नही दूंगी" हे झाशीराणीचे वाक्य याच अर्थाचे आहे. ती झाशीसाठी लढत होती' वगैरे वगैरे. आम्हाला त्यांची ही मते ऐकून मजा वाटे व आम्ही तासन्तास त्यांच्या गप्पा ऐकत त्यांच्याभोवती बसत होतो.

या गप्पांच्या ओघात ते मोठमोठ्या व्यक्तींना एकेरी नावानं संबोधत. प्रथम संभाषणाच्या ओघात त्या व्यक्तीचे नाव आठवले नाही की ते आम्हाला विचारीत "कलकत्त्याचा कोण कवी तो?" मग आम्ही सांगायचो "रवींद्रनाथ टागोर" त्यावर ते म्हणत "हं. तो रवींद्रनाथ" असे म्हणून त्यांच्या कवितेबद्दल बोलू लागत. तसेच "आळंदीचा संत कोण तो" मग आमच्यापैकी कुणीतरी म्हणे "ज्ञानेश्वर" त्यावर "त्या ज्ञानेश्वराचं शहाणपण हे दैवीच होतं." असे म्हणून ज्ञानेश्वरांच्याबद्दल बोलू लागत. मी एकदा मला न राहवून त्यांना विचारलं, "सर, तुम्ही एवढ्या मोठ्या माणसांना एकेरी नावानं का संबोधता?" त्यावर ते म्हणाले, "अरे, एकेरी नावात आपलेपणा असतो. बहुवचनामध्ये परकेपणाचा वास येतो. उद्या तू समजा मोठा झालास आणि मी तुला अहो 'शरदराव', म्हटलं तर तुला वाटेलच की नाही सर आपल्याला परकेपणानं वागवायला लागले." त्यांचे म्हणणे खरे होते.

या गप्पांच्या मैफलीत त्यांची मराठी कानाला फार गोड लागे. ती खरी आपली मराठी भाषा वाटे. वर्गात किंवा खाजगी संभाषणात एवढंच काय व्याख्यानातसुद्धा त्यांच्या तोंडातून मराठी भाषेत रूढ झालेले इंग्रजी शब्द कधीच निघत नसत. या त्यांच्या स्वतंत्र मराठी भाषेमुळे आम्ही इंटरला असताना कै. हरिनारायण आपटे यांची 'गड आला पण सिंह गेला' ही कादंबरी ते शिकवत, तेव्हा ते त्या काळच्या अगदी शुद्ध मराठी भाषेतच बोलत आहेत असे वाटे. ऐतिहासिक प्रसंग वर्णन करून सांगताना तर ते इतके रंगून जात की तो चित्रपटच आपल्या डोळ्यांसमोर चालला आहे, असे त्या वेळी आम्हाला वाटायचं. कै. वापूसाहेबांच्या निधनानंतर कै. आचार्य अत्रे यांनी "मराठी भाषा पोरकी झाली" हा त्यांच्याबद्दल लिहिलेला अग्रलेख कै. बापूसाहेबांच्या मराठी भाषेच्या वैशिष्ट्याचे कोरीव लेणे म्हणून मराठी साहित्याच्या इतिहासात मानला जातो.

कै. बापूसाहेबांना 'माटे मास्तर' म्हणून पुणे ओळखत होतं. त्याचा त्यांना अभिमान होता. त्यांची विद्वता, वादातीत होती. पण मनाने ते अगदी लहान मुलासारखे होते. एस. पी. कॉलेजमध्ये त्यांची प्राध्यापक म्हणून नेमणूक झाल्यावर त्यांना जो आनंद झाला तो लहान मूल आपला आनंद लपवून ठेवू शकत नाही तसाच कै. बापूसाहेब लपवू शकले नाहीत. माझे बंधू श्री. गोपीनाथ तळवळकर ह्यांना ते म्हणाले, "काय रे गोपीनाथ, कुठला देव या प्रि. करमरकरांच्या कानांत कुजबुजला की या माटे मास्तरला प्राध्यापक करा म्हणून?"

कै. बापूसाहेबांच्यासारखा विद्वान, स्वतंत्र मराठी भाषेचा पुरस्कर्ता व विद्यार्थ्यांवर मुलासारखं प्रेम करणारा प्राध्यापक आम्हाला मिळाला, हे आमच्या पिढीचे मोठे भाग्यच समजतो आम्ही. त्यामुळे त्यांचे विद्यार्थी म्हणवून घ्यायला आम्हाला अभिमान वाटतो.

## ७. काही आठवणी (१): शं. गो. तुळपुळे

प्रो. बापूसाहेब माटे यांचा आमच्या सर्व कुटुंबाशी पुष्कळ वर्षांचा घरोबा. माझे वडील कै. गो. वि. तुळपुळे सातारच्या न्यू इंग्लिश स्कूलचे मुख्याध्यापक असताना माटे त्यांचे विद्यार्थी होते. तसेच माझे चुलते कै. काका-

साहेब तुळपुळे यांचे ते शाळेतील सहाध्यायी. दोघांनी शाळेच्या वार्षिक संमेलनाच्या नाटकांतून कामे केलेली. त्यामुळे हा घरोबा हळूहळू वाढत गेला. पुढे त्यांचे आणि आमचे दोघांचीही कुटुंबे पुण्यात येऊन स्थायिक झाली आणि शिक्षणाच्या एकाच क्षेत्रात काम करीत असल्याने जवळीक वाढली. आमच्या घरात ते माटे मास्तर म्हणूनच ओळखले जात.

असे असले तरी बापूसाहेबांच्याहून मी वयाने खूपच लहान होतो आणि त्यांचा विद्यार्थीही कधीच नव्हतो. त्यामुळे त्यांच्याविषयीच्या आठवणी विशेष नाहीत. काही आहेत त्यांपैकी एक अशी की माटे त्या वेळी पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयात शिक्षक असून रोज सकाळी साडेदहाच्या सुमाराला गायआळीतील आमच्या घरावरून खांद्यावर छत्री टाकून शाळेकडे जात. शाळेला सुटी असली म्हणजे सकाळच्या वेळी आमच्या घरी वडिलांना भेटायला येत आणि येतायेताच स्वयंपाकघरात डोकावून माझ्या आईला "मी आलो आहे हं" असे सांगून मगच वडिलांच्या खोलीत जात. ही चहाची सूचना असे हे मला नंतर कळले. त्यांच्या स्वभावात मिष्कीलपणा होता. तसेच अनेक वर्षे शाळेतच काम करावे लागल्याने थोडे वैफल्यही आले होते. त्या वेळी खासगी शाळेतील शिक्षकांना पेन्शन वगैरे काही नसावे. असेच एकदा शिक्षकांच्या पेन्शनबद्दल बोलणे चालले असताना माझ्या वडिलांनी त्यांना विचारले, "माटे, तुमच्या संस्थेत काही (विम्याच्या) पॉलिसीची वगैरे तरी सोय आहे का?" त्यावर माटे उपरोधिकपणे हसून म्हणाले, "शिक्षकांना काही न देणे ही त्यांची पॉलिसी आहे!" या वाक्यामागील कटुता मला तेव्हा जाणवली नाही. ती पुढे त्यांचा "शिक्षकाने केव्हा मरावे?" हा हृदयस्पर्शी लेख वाचला तेव्हा जाणवली.

वर माटे माझ्या चुलत्यांचे, म्हणजे ती. काकासाहेब तुळपुळे यांचे शाळेत सहाध्यायी होते हे सांगितलेच आहे त्यांच्यातील अकृत्रिम स्नेह जन्मभर टिकला. वास्तविक ते दोघे म्हणजे विचारांची दोन टोके होती. काकासाहेब परमार्थी होते, गुरुदेव रानडे यांच्या संप्रदायातील होते. माटे संतवाङ्मयाचे प्रेमी असले तरी विज्ञानवादी होते. त्यामुळे "विज्ञानबोधाची प्रस्तावना" या आपल्या ग्रंथाची प्रत त्यांनी पहिल्या पानावर "मित्रवर्य गणपतराव तुळपुळे यांना भीत भीत भेट" असे लिहून दिली होती. त्यांचे प्रत्येक पुस्तक माझ्या वडिलांकडे व काकासाहेबांकडे सप्रेम भेट म्हणून येत असे.

पुस्तकांवरून आठवण झाली. माटे यांनी आपली पुष्कळ पुस्तके स्वतःच प्रसिद्ध केली होती. म्हणजे त्यांचे तेच प्रकाशकही होते. त्यासाठी एक लहानसे घर बांधून त्यात त्यांनी आपल्या पुस्तकांच्या प्रतींचे गठ्ठे शिस्तीत ठेवले होते. त्यासंबंधात बोलताना ते एकदा म्हणाले, "मी प्रत्येक पुस्तकाच्या प्रतींवर दुकानदारांना कमिशन किती द्यायचे ते त्या त्या गठ्ठयावर लिहून ठेवले आहे. माझ्या गैरहजेरीत दुकानदार खरेदीला येतात तेव्हा माझी पत्नी (त्या विशेष शिकलेल्या नसल्या तरी बुद्धिमान होत्या) त्यांच्याशी विक्रीचा व्यवहार करते. त्यामुळे माझे काम होते आणि तिलाही आपण माझ्या व्यवसायाला हातभार लावल्याचे समाधान मिळते." संसारातील ही लहान लहान समाधाने त्यांनी एका लेखात टिपलीही आहेत· अशा अनेक छोटया-मोठ्या समाधानांनीच संसार सुखाचा होत असतो आणि माटे यांचा तसा होता. या गोष्टीची जाणीवही त्यांना होती व ती ते प्रसंगी बोलूनही दाखवीत. त्यांच्या लेखांतूनही ती उमटली आहे.

त्या वेळी माटे पुण्याच्या 'प्रभात' दैनिकात नेमाने लिहीत असत. त्यासाठी त्यांना काही तरी विषय लागे. १९४८ मध्ये माझे 'पाच संतकवी' हे पुस्तक प्रसिद्ध झाले तेव्हा त्याची प्रत मी त्यांना दिली. त्यावर त्यांनी 'प्रभात' मध्ये एकूण पाच लेख लिहून मला पुष्कळच उत्तेजन दिले. त्यांचा माझा अधिक संबंध मी पुणे विद्यापीठात १९५० साली आलो तेव्हापासून आला. मग परीक्षेच्या कामासाठी आम्ही एकत्र येऊ लागलो. असेच एकदा त्यांच्या घरी ते प्रो. रा. श्री जोग आणि मी असे तिघेजण बी. ए. च्या किंवा एम. ए. च्या परीक्षेचे गुणपत्रक तयार करीत असताना ते मध्येच थांबून म्हणाले, "हे किचकट, कंटाळवाणे काम केवळ चार पैसे मिळतात म्हणून करायचे! एवढ्या वेळात एखादे चांगलेसे पुस्तक हातावेगळे करता येईल." पण हे कंटाळवाणे काम करीत असतानाही त्यांची विनोदबुद्धी जागृत असे. गुणपत्रकाच्या शिरोभागी जी कोष्टके भरावी लागतात त्यांना ते 'खवासखाने' म्हणत, आणि गुणांच्या नोंदी तपासताना मध्येच मुद्दाम एखादा आकडा चुकीचा सांगत. हेतू हा की दुसरा तपासणारा सावध आहे की नाही ते कळावे अशा पुष्कळ युक्त्या ते योजीत.

माटे वरून उग्र दिसत, पण अंतरीचे हळवे होते

त्यावरोबर स्वाभिमानही विलक्षण होता. एकदा आपल्या मुलीचे— मैनाचे— वर्णन करताना तिने कोणकोणत्या परीक्षा दिल्या आहेत आणि तिला काय काय येते हे सांगून झाल्यावर शेवटी म्हणाले, "अन् मराठीविषयी विचाराल तर घरात मराठीचा आखाडाच आहे." आणि खरोखरच त्यांचा मराठीचा आखाडाच होता. त्यातील लाल मातीने ते सदा रंगलेले असत. कविराने एका पदात संतांच्या मेळाव्याला 'मस्तोंका मैखाना' म्हटले आहे.तसा हा माटयांचा 'मऱ्हाटीका मैखाना' होता. त्यात त्यांनी कवी यशवंत, आचार्य अत्रे, अशा अनेक मातबरांशी झुंज दिली, पण त्यांच्याविषयी मनात कधी अढी धरली नाही.

माटयांच्या ठिकाणी असणाऱ्या सहानुभूतीचा अनुभव मला अनेकदा आला. 'सहानुभूती' हा शब्द आता वापरून वापरून इतका झिजून गेला आहे की त्याला औपचारिकपणाहून अधिक अर्थ राहिलेलाच नाही. माटयांची सहानुभूती तशी कृत्रिम किंवा शाब्दिक नव्हती सार्थ होती, कारुण्यपूर्ण होती. ते खऱ्या अर्थाने दुसऱ्याच्या अनुभूतीशी एकरूप होत. तसे नसते तर त्यांना उपेक्षितांचे अंतरंग जाणताच आले नसते. ते त्यांनी जाणले. इतकेच नव्हे, तर ते त्या उपेक्षितांशी मनाने एकरूप झाले, त्यांची सुख-दुःखे त्यांनी स्वतःची म्हणून अनुभवली, ते बन्सीधर झाले, पिऱ्या महार झाले, रामोशी झाले, मुंबईचा लिफ्टमनही झाले. त्यांच्या ठिकाणच्या या गुणाची एक गमतीदार आठवण सांगण्यासारखी आहे. सांगलीच्या साहित्य संमेलनात आयेल्लो या नाटकाचा एक प्रयोग झाला. तो पाहायला मी माटयांच्या शेजारीच बसलो होतो. प्रसंग आयागो आयेल्लेच्या मनात संशयाचे आणि मत्सराचे विष पेरले असा होता. आयेल्लो हा साधासीधा, रांगडा शिपाईगडी. त्याला आयागोची बोलणी खरी वाटतात आणि त्याच्या कानात त्याने पेरलेली विषवल्ली चांगलेच मूळ धरते. प्रेक्षकांना खरा प्रकार माहीत असल्याने ते रंगभूमीवर चाललेल्या या नाटयाचा आस्वाद रसिकपणाने घेऊ शकतात. तात्यासाहेब केळकरांनी म्हटल्याप्रमाणे नाटकगृहातील प्रेक्षक जशी आपली खुर्ची सोडत नाही तशीच आपली तटस्थपणाची भूमिकाही सोडत नाही. पण माटयांची सहानुभूती जगावेगळी असल्याने ते या नाटयाशी इतके समरस झाले की माझ्याकडे वळून मला म्हणाले, "आता काय करावं या माणसाला (म्ह. आयेल्लोला)! त्याला कसं कळत नाही की हा आयागो त्याला भुलवतो आहे?" याला म्हणतात समरसता. नाहीतर आपण समरस होतच असतो— स्वतःला न विसरता! ही समरसता होती म्हणूनच माटे उपेक्षितांची, दलितांची अमर चित्रे निर्माण करू शकले.

मी पुणे विद्यापीठात कामावर रुजू झाल्यानंतर दोन दिवसांनी त्यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेत माझे एक व्याख्यान करविले. व्याख्यानाचा विषय 'गेल्या दहा-पाच वर्षांतील वाङ्मयीन संशोधन' असा काहीसा होता. पुण्यातील ते माझे पहिलेच व्याख्यान. त्यामुळे त्यासाठी तयारी मी पुष्कळ केली होती. व्याख्यान निरध्यक्ष होते व ते चांगले दीड-पावणेदोन तास चालले. त्यावेळी माटे काही बोलले नाहीत. पण त्यानंतर दोन-तीन दिवसांनी त्यांचे मला एक कार्ड आले. ते अजूनही मजजवळ आहे. त्यात माझ्या व्याख्यानाची खूप स्तुती असल्यामुळे ते येथे देण्याचा मला खरोखरच फार संकोच वाटतो. पण त्यावरून त्यांची रसिकता, मार्मिकता, आणि मुख्य म्हणजे परगुणपरमाणूंचा पर्वत करण्याची त्यांची अभिजात उदारता दिसून येत असल्याने आत्मश्लाघेचा दोष पतकरून मी ते पत्र पुढे उद्धृत करीत आहे. ते पत्र असे:

श्री

नातूबाग, पुणे २<br>१०–१२–५२

डॉ. शंकरराव तुळपुळे यांस

स. न. वि. वि. आपल्या परवाच्या व्याख्यानाचे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे. मुद्देसूद, अस्खलित, वेचून आणलेल्या माहितीने गडगंज भरलेले, घासूनपुसून स्वच्छ केलेले, उपरोधाचे व टीकेचे थोडे पाणी दिलेले, तुमचे व्याख्यान ऐकून जो संतुष्ट झाला नसेल, तो रसिक श्रोताच नाही. श्रोते नुसते संतुष्टच झाले नसतील तर तुमचे अवलोकन, तुमच्या बुद्धीचा समावेश आणि तुमच्या निवडीतील तारतम्य आणि पारखही पाहून त्यांना असेच वाटले असेल की, पुणे विद्यापीठाने योग्य मनुष्य योग्य ठिकाणी आणून बसविला. मला झालेला आनंद मी प्रो. गोपाळराव यांना स्वतंत्र पत्राने कळवत आहे. कळावे, हे विनंती.

श्री. म. माटे

माटे यांच्या विषयीची माझी अखेरची आठवण हृदय विदारक आहे. १९५७ साली ता. ६ जूनला गुरुदेव रानडे यांचे निधन झाले. त्यांच्या पुण्यतिथीचा सप्ताह

करून मी निंबाळहून परत आलो आणि माटयांना भेटायला त्यांच्या घरी गेलो. त्यावेळी ते घशाच्या कॅन्सरने आजारी होते. बोलवत नव्हते तरी मला विचारले, " रामभाऊ गेल्यावर पुष्कळांची तारा–पत्रे आली असतील, नाही ? मला सर्व सांगा." तेव्हा मी त्यांना सर्व हकीगत सांगितली. आणि डॉ. राधाकृष्णन् वगैरे थोर लोकांच्या सांत्वनपर पत्रांतील मजकूरही थोडक्यात सांगितला. ते सर्व ऐकून माटे क्षणभर स्वस्थ पडून राहिले आणि मग डोळे किलकिले करून मला त्यांच्या नेहमीच्या मिष्कील सुरात म्हणाले. " आता आमच्या वेळी काय काय होते ते पाहू या !" ही त्यांची वेळ त्यानंतर लौकरच आली. त्या दिवशी संध्याकाळी मला दोन भाषणे पाठोपाठ करावी लागली. एक माझे आतेभाऊ श्री. शिरूभाऊ लिमये यांच्या षष्टयब्दीपूर्तीचे, अभिनंदनपर, आणि दुसरे माटे यांच्या निधनाचे, शोकपर. पहिले सजवलेल्या सभामंडपात, दुसरे ओंकारेश्वराच्या स्मशानात ! याला जीवन ऐसे नाव !

## ८. काही आठवणी (२): वि. म. कुलकर्णी

आपल्या जीवनात काही गोष्टी मोठ्या अभिमान वाळगण्यासारख्या आणि आनंदाच्या असतात. जीवन वाढत–विकसत किंवा वठत गेले तरी अशा गोष्टींचा ताजेपणा आणि टवटवीतपणा कधीच नाहीसा होत नाही.

महाविद्यालयातील दिवस तर विशेष रमणीय आणि स्मरणीय. फुलपाखरांचे पंख घेऊन आलेले ते दिवस हा हा म्हणता निघून जातात. आणि मनाशी उरतात कधीही न पुसल्या जाणाऱ्या आठवणी. सुखाच्या, उमेदीच्या आणि उत्साहाच्या !

प्रा. माटे यांच्या आठवणी माझ्या संगती बऱ्याच दिवसांपासून आहेत. त्या सुखद आठवणी माझ्या मनात सदैवच रुंजी घालत असतात !

१९३५ साली, मी इचलकरंजीला विद्यालयीन शिक्षण घेत होतो, संस्थानी वातावरण होते. एक दिवस हॉस्टेलच्या स्नेहसंमेलनामध्ये मला "चांगला विद्यार्थी" म्हणून पूज्य सानेगुरूजी यांच्या हस्ते एक बक्षीस मिळाले! ते उघडून पाहिले तर तो एक जाडजूड ग्रंथ होता–नाव 'अस्पृष्टांचा प्रश्न'...लेखक–श्रीपाद महादेव माटे–चांगल्या लेखकाचे पुस्तक लाभले म्हणून आनंदात भर पडली. (प्रो. माटे यांना 'अस्पृश्य' हा त्या काळी रूढ असलेला शब्द पसंत नव्हता...'अस्पृष्ट' म्हणजे एके काळी अस्पृश्य मानले गेलेले, पण आता बरोबरीच्या हक्का वागविले जाणारे जन होत, असे ते म्हणत असत ! तेव्हा 'हरिजन' हा शब्दही प्रचलित नव्हता.) प्रो. माटे यांची ग्रंथरूपात पहिली अशी भेट झाली व अखेरपर्यंत ते मला आपले ज्ञान व आपण लिहिलेले ग्रंथ स्वहस्ते भेट देतच राहिले. या योगायोगाची मोठी मौज वाटते.

पुढे यथाकाल मी. स. प. कॉलेज, पुणे येथे प्रवेश घेतला व सारे शिक्षण तेथेच पूर्ण केले. बी. ए. ला मराठी (ऑनर्स) विषय घेतला. तेव्हा प्रा. माटे आम्हास शिकवावयास होते. मराठी वाङ्मयाचा इतिहास ते शिकवीत असत. त्यात तल्लीन होऊन जात असत. त्यांचे भव्य व भरदार व्यक्तिमत्त्व प्रथमदर्शनीच डोळ्यांत भरत असे.

बंद गळ्याचा पारशी फॅशनचा लांब कोट, स्वच्छ धोतर, काळी टोपी, झुपकेदार मिशा व रुंद जिवणी आणि चौफेर वेध घेणारे, बारीक पण चौकस डोळे यांची विद्यार्थ्यांवर उत्तम छाप पडत असे. सारा वर्ग त्यांचे 'व्याख्यान' एकाग्र चित्ताने ऐकत बसे.

शीतल वाऱ्याचा झोत आला म्हणजे पिंपळाच्या पानांची सळसळ सळसळ सुरू होते, तशी माटयांचा तास सुरू झाला की नवनव्या विचारांची पखरण आपोआप होत असे व आमची उत्सुक मने भारून जात. तृप्त होत. 'शैलीकार माटे' म्हणून त्यांचे नाव पुढे खूप गाजले, पण १९४० सालीच त्यांची ही शैली कशी झोकदार रीतीने तयार झालेली होती.

व्याख्यान रंगवावे कसे ही हातोटी गुरुवर्यांना उत्तमच साधली होती. त्यांचे चौफेर वाचन, लेखन– मनन समाजहिताची उपजत तळमळ यांच्या संमिश्र प्रभावाने त्यांची व्याख्याने नुसती पुस्तकी वाटत नसत. मूळ विषयाच्या गाभ्याला अनंत धुमारे कसे फुटू शकतात हे त्यांच्या व्याख्यानांतून कळत असे ! विषयाच्या आजूबाजूचे, पण मूळ विषयाला पोषक, असे ते खूप काही सांगत व त्याने आमच्या मनबुद्धीची कक्षा वाढत असे.

'कणाकणाने धन जोडावे व क्षणाक्षणाने ज्ञान वाढवावे.' असे त्यांचे एक आवडते सुभाषित होते. 'पास होण्यापुरते जुजबी ज्ञान' कुठल्याही गाइडमध्ये मिळेल, पण मी सांगतो हे स्वानुभवाचे बोल, हे विचाराचे बारीक बारीक कण तुम्हाला कोठे ऐकावयास मिळणार नाहीत,

असे बापूसाहेब (हे त्यांचे घरगुती नाव) माटे आत्मविश्वासाने सांगत व गंमतीने म्हणत– "मी आता सांगतो हे तुमच्या नोटबुकात, समासात लिहून घ्या...हे महत्त्वाचे आहे. त्यांची अशी 'समासातील वाक्ये' आम्हाला अजून आठवतात...

"देश म्हणजे देशातील दगड किंवा माती नव्हे, देश म्हणजे देशातील माणसे."

"विठ्ठल जसा अठ्ठावीस युगे विटेवर उभा आहे, तसे हे सारे लोक (मागासलेले) अठ्ठावीस युगे कर्दमात उभे आहेत. त्यांच्यासाठी काही केले पाहिजे."

"शिवाजी महाराज, संत तुकाराम व समर्थ रामदास ही तीन महान उंचीची माणसे एकाच वेळी या मराठी भूमीवर नांदत होती हे या महाराष्ट्र देशाचे केवढे भाग्य आहे."... इ. इ.

१९४० च्या सुमारास, मी लिहीत असलेल्या माझ्या काही कविता मी बापूसाहेबांना केव्हा केव्हा वाचून दाखवीत असे. 'रसवंतीची जन्मकथा' लिहिणारे बापूसाहेब माटे त्या मोठ्या तल्लीनतेने ऐकत असत व पसंतीची मान डोलवत असत. एखादी विशेष करुणरसाची कविता वाचली तर ते म्हणत, "हे पहा कुलकर्णी, काव्य कसे प्रसन्न असावे काव्यातही पुन्हा रडारड नको. जीवनात आहे तेवढी पुरे...तुम्हाला खरे सांगतो, कुलकर्णी, एवढ्या कारणासाठी ते 'एकच प्याला' नाटक मला शेवटपर्यंत पहावतसुद्धा नाही..." करुणेच्या पाझरापोटीच जन्मलेले माझ्या गुरुवर्यांचे असे अनेक अनमोल बोल मनात साठवीत मी घरी परतत असे.

प्रा. माटे यांच्यात व माझ्यात आणखी एक अदृश्य प्रेमाचा धागा होता. तो म्हणजे सातारा जिल्ह्यावरील त्यांचे प्रेम.

माटे यांचे बहुतेक जीवन पुण्यात व्यतीत झाले. तरी आरंभी काही काळ ते (जुन्या) सातारा जिल्ह्यातील विटे गावाच्या नजीक राहत असत. त्यामुळे तिकडील बोली भाषेतील विशेष शब्द त्यांच्या बोलण्यात कधी-कधी येत. माटे यांचे स्वतःचे स्वतंत्र संपन्न असे व्यक्तिमत्त्व होते. त्याप्रमाणे त्यांची खास मराठमोळा वळणाची भाषाशैलीही मोठी रोचक व झोकदार वाटत असे. जीवनातील अनुभव त्यांनी सखोल रीतीने घेतले होते. सामाजिक संकल्पनांचा सदैव विचार केला होता व तरुणांनी जनसेवेचे व्रत पत्करावे असे त्यांना वाटत असे. भाषासमृद्धी केव्हा होते तर भाषा बोलणारे लोक बोलके व समृद्ध होतात तेव्हा ती होते, असे त्यांचे मत असे.

सातारा जिल्ह्यातील काही भागात सदैव ऐकिवात असलेली एक लोकोक्ती माटे केव्हा मौजेने सांगत असत.

कलढोण मायणी। उरफाटं पाणी
नवऱ्यापरास। बायको शहाणी॥

आणि मग म्हणत, "णी या अनुप्रासाकरिता हे पाणी उफराटे वाहत असावे," आणि पुढे बजावीत, "मित्रहो, संसार सुखाचा होण्यासाठी बायको शहाणी असावी लागते हे मात्र खरे आहे. बायको शहाणी असो, कशी असो, संसार आनंदाचा व्हायचा असेल तर बायकोला आनंदित ठेवावे. तिला केव्हा गोठपाटल्या कराव्या. एखादा दागिना करावा म्हणजे स्त्रियांना फार आनंद वाटतो. 'हौस' हा शब्द स्त्रियांकरिताच देवाने निर्माण केलेला असावा असे मला वाटते. अर्थात त्यातही अर्थ आहे...पण आता आपण आपल्या पुस्तकातील धड्याकडे वळू या...!"

प्रा. माटे असे काही म्हणत आणि खळखळून हसत. त्यांचे हसणे (बोलणे आणि वागणेही) हे खास त्यांच्या लकबीचे असे. त्यांचे शिकवणे, विद्यार्थ्यांशी समरस होणे या साऱ्याला प्रसन्नतेचे एक वलय आपोआप प्राप्त झालेले आहे. कारण माटे हे नुसते प्राध्यापक नव्हते, ते विचारवंत, प्रज्ञावंत व प्रत्यक्ष समाजसेवा करणारे स्वतंत्र बुद्धीचे पुरुष होते व आपल्या विद्यार्थ्यांनीही ज्ञानाचा आणि विज्ञानाचा तृतीय नेत्र प्राप्त करून घ्यावा अशी त्यांची तळमळ असे.

शिक्षणाइतकेच समाजविषयक व साहित्यविषयक कार्य माटे यांनी केले. ते सारे जवळून पाहण्याचे भाग्य आमच्या पिढीला लाभले. आपल्या कार्यात तरुण विद्यार्थ्यांना सामील करून घ्यावयाचीही त्यांची एक हातोटी होती. समाजसेवेची अल्पस्वल्प दीक्षा आपल्या 'तरुण मित्रांना' देण्याची त्यांना हौस होती. आणि कोणत्याही गोष्टीचा समाजदृष्ट्या विचार कसा करावयाचा हे सांगण्याकडे त्यांचा विशेष कल असे.

एकदा बी. ए. च्या वर्गात एक मजेदार प्रसंग घडला. म्हणजे माटे यांनी त्याला मौजेचे वळण दिले. त्यांच्या नर्मविनोदाची एक न्यारी लकब होती. तिचा प्रत्यय तेव्हा आला. त्या दिवशी बी. ए. मराठीच्या वर्गातील काही क्रीडापटू विद्यार्थ्यांना मॅगेझीनसाठी घ्यावयाच्या विशिष्ट फोटोसाठी वर्गामधूनच यावयाचे खास निमंत्रण आले...

रोहिणी ' मासिक छापायचे नाही. तसेच करायचे असेल तर त्याला संपादक हवा कशाला." कोणीही तज्ज्ञ मुद्रक, प्रकाशक ते काम करू शकतो. नवोदितांना आपण प्रोत्साहन दिले पाहिजे. त्यांच्या साहित्यातील गुणदोष त्यांना दाखवून सुधारण्याची संधी दिली पाहिजे. या त्यांच्या विचारधारेचा धागा पकडून रोहिणी मासिकाचे संपादन सातत्याने केले. आणि आज चाळीस वर्षे हे मासिक अखंड आणि यशस्वीपणे चालू आहे. याचे श्रेय त्यांच्या त्या ध्येयधोरणातून आज मला दिसते. केवळ मासिक मोठे झाले नाही तर ज्या निवोदितांना रोहिणीने प्रथम प्रकाशात आणले त्यापैकी कितीतरी जण आज लौकिकसंपन्न साहित्यिक म्हणून ओळखले जात आहेत. यासंबंधी फार विस्ताराने लिहिण्याचे कारण नाही. ती नामावली मोठी आहे. योगेश्वर अभ्यंकर, डॉ. वि. म. कुलकर्णी, योगिनी जोगळेकर, संजीवनी मराठे, कवी सुधांशु हे यशोमंदिराचे आजचे कवी रोहिणी दिवाळी अंकातून प्रतिवर्षी आपली हजेरी न चुकता लावतात हे लक्षात घेण्यासारखे आहे. कै. कुसुम अभ्यंकर यांची 'दीपज्योत' पहिली-वहिली कादंबरी त्यांनी रोहिणीकडे धाडली. कारण त्याकाळी त्यांचे 'नाव' नसल्याने रोहिणीचा आधार त्यांना वाटला. आणि एकापाठोपाठ एक पंचवीस अशा सरस कादंबऱ्या प्रसिद्ध केल्यानंतर त्या रौप्यमहोत्सवी समारंभात आपल्या यशाचे श्रेय त्यांनी रोहिणीला दिले. 'सांगत्ये ऐका ' या कादंबरीचे आणि चित्रपटाचे शंभर टक्के यश रोहिणीला आहे. त्या लेखकाच्या लेखन गुणाबरोबरच कै. गो. गं. पारखी या नवोदित लेखकाची ती पहिली कादंबरी प्रथम रोहिणीत प्रसिद्ध झाली. आणि त्यावरील चित्रपटाने चित्रपटसृष्टीतील जागतिक विक्रम करून दाखवला. नवोदित लेखकांचे मासिकाकडे आलेले साहित्य प्रथम पूर्ण वाचावे आणि त्यातील यश जोखावे असे ते म्हणत.

संपादक म्हणून बापूसाहेबांचे हे मार्गदर्शन आम्हांस फक्त दोन, तीन वर्षच लाभले असले तरी त्या थोड्या काळात त्यांचेकडून खूपसे काही शिकता आले. आणि त्यांच्या व्यक्तिमत्वातील अनेक चांगल्या पैलूंचे दर्शन घडले. वरवर काहीसे धीरगंभीर, करारी आणि तितकेच कणखर वाटणारे व्यक्तिमत्त्व प्रत्यक्षात तसे असले तरी त्या विशाल व्यक्तिमत्वाच्या मनात असे काही कप्पे होते की ज्यातून त्यांच्या हळुवार आणि मृदू स्वभावाचीही जाणीव होत असे. महात्मा गांधींच्या वधानंतर जी राजकीय व सामाजिक परिस्थिती निर्माण झाली त्याची फार मोठी झळ व्यक्तिशः मला तसेच कै. बापूसाहेब माटे, भा.द. खेर आणि रोहिणी मासिकाला सहन करावी लागली. या संकटाचे वेळीं बापूसाहेबांच्या अंतर्दर्शन मला घडले. कोणत्याही प्रश्नावरील आपले मत परखडपणे आणि खंबीरपणे मांडायचे हा त्यांचा स्वभाव मला ठाऊक होता. त्याचे प्रत्यंतर रोहिणी फेब्रु. १९४८ च्या संपादकीयातून आले. फाळणीचे वेळी भारत–पाकिस्तानच्या सरहद्दीवर निर्वासितांची जी शोचनीय परिस्थिती निर्माण झाली त्यावर बापूसाहेबांनी आपल्या संपादकीयातून घणाघाती टीका केली होती. दुर्दैवाने जहाल टीकेचा अर्थ राजकीय मंडळींनी आपल्या सोयीप्रमाणे लावला आणि गांधीजीची हत्या घडण्यास यासारखे प्रक्षोभक संपादकीय अप्रत्यक्ष जबाबदार आहे असा काही वृत्तपत्रांनी सूर लावला. इतकेच नव्हे तर ह्या खून कारस्थानात अप्रत्यक्ष बापूसाहेबांचा हात आहे असे अप्रत्यक्ष भासविण्याचा प्रयत्न झाला. त्या विषारी प्रचारामुळे बापूसाहेब माटे व रोहिणी मासिकाच्या विरोधी लाट उसळली. ठिकठिकाणी रोहिणीचे अंक जाळण्यात आले. काही एजंटांनी तर मासिकाची एजन्सी बंद करून टाकली. या सुमारास महाराष्ट्रात जी जाळपोळ झाली त्या दंगलीत चार-पाचशे दंगलखोरांच्या जमावाने नगर येथील माझे घरावर हल्ला चढवून अक्षरशः हैदोस घातला. घरातील सर्व सामानाची घरासमोर प्रचंड होळी केली. कारण गोडसे आपटे हे जे दोन गांधी खुनातील प्रमुख आरोपी होते त्यांच्या पुणे येथील हिंदुराष्ट्र प्रकाशन दैनिक अग्रणीचे 'ज्वाला' नावाचे साप्ताहिक मी नगरहून प्रसिद्ध करीत असे. रोहिणी मासिकाचे अगोदर दोन-तीन वर्षे 'ज्वाला' साप्ताहिक सुरू होते. ती ज्वाला अक्षरशः पेटली आणि व्यक्तिशः माझेवर आर्थिक संकट कोसळले. हा तपशील येथे देण्याचे कारण रोहिणी मासिकाची सर्व आर्थिक जबाबदारी माझ्यावर होती. श्री. भा. द. खेर यांनी काही प्रमाणात ती जबाबदारी स्वीकारली होती. पण भा. द. तुरुंगात डांबले गेले. अशा परिस्थितीत आर्थिक दृष्ट्या पुढे चालू ठेवणे केवळ अशक्य आहे हे बापूसाहेबांनी ओळखले आणि मासिक बंद करणे हा प्रश्न त्यांनी त्यांच्या प्रतिष्ठेचा केला नाही. आपण मासिक बंद करू असेही

तुटकपणे आणि व्यवहारी दृष्टिकोणातून सांगितले नाही. मला तो दिवस आजही जशाच्या तसा आठवतो. माझ्या वृत्तपत्र व्यावसायिक जीवनातील ती वेळ आणि-बाणीची होती. यावेळी पाऊल पुढे टाकावे की येथेच थांबावे असा काही निर्णय घेण्यासारखे वयही नव्हते. अनुभव तर नव्हताच. दुर्दैवाने मला माझ्या घरी याबाबतीत सल्ला देणारे वडिलधारे कोणी नव्हते. पण बापूसाहेबांनी ती उणीव भरून काढली. आपल्या लिखाणामुळे मासिकावर हे संकट कोसळले हे शल्य त्यांच्या मनात होते. त्यावेळी त्यांच्या घरी मी सुन्न मनाने बसलो होतो. तेव्हा माझ्या पाठीवर वडिलकीच्या नात्याने हात ठेवून अगदी हळुवारपणे ते म्हणाले, 'हे बघ वसंता, तू घरात कर्ता आहेस. तुला तुझ्या लहान भावंडाचे सर्व काही करावयाचे आहे. अशावेळी मासिक बंद ठेवले तरी चालेल. आर्थिक दृष्ट्या किती सहन करणार आहेस. तुझे मन खूप खंबीर आहे याचे मला कौतुक वाटते. पण शेवटी प्रश्न पैशाचा. आणि हे पहा मासिक चालू ठेवण्याचा हट्टच असेल तर संपादक म्हणून माझे नाव मासिकावर नको. त्याचा काही फायदा तर नाहीच पण तुला त्याचा त्रासच जास्त होईल. पण लक्षात ठेव माझे सहकार्य तुला चालूच राहील."

बापूसाहेबांचे ते शब्द मासिक पुढे चालू ठेवण्याच्या दृष्टीने मला पुरेसे भांडवल वाटले. मुख-पृष्ठावर महात्माजींचा फोटो छापून पुढील अंक प्रसिद्ध करण्यात आला. मासिकाच्या द्वारा काही सामाजिक ऋण फेडण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे असेही ते म्हणत. त्यांच्या म्हणण्यातून रोहिणीतील आजच्या विवाहविषयक कार्याच्या कल्पनेने जन्म घेतला आहे.

## १०. काही आठवणी (४): म. वि. फाटक

रुबाबदार शरीरयष्टी, झुबकेदार मिशा, श्यामल वर्ण, डोक्यावर काळी टोपी, अंगात लांब कोट, खाली शुभ्र धोतर, पायांत बूट, हातात छत्री, असा बाह्य परिवेश आणि खणखणीत आवाज व त्याच्या जोडीस डोळ्यांत करारीपणाचे तेज असणारे प्रा. श्रीपाद महादेव तथा बापूसाहेब माटे यांचा विशेष जवळून परिचय ते जेव्हा अमळनेरला १९४९ मध्ये माझ्या घरी आले तेव्हा झाला. त्यापूर्वीही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा, ध्येयवादी जीवनाचा ठसा उमटलेली दोन नावे मी पुण्यात असताना ऐकलेली होती— आणि ती नावे म्हणजे 'माटे मास्तर' आणि 'माटे महार'! कदाचित उपेक्षेने, तुच्छतेने वा कुचेष्टेने दिलेली ही विरुदावली, माझ्या दृष्टीने त्यांच्या आयुष्यभरच्या कार्याचा गौरव करणारी भूषणावली आहे.

वयाची साठी झाली आणि प्रा. माटे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष म्हणून निवडले गेले. एका नवीन आवडत्या क्षेत्राचे आवाहन त्यांनी आत्मविश्वासाने स्वीकारले व महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विस्ताराची एक चतुःसूत्री त्यांनी आखली व धडाडीने ती अंमलात आणण्यास लागले. १) साहित्य परिषदेच्या आजीव सभासदांची संख्या वाढविणे. २) तरुण कार्यकर्ते निवडून म. सा. परिषदेच्या कार्यकारिणीवर निवडून आणणे. ३) साहित्य परिषदेसाठी देणग्या मिळवून आणखी एक सभागृह बांधणे. ४) मराठी वाङ्मयाचा समग्र इतिहास प्रसिद्ध करणे. यांपैकी पहिले उद्दिष्ट समोर ठेवून त्यांनी नाशिक— जळगाव— धुळे— अमळनेर हा दौरा काढला. बरोबर म. श्री. दीक्षितांना घेतले. आणि या निमित्ताने ते अंमळनेरला माझ्या घरी आले. आल्यावरोबरच "मी सकाळी दहा वाजता जेवतो. नंतर एक तास विश्रांती घेऊन कामास लागतो" ही सूचना त्यांनी घरात दिली आणि या गावातून किमान दहा तरी, एकमुठी शंभर रुपये देणारे, आजीव सभासद मिळवून देण्याची अपेक्षा व्यक्त केली. प्रताप कॉलेजचे प्राचार्य दामले आणि मी मिळून गावातील प्रतिष्ठित लोक, डॉक्टर, वकील, अध्यापक-प्राध्यापक व प्रौढ विद्यार्थी यांची एक सभा कॉलेजच्या सभागृहात आयोजित केली. सुमारे दीडशे लोक जमले व या सभेत प्रा. बापूसाहेब माटे यांचे ज्ञानेश्वरांवर एक उद्बोधक रसाळ व्याख्यान झाले. प्रा. माटे यांच्या अमोघ वाणीने श्रोतृवर्ग भारावून गेला. त्यांचा अमळनेरला येण्याचा हेतू सांगितला गेला व लोकांनी 'सभासदत्व' आनंदाने स्वीकारले

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नवीन कार्यकारिणीसाठी नाशिक-खानदेश भागातून उभे राहण्यासाठी त्यांनी प्रा

अदवंतांना व मला उभे राहण्याचा आग्रह केला व त्यांच्या पाठिंब्यावर आम्ही निवडूनही आलो. नागपूरचे प्रा. डॉ. कोलते, बेळगावचे सुंठणकर, पुण्यातून सरोजिनी बाबर, नगरहून दत्तोपंत डावरे सांगलीचे गिरीश इत्यादी प्रातिनिधिक कार्यकर्ते कार्यकारिणीवर आले. प्रा. वा. दा. गोखले व गं. भा. निरंतर यांना चिटणीसपदी घेऊन प्रा. माटे यांनी धडाडीने कार्य सुरू केले.

पुणे म. सा. परिषदेत दर वर्षी "वाङ्मयीन समालोचनपर व्याख्यानमाला" त्यांनी आयोजित केली. एक एक महिना आधी तयारीसाठी देऊन, व्याख्यान लिहून काढायला लावून, ही व्याख्यानमाला यशस्वी केली. प्रा. क्षीरसागर, प्रा. वाळिंबे, प्रा. अदवंत, प्रा. म. वि.फाटक इत्यादी तरुणांना त्यात सहभागी केले.

आर्थिक दृष्टया म. सा. परिषद भक्कम पायावर असावी म्हणून प्रा. माटे यांनी पुण्यात हिंडून देणगीदार मिळविले. 'आनंद'कर्ते वा. गो. आपटे ट्रस्टकडून दहा हजार रुपये मिळवून, अभ्यास व संशोधन कार्यास उपयुक्त ठरेल असा 'संदर्भ-ग्रंथ संग्रह-विभाग' सुरू केला तर 'केसरी ट्रस्ट' व इतरांकडून देणगी मिळवून, माधवराव पटवर्धन सभागृहावर 'विष्णुशास्त्री चिपळूणकर सभागृहाची उभारणी केली.

"मराठी वाङ्मयाचा साधार संपूर्ण अकरा खंडात्मक इतिहास" तयार करून घेण्याची एक योजना त्यांनी तयार केली. आणि प्रा. रा. श्री. जोग, प्रा. वाटवे, प्रा. तुळपुळे, प्रा. गिरीश कानेटकर, प्रा. डॉ. कोलते, प्रा. शं. दा. पेंडसे. प्रा. क्षीरसागर इत्यादी धुरीणांच्या सहकार्याने हे काम पूर्ण करण्याचा संकल्प सोडला. पण संकल्प आणि सिद्धी यात नेहमीच अंतर पडते. प्रा. बापूसाहेबांची ही धडाडी सहन न होणारे, मुंबई-पुण्यातील 'काही छुपे रुस्तुम' जागे झाले. त्यांनी या इतिहासयोजनेला फाटे फोडले व मूळ योजना बारगळली– व प्रा. माटे परिषदेतून बाहेर पडले! (आता ही इतिहास योजना पुन्हा कार्यान्वित होत आहे. पण त्यासाठी तीस वर्षांचा काळ खर्ची पडला आहे.)

बापूसाहेबांची आणखी एक आठवण म्हणजे अमळनेरला १९५२ मध्ये भरलेले महाराष्ट्र साहित्य संमेलन. हे संमेलन घेण्याचे ठरले तेव्हाच या निमित्ताने पाच नामवंत वक्त्यांची स्वतंत्र व्याख्यानांची योजना मी आखली. या योजनेला परिषदेचे कार्याध्यक्ष म्हणून बापूसाहेबांनी संमती दिलीच पण प्रा. ना. सी. फडके, आचार्य अत्रे, दत्तोपंत पोतदार यांच्या प्रमाणेच प्रा. माटे यांनीही 'ज्ञानेश्वर–एक की दोन' या विषयावर व्यासंगपूर्ण-स्वतःच्या ढंगदार शैलीत एक तासभर व्याख्यान देऊन श्रोतृवर्ग मंत्रमुग्ध करून टाकला! संमेलनाच्या पहिल्याच दिवशी एकाएकी वीजप्रवाह खंडित झाला. बापूसाहेब मला म्हणाले, "पेट्रोमॅक्सची पर्यायी सोय केली आहे ना? झालं तर मग काहीही विचलित होण्याचे कारण नाही. असे प्रसंग पुण्या-मुंबईसारख्या मोठ्या शहरांतूनही घडत असतात–" पंधरावीस मिनिटांतच विजेचा प्रवाह सुरू झाला व पुढील तीनही दिवस वीजपुरवठा अखंड चालू राहिला! पण या निमित्ताने बापूसाहेबांनी दिलेला दिलासा अजून स्मरणात आहे. संमेलनाच्या समारोप प्रसंगी, ग्रामीण परिसरात प्रथमच भरलेल्या संमेलनाच्या यशाची ग्वाही देऊन, त्याचे श्रेय त्यांनी एका तरुणाला (म्हणजे मला) निःसंकोचपणे दिले. गुणांचा गौरव करण्याची ही वृत्ती मला वारंवार जाणवत गेली!

१९४३ मध्ये सांगली येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष म्हणून निवडून आले व लेखकास जो साहित्यनिर्मितीचा मान हवासा वाटतो तो त्यांना सहजगत्या प्राप्त झाला. साहित्यसंमेलनाच्या त्या व्यासपीठावरून त्यांनी शहरी जीवनावर कथा-कादंबऱ्या-लिहिणाऱ्या लेखकांना उद्देशून म्हटले, "तरुण मित्रांनो, तुमच्या प्रतिभेचा मोर्चा घसघशीतपणे आता दऱ्याखोऱ्याकडे वळू द्या. त्या क्षेत्रातील लोकांच्या जीवनातही हर्षामर्षाचे अनेक प्रसंग तुम्हाला लिहिण्याला प्रेरक ठरतील."

या शब्दांतच आजच्या ग्रामीण व दलित साहित्याचा मूलमंत्र आढळेल.

असे होते प्रा. श्री. म. माटे–!!

## ११. काही आठवणी (५) : वि. भि. कोलते

१९४८ सालची गोष्ट. मी आचार्य (पीएच.डी.) पदवीला पात्र असल्याचे नागपूर विद्यापीठाने नुकतेच घोषित केले होते. त्यानंतर लागलीच काही दिवसांत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेकडून मला एक पत्र आले.

पत्राखाली सही श्री. म. माटे यांची होती. त्यांनी पीएच.डी. मिळाल्याबद्दल माझे अभिनंदन करून, परिषदेत व्याख्यान देण्यासाठी येण्याचे आमंत्रण दिले होते. अर्थात, मला फार आनंद झाला. मी आमंत्रण स्वीकारले. 'महानुभाव पंथ व वारकरी पंथ' असा व्याख्यानाचा विषय कळविला. त्याप्रमाणे मी पुणे येथे गेलो. २० जुलै १९४८ रोजी परिषदेच्या कै. माधवराव पटवर्धन सभागृहात माझे व्याख्यान झाले. व्याख्यानाच्या शेवटी बापूसाहेबांनी आभार मानताना माझे खूप कौतुक केले, त्यावरून व्याख्यान बरे झाले असावे असे वाटते.

कै. श्री. म. ऊर्फ बापूसाहेब माटे यांची व माझी या प्रसंगाच्या निमित्ताने झालेली ही पहिली भेट. त्यापूर्वी त्यांचे नाव व कीर्ती मी ऐकून होतो. शिक्षकाचा पेशा असूनही ते अस्पृश्योद्धाराच्या कार्यात रस घेत, अस्पृश्य मुलांना त्यांच्या वस्तीत जाऊन शिकवीत. या त्यांच्या सामाजिक कार्यामुळे माझ्या मनात त्यांच्याविषयी विशेष आदर होता. या कार्यामुळेच त्यांना 'महार माटेमास्तर' म्हणून काहीजण संबोधत. कालांतराने, अस्पृश्योद्धाराच्याच क्षेत्रात तन, मन, धन अर्पण करून कार्य करणारे कै. अण्णासाहेब विठ्ठल रामचंद्र शिंदे यांनी लिहिलेल्या आठवणीत 'धेऽ नो माटे' असा शब्दप्रयोग वाचायला मिळाला. तेव्हा, तो त्यांनी माटेमास्तरांना उद्देशून वापरला असावा असे सकृद्दर्शनी वाटले. पण, आपल्या गुजराथेतील दौऱ्यातील प्रसंगांच्या वर्णनात त्यांनी वापरलेल्या या गुजराथी वाक्प्रयोगाचा अर्थ 'महारासाठी' (माटे-साठी) असा आहे, हे असल्याचे त्यांनीच स्पष्ट केलेले वाचल्यानंतर मौज वाटली. मी कॉलेजमध्ये शिकत असताना मलकापूर येथील आमच्या घरी माझ्या वडिलांकडे, बुलढाणा जिल्ह्यातील चिखली येथील कार्यकर्ते, महात्मा ज्योतिबा फुले. चरित्राचे लेखक कै. पंढरी सीताराम पाटील व अस्पृश्य कार्यकर्ते कै. भटकर हे अनेकदा येत. त्यांच्या बोलण्यात कधी कधी माटेमास्तरांचा उल्लेख येत असे. एकदा माटेमास्तरांना उद्देशून, 'ब्राह्मणात अस्पृश्यतानिवारणाची सोंगे घेऊन मिरविणाऱ्या लोकांपैकी माटेमास्तर हे एक आहेत.' असे डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाल्याचे पंढरीनाथ पाटलांच्या बोलण्यात आल्याचे आठवते. त्यावेळी पुण्यात महारापेक्षा चांभार व मांग यांची वस्ती अधिक असल्यामुळे माट्यांनी काढलेल्या शाळा चांभारवाड्यात व मांगवाड्यात जास्त होत्या. म्हणून या लोकांशी त्यांचा संबंध विशेष असे. यामुळे प्रारंभी अस्पृश्यांचे म्हणजे प्रामुख्याने महारांचे पुढारी म्हणून पुढे आलेले डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा असा समज झाला होता की, माटेमास्तर चांभारांना व मांगांना हाताशी धरून अस्पृश्य वर्गात फूट पाडीत आहेत. त्यांचा हा केवळ गैरसमज असावा. कारण, चांभारवाडे व मांगवाडे यांच्याप्रमाणेच महारवाड्यातही माटेमास्तरांच्या शाळा होत्या व तेथेही ते मुलांना शिकविण्यासाठी जात असत. इतर अनेक बाबतीतही आंबेडकर व माटे यांच्यामध्ये मतभेद असतील. तसे पाहिले तर या दोघांच्याही पूर्वीपासून अस्पृश्योद्धाराचे कार्य करण्यात आपले आयुष्य घालविणाऱ्या कै. वि. रा. शिंदे यांच्या कार्याविषयी तरी माटे यांचे चांगले मत कुठे होते? त्यांनी स्पष्टच म्हटले आहे की, "विठ्ठल रामजी शिंदे यांच्या कामाची काय पद्धती आहे याचे मी बारकाईने अवलोकन केले... इतक्या दिवसांनंतरसुद्धा लिहिताना मला कसेसेच वाटते, पण लिहावयास हवे म्हणून लिहितो. की, शिंदे यांचे ब्रह्मसमाज धोरण व त्यास अनुसरून त्यांनी घातलेली कामाची पद्धत मला आवडेना. जनसेवा करावयास किंवा विचाराला औदार्य प्राप्त करून घेण्याला आपल्या जुन्या धर्माच्या पोटात पुरेसा वाव आहे, असे मला वाटे. व जर ही अस्पृश्य प्रजा हिंदू धर्माची तर आपण चळवळसुद्धा पूर्वकालीन विचारधनाच्या ऐपतीवरच चालवावी, असे वाटे. मूर्तिपूजेला ब्रह्मसमाजात कोठेही स्थान नाही म्हणून अस्पृश्यांच्या प्रश्नातील देवालय प्रवेश हा जो भाग, त्याबाबतीत आपल्या तत्त्वाशी बेइमान न होता शिंदे यांना चळवळ करता येण्यासारखी नाही असे मला वाटे."

प्रो. माटे कट्टर हिंदुधर्मनिष्ठ होते. म्हणून हिंदू धर्माच्या परंपरागत चौकटीत राहून अस्पृश्यता निवारणाचे कार्य केले पाहिजे, असे त्यांचे स्पष्ट मत होते. परंपरागत हिंदू धर्म म्हणजे चातुर्वर्ण्यावरील निष्ठा हे ओघानेच आले. याही बाबतीतील माट्यांच्या वर्तनाविषयीची आंबेडकरांनी सांगितलेली एक आख्यायिका सर्वसामान्य लोकांत पसरलेली होती. ती अशी की, "माटे हे अत्यंत सोवळे गृहस्थ असून त्यांनी आपल्या घरातील एक खोली अस्पृश्यांच्यासाठी निराळी ठेवली होती. तेथेच ते त्यांना बसवीत. घराच्या दुसऱ्या खोल्यांत त्यांचा प्रवेश होणार नाही, अशी ते काळजी घेत. अस्पृश्य लोक त्या खोलीत बसले असताना जर कोणी स्पृश्य

गृहस्थ त्यांना भेटायला आला तर ते स्वत: बाहेर जाऊन त्याला भेटत." ही गोष्ट खरी की खोटी हे सांगता येत नाही, पण माटे यांच्या अस्पृश्यता निवारणाच्या कार्याबद्दल बहुजन समाजात कसे विकल्प निर्माण झाले होते ते यावरून दिसते. या विकल्पांचा स्पर्श माझ्याही मनाला झालेला होता हे आज येथे नमूद करणे अवश्य आहे.

ते काहीही असले तरी प्रो. माटे आपल्या परीने का होईना अस्पृश्योद्धाराचे कार्य अनेक वर्षे करीत होते, यात शंका नाही. 'अस्पृष्टांचा प्रश्न' हा त्यांचा बृहद्ग्रंथ याची साक्ष देईल. हा ग्रंथ मी वाचला होता. त्याचवेळी विठ्ठल रामचंद्र शिंदे यांचा 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला होता. तोही मी वाचला होता. या दोन्ही ग्रंथांवरून या दोन अस्पृश्योद्धारकांचे या प्रश्नाविषयीचे दृष्टिकोन स्पष्ट होत होते. प्रो. माटे यांचे तोपर्यंत प्रसिद्ध झालेले इतर ग्रंथही मी वाचले होते. 'उपेक्षितांचे अंतरंग' या त्यांच्या कथासंग्रहाने त्यातील आशय व अभिव्यक्ती या दोन्ही दृष्टींनी माझे मन वेधून घेतलेले होते. माटयांच्या मराठमोळ्या कसदार भाषाशैलीचा त्यात सुंदर आविष्कार आठवतो. 'साहित्यधारा' या त्यांच्या निबंध संग्रहातील 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' या निबंधात त्यांच्या व्यापक विचारसरणीचे व सूक्ष्म सामाजिक दृष्टीचे उत्कृष्ट प्रतिबिंब पडलेले असल्यामुळे तो मला विशेष आवडला होता.

प्रो. माटे यांचे सामाजिक व साहित्यिक कार्य यांच्याशी मी अशा रीतीने पूर्वीपासूनच परिचित झालो होतो. त्यांचे संस्कार माझ्या मनावर होतेच. महाराष्ट्र साहित्य परिषदेत व्याख्यान देण्यासाठी मी गेलो त्यावेळी आणखी एक विकल्प माझ्या मनात होता. त्या वेळी विदर्भातील साहित्यिकांत अशी समजूत होती की पुण्यातील साहित्यिक स्वत:ला फार मोठे समजतात आणि इतरांना कमी लेखतात. याचा मजेशीर प्रत्यय कुसुमावतीबाई देशपांडे यांना आला होता. त्या व मी, आम्ही दोघेही त्या वेळी मॉरिस कॉलेजमध्ये प्राध्यापक होतो व धंतोलीवर जवळजवळच राहत होतो. मला महाराष्ट्र साहित्य परिषदेत व्याख्यानासाठी बोलावले आहे असे जेव्हा मी त्यांना सांगितले तेव्हा त्या हसून म्हणाल्या, "फार छान. गेल्या वर्षी मलाही व्याख्यानाला बोलावले होते. तेथील एक अनुभव सांगते. व्याख्यानाला सुरुवात होण्यापूर्वी प्रो. माटे यांनी माझा परिचय करून देणारे प्रास्ताविक भाषण केले. भाषणाच्या शेवटी ते म्हणाले, 'परिषदेतील मंडळी विदर्भातील साहित्यिकांना कमी लेखतात अशी जी सर्वसामान्य समजूत आहे. ती कशी खोटी आहे, हे आजच्या प्रसंगावरून दिसून येईल. कुसुमावतीबाई या विदर्भातील आहेत आणि म्हणूनच आम्ही त्यांना या व्याख्यानासाठी अगत्यपूर्वक आमंत्रित केले आहे. सर्वांतर्फे मी त्यांचे स्वागत करतो.' प्रा. माटे यांच्या या प्रास्ताविकामुळे मनात मी फार खट्टू झाले. मला राहावले नाही, म्हणून व्याख्यानाच्या शेवटी मी म्हणाले, 'आपण मला व्याख्यानासाठी बोलावले याबद्दल मी आपली फार आभारी आहे. पण मला दु:ख वाटते ते या गोष्टीचे की, मी या विषयावर बोलण्याला पात्र आहे म्हणून आपण मला बोलावले नाही तर केवळ मी विदर्भातील आहे म्हणून बोलावले. पण त्याहीबद्दल आपले आभार मानणे माझे कर्तव्य आहे.' असे म्हणून मी खाली बसले. माझ्या या अभिप्रायाने प्रो. माटे यांना काय वाटले ते सांगता येत नाही. आता पाळी तुमच्यावर आहे. तेव्हा सावध राहा."

सौ. कुसुमावतीबाईंच्या या अनुभवामुळे प्रो. माटे यांच्याविषयी माझ्या मनात थोडा विकल्प निर्माण झाला होता, हे खरे आहे. पण आज सांगण्याला आनंद वाटतो की, कुसुमावतींना जो अनुभव आला, तसे माझ्या बाबतीत त्या दिवशी काहीही घडले नाही. व्याख्यानाच्या पूर्वी व नंतर समारोपाच्या प्रसंगी प्रा. माटे यांनी माझ्याविषयी फार चांगले उद्गार काढले. माझे व्याख्यानही चांगले झाले. पण माझे मित्र कै. बाबूराव ठोकळ यांच्यामते ते अपूर्ण वाटले. मी सुमारे तासभर बोललो पण आणखी बोलत राहावेसे त्यांना व इतर काही मित्रांना वाटले. श्री. ठोकळ यांच्या घरी मी उतरलो होतो तरी तो संपूर्ण दिवस मी बापूसाहेबांच्या बरोबर होतो. त्यांनी मला स्वत:च्या व प्रा. बाटवे आदी मित्रांच्या घरी नेले. सर्वांनी माझे चांगले स्वागत केल्याचे आठवते. बापूसाहेबांना मी त्यापूर्वीच माझे 'महानुभाव तत्त्वज्ञान' हे पुस्तक भेट म्हणून पाठविले होते. त्यावरसुद्धा आमचे बरेच बोलणे झाले. 'परमेश्वराने सृष्टीची निर्मिती करण्याचे व त्याला अवतार घेण्याचे प्रयोजन काय, या, अनेकांना पडलेल्या प्रश्नाचे उत्तर महानुभाव तत्त्वज्ञानात आढळते. त्यांनी याची संगती फार चांगली लावली आहे व तुम्ही आपल्या ग्रंथात ती उत्तम रीतीने मांडली आहे.' हे त्यांचे उद्गार मला अजून आठवतात. याच भेटीत महाराष्ट्र साहित्य परिषदेने संकल्पिलेल्या 'मराठी

वाङमयाचा इतिहास ' या योजनेविषयीही आमचे बरेच बोलणे झाले.

या व्याख्यानाच्या प्रसंगी बापूसाहेबांची आणि माझी पहिल्यांदाच भेट झाली असली तरी त्यापूर्वीही पत्र-व्यवहाराने त्यांचा व माझा संबंध आला होता, तो या वाङमयेतिहास योजनेच्या संदर्भात. त्या निमित्ताने त्यांच्या व्यापक दृष्टीचा आणि कर्तृत्वाचा मला चांगला अनुभव आला. बापूसाहेब परिषदेचे कार्याध्यक्ष झाल्या-वर त्यांनी आपल्या कल्पकतेने ज्या अनेक योजना आखल्या व महाराष्ट्रातील साहित्यिकांना एकत्रित आणण्याचा प्रयत्न केला. त्यांतीलच एक योजना, वाङ्मयेतिहास लेखनाची होय. नवरोसजी वाडिया कॉलेजातील गणि-ताचे प्राध्यापक श्री. श्री. भि. वोंडाळे यांनी पाचशे रुपयांची देणगी देऊन महाराष्ट्र साहित्य परिषदेने मराठी वाङमयाचा इतिहास सिद्ध करावा म्हणून केलेल्या सूचने-तून या योजनेचे बीजारोपण झाले. त्या वेळी बापूसाहेब माटे यांनी अनेक साहित्यिकांशी प्रत्यक्ष वा पत्रव्यवहा-राच्या द्वारा चर्चा करून मराठी वाङ्मयाच्या इतिहा-साची एकादश खंडात्मक योजना तयार केली. आणि ती सिद्ध करण्यासाठी धडाडीने पावले उचलण्यास सुरु-वात केली. याचे संबंधात त्यांचे मला दि. २०-६-४८ रोजी एक पत्र आले. त्यात त्यांनी लिहिले होते की, " आपण स्वतः संयोजक व प्रि. हरिभाऊ नेने आणि श्री. वा. ना. देशपांडे हे संपादक अशा तिघांनी संकल्पित इतिहासाचा महानुभाव खंड लिहायचा, हे निश्चित झाले आहे. शेवटची ५० पाने आपण उपसंहारात्मक लिहा-वयाची व तिघांनी मिळून ४५० पाने लिहावयाची. त्यात कोणी कोणची व किती लिहावयाची हे आपण त्रिवर्गांनी एकमेकांत ठरवावे. गाठीभेटी, पत्रव्यवहार, विचारविनि-मय– **अवश्य ते सर्व करून आता कामाला प्रत्यक्ष सुर-वात करावी** अशी विनंती आहे... ता. क. प्रि. नेने व श्री. देशपांडे यांची संमतिपत्रे इकडे आली आहेत." यातील जाड ठशातील वाक्यावरून हा इतिहास लौकर तयार करून घेण्याची प्रा. माटे यांची तळमळ स्पष्ट दिसून येते.

तथापि, त्यांच्या हातून ही योजना सिद्ध व्हावी असा योग नव्हता. तिला आरंभापासूनच अडथळे येऊ लागले. दि. २०–६–४८ रोजी त्यांनी, ' प्रि. नेने व श्री. देशपांडे यांची संमतिपत्रे आली ' हे कळवले खरे पण त्यानंतर तीनच महिन्यांनी चिटणीस, वा. दा. गोखले यांच्या मार्फत त्यांनी कळविले की, "आपणास मुद्दाम पत्र लिहिण्याचे कारण की श्रीयुत वा. ना. देशपांडे यांजकडून आज अनपेक्षित पत्र आले. महानुभाव खंडातून मी आपले अंग काढून घेत आहे.' अशा अर्थाचे ते पत्र आहे. पत्र वाचून वाईट वाटले व आश्चर्यही वाटले..." श्री. वा. ना. देशपांडे यांनी अंग काढून का घेतले ते मात्र शेवट-पर्यंत कळले नाही. आणि अशा रीतीने वाङ्मयेतिहा-साच्या एकादश खंडात्मक योजनेला अपशकुन झाला. नंतर परिषदेच्या कार्यकारी मंडळातील सदस्यांत व पुणे येथील इतर विद्वानांत या योजनेसंबंधी मतभेद निर्माण झाले. पुढे ते फार विकोपाला गेले. पत्रिकेच्या १०३ या अंकात प्रो. माटे यांची ही एकादश खंडात्मक योजना प्रसिद्ध झालेली आहे. तीच पुन्हा अंक १०५ मध्येही छापलेली आहे. म्हणजे जून १९५३ पर्यंत तरी प्रो. माटे यांचीच योजना परिषदेसमोर होती. पुढे पत्रिकेच्या १०८ या जाने-मार्च १९५४ च्या अंकात म.सा.प.च्या वाङ्मये-तिहास योजनेनुसार स्थापन झालेल्या निर्वाहक मंडळाने मात्र आपल्या दि. २० डिसें. ५३ च्या सभेत माटे यांची एकादशखंड योजना अमान्य करून त्या ऐवजी मंजूर केलेली सप्तखंडात्मक योजना छापलेली आहे. अर्थात, त्या नवीन योजनेसंबंधीची चर्चा, वादविवाद, आरोप प्रत्यारोप १९५३ च्या उत्तरार्धात फार अटीतटीचे झाले असणार ! कार्यकारी मंडळाच्या सभेसाठी पुणे येथे मी गेलो असताना प्रा. बापूसाहेब त्यासंबंधी अत्यंत कडवट-पणाने बोलले होते. ' जंगलीमहाराज रोडवरील प्रा. दि. का. बेडेकर व त्यांचे एक मित्र या दोन कम्यु-निस्टांनी माझी योजना उधळून लावण्याचा डाव रचला आहे.' असे उद्गार त्यांनी अत्यंत संतापाने काढले होते. गेली अनेक वर्षे या योजनेसाठी आपण राबलो ते सर्व कष्ट पाण्यात गेल्याने त्यांना उद्वेग आला होता. हा एकंदर प्रकार पाहून पुढे या वाङमयेतिहास योजनेतून मीही आपले अंग काढून घेतले. या बाबतीत श्री. बेडेकर आणि श्री. वि. द. घाटे यांच्या मला आलेल्या पत्रातील काही भाग उद्धृत करतो. त्यावरून बापूसाहेबांना विरोध करणारांची भूमिका कळण्यास मदत होईल. श्री. दि. का. बेडेकर यांनी दि. १९–२–५४ च्या पत्रात लिहिले आहे.

"...तरी पण ' प्रारब्ध ' कर्म या दृष्टीने वाङ्मये-तिहासाचे बाबतीत मी ओढला जात आहे. थोडा–तो असा की, येत्या २८ ता.च्या संपादकांच्या बैठकीबद्दल श्री. घाटे, प्रा. सरदार, डॉ. तुळपुळे व प्रा. रा. ना.

दांडेकर यांच्या माझ्यासमवेत काही चर्चा झाल्या. आजच श्री. घाटे यांच्याकडे मी व प्रा. निरंतर बसलो होतो. परवा प्रा. दांडेकर, प्रा. तुळपुळे, प्रा. सरदार व मी बसलो होतो. चर्चेचा निष्कर्ष डॉ. तुळपुळे यांच्या सूचनांच्या रूपाने cyclostyle होऊन तुमच्याकडे आज-उद्या एवढ्यात धाडला जात आहे.

या संपादक बैठकीत सर्व ठीक व स्थिर होण्यास काही प्रत्यवास नाही व मग कामाला प्रारंभ होईल असे दिसते. मुंबई व नागपूर येथून तुम्ही, प्रा. वा. ल. कुलकर्णी प्रभृति येत आहातच. प्रा. कुसुमावतीबाईंनी येण्याचे ठरविले आहेच. तेव्हा खराखुरा साऱ्या महाराष्ट्राच्या एकजीव संकल्पाचा प्रारंभ २८ ला होईल. त्यात प्रा. माटे यांना वाटणारा अकारण विरोध मावळून तेही शुद्ध मनाने सामील होतील– किंवा मग निष्फळ विरोध चालू ठेवतील ! त्यांच्या प्रेरणेचा आविष्कार परवा ता. २४ च्या 'लोकसत्ते'त तुम्हाला वाचावयास मिळाला असेल. पण त्याकडे लक्ष न दिले म्हणजे झाले. अशी कडवट अहंकारी प्रतिक्रिया पुण्याच्या एका परंपरेतून निघणे अटळ आहे. पण आता काळ बदलला आहे व आपण सर्वजण मिळून तो पुरा बदलून सहकार्याने भरीव कार्य पार पाडू शकू. असो..."

दि. १८ फेब्रु. १९५४ रोजी लिहिलेल्या पत्रात श्री. वि. द. घाटे यांनी लिहिले आहे.

You may have read a dirty article, which has very recently appeared in the Lokasatta of Bombay, obviously inspired, it not dictated by Prof. Mate. The article is full of lies, half truths and contradictions. The Nirwahaka Mandal took certain important decisions unanimously and reduced the number of volumes from 11 to 7. They also decided to invite certain eminent writers, who were left out in the past. Prof. Mate did not raise any objections to all this proceeding and now on one plea or another, he wants to create trouble. I believe he has sent copies of his resignations to all editors including yourself. Please do not misunderstand. The work undertaken by us is going smoothly and is bound to succeed. I requested Prof. Mate again and again to reconsider his decision and withdraw his resignation, but he is obstinate and I am too self-especting a person to request him again. His motive in sending copies of his resignation to the editors is obviously to induce them to take a similar step. I consider this procedure as highly irregular and undignified. If Prof. Mate feels that as principle, he should not work as editor, he has got every right to resign and walk out, but I do not know why he should go out of his way to send copies of his resignation to other editors. It seems that he was disappointed as no editors have sent resignations following him, so in the article in Lokasatta a direct insult is given to the editors alleging that they lack sense of self-respect and that they agree to work because of certain inducements..."

वरील दोन उतारे मी मुद्दामच उद्धृत केले आहेत. त्यावरून श्री. माटे यांची वाङ्मयेतिहासाची एकादश खंडात्मक योजना रद्द होऊन त्याऐवजी सप्तखंडात्मक नवीन योजना आल्यामुळे ते किती संतापले होते. त्यांनी कोणती पावले उचलली, त्यावर नवीन योजनेच्या पुरस्कर्त्यांच्या कोणत्या प्रतिक्रिया झाल्या याची थोडीफार कल्पना येऊ शकेल. याच संदर्भात, कार्यकारी मंडळाचा कार्यकाल संपल्यानंतर जी शेवटची सभा झाली, तीत मी जे भाषण केले त्यासंबंधी बापूसाहेबांनी २७-४-५५ रोजी मला जे पत्र लिहिले त्यातील आरंभीचा भाग येथे उद्धृत करतो. त्यांनी लिहिले.

" लिहीन लिहीन म्हणत होतो तो आता लिहितो ! आपल्या कार्यकारिणीची जी शेवटची सभा झाली तीत भाषण करताना आपण माझ्या संबंधाने जे उद्गार काढले ते माझ्या चित्तात सदैव वास करून राहतील. संपादकत्व आपल्याकडे कसे आले असावे ते आपण स्वच्छ सांगून टाकले. तसेच बापूसाहेब यांच्या हाती इतिहासयोजना राहती तर आतापर्यंत चार पाच खंड तरी निघाले असते असेही आपण प्रांजळपणाने सांगितले ते ऐकून मला मूठभर मास आले. तुम्हीच असे बोलल्या-

मुळे विरोधक मनातल्या मनात चपापले असतील ! असो मी फार फार आभारी आहे. "

वापूसाहेब माटे यांच्या वरील पत्रात माझ्या संपादकत्वाचा उल्लेख आला आहे. माझ्या मते वापूसाहेबांच्या व्यापक दृष्टीचे व माणसे जोडण्याच्या प्रवृत्तीचे ते एक उत्तम उदाहरण होय. त्यासंबंधी थोडे लिहिणे आवश्यक आहे. म. सा. प. च्या कार्यकारी मंडळावर एक सभासद म्हणून व म. सा. पत्रिकेचा संपादक म्हणून एप्रिल १९५२ ते मार्च १९५५ अशी तीन वर्षे मी होतो, ते प्रामुख्याने बापूसाहेबांच्यामुळे हे येथे कृतज्ञतापूर्वक नमूद केले पाहिजे. त्याचे असे झाले. महाराष्ट्र साहित्य परिषद ही सर्व महाराष्ट्राची प्रातिनिधिक संस्था होय असे परिषदेचे कार्यकर्ते म्हणत असत. तथापि तिचे प्रत्यक्ष कार्य पुणे आणि भोवतालचा परिसर यातच केंद्रित झालेले असे. वाहेरच्या व्यक्तींना त्यात फारसे स्थान नसे. त्यामुळेच मुंबई, नागपूर, औरंगाबाद इत्यादी ठिकाणी स्वतंत्र साहित्यसंस्था स्थापन होऊन त्यांची चांगली भरभराटही होत होती. तरीही महाराष्ट्र साहित्य संमेलनाची सूत्रे मात्र परिषदेच्याच हातात केंद्रित झालेली होती. ती काढून घेऊन सर्वांचे प्रातिनिधिक असे मराठी साहित्य महामंडळ स्थापन करण्यात यावे या कल्पनेचा पुरस्कार होऊ लागला होता. अशा स्थितीत परिषदेच्या कार्याचे विकेंद्रीकरण होऊन त्यातील काही कार्यात तरी बाहेरच्या मंडळींचा समावेश करून घेणे आवश्यक आहे. असे ज्यांना वाटत होते त्यांपैकी प्रा. माटे हे एक होते. त्यांनी व त्यांच्या काही सहकाऱ्यांनी या दृष्टीने पावले उचलायचे ठरविले होते. दि. २६-१२-५१ रोजी प्रा. माटे यांनी मला एक खाजगी पत्र लिहिले ते असे

" प्रिय डॉक्टरसाहेब, सा. न. वि. वि. आपल्याला एक विनंती आहे. कदाचित माझी ही विनंती आतापर्यंत आपल्या कानावर आलीही असेल. १९५२ एप्रिलपासून महाराष्ट्र साहित्य परिषदेची जी नवी कार्यकारिणी बनावयाची आहे, तिच्यात आपला अंतर्भाव असावा अशी माझी फार इच्छा आहे. सौ. कुसुमावतीबाई देशपांडे या एक उपाध्यक्ष म्हणून निवडून आल्या आहेतच. आपण कार्यकारिणीत यावे असे मला वाटते, पण तेथे निवडून यावयाचे तर आपण प्रथम नियामक मंडळात आले पाहिजे. तेथे आपण येण्याची व्यवस्था करण्यात आली आहे. इतकेच की, आपली या व्यवस्थेला संमती असावयास हवी... आपण नियामक मंडळात याल. मग कार्यकारिणीत निवडून येण्यासाठी आपल्याला उभे राहवे लागेल. ही निवडणूक यशस्वी व्हावी म्हणून आपल्याला थोडीफार हालचाल करावी लागेल ! पण आपला दर्जा व आपली विद्वत्ता ही ओळखून नियामक मंडळाचे सभासद आपल्याला निवडून देतील असा भरवसा वाटतो. आपण कार्यकारिणीवर आलात म्हणजे तिचाही दर्जा वाढेल असे मला वाटते..."

अशा रीतीने योजनापूर्वक बापूसाहेबांनी मला परिषदेच्या कार्यकारिणीवर निवडून आणले आणि नंतर महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा संपादक म्हणूनही माझी निवडणूक करवून घेतली. हे श्रेय सर्वस्वी त्यांचे होते !

साहित्य पत्रिकेचा मी संपादक झालो हे काहींना आवडले नसावे असे वाटते. नागपूरहून पत्रिकेचे संपादन करायचे म्हणजे काही व्यावहारिक अडचणी येणारच. त्या सहानुभूतीपूर्वक सोडविण्यासाठी मला मदत करण्याऐवजी नकारात्मक भूमिका त्यांनी घेतली. संपादक मंडळातील माझ्या एका सहकाऱ्याने त्या वेळी मला लिहिले की..." येथील लोकांचे म्हणणे असे की, डॉ. कोलते सांगतील तेवढे पाहावयाचे ! आजपर्यंत मुख्य संपादकच सर्व पाहत असत. पण मला वाटते, सर्वांनी काम केले तर तुम्हाला मदत नाही का होणार ?... तुमची कसोटीच या मंडळींना पहावयाची असेल तर मला वाटते आपण दुप्पट उमेदीने कामाला लागणे जरूर आहे... तुम्ही सांगितल्याशिवाय म्हणे अभिप्रायाची पुस्तकेही इथे पाहणे कठीण आहे ! उपसंपादकांनी काय करावयाचे, काय नाही हे आपण एकदा कळवावे म्हणजे तसे वागता येईल..." यावरून अडचणी कशा निर्माण करण्यात येत होत्या याची कल्पना येईल याचा एक परिणाम असा झाला की, माझ्या संपादकत्वाखाली निघालेल्या पहिल्या अंकातील लेखांची प्रुफेही नीट तपासली गेली नाहीत, त्यामुळे अशुद्धे फार राहिली. त्या अंकातील सर्व मजकूर परिषदेच्या शुद्धलेखनाप्रमाणेच छापला होता; फक्त दोन लेख त्या त्या लेखकांच्या इच्छेनुसार अनुच्चारित अनुस्वार वगळून छापले होते. या दोन्ही बाबतीत 'लोकशिक्षण'कार जांभेकर यांनी मोठाच गहजब उडवला. याही बाबतीत बापूसाहेब माटे यांनी मला साह्य केले. कसे ते त्यांच्याच शब्दांत येथे देतो. आपल्या दि. १७-९-५२ च्या पत्रात ते लिहितात.

"...आता इकडे काही दिवसांपूर्वी घडलेली एक वारकीशी वाव कदाचित आपल्या कानावर आली असेल. माजी 'लोकशिक्षण' मासिकाचे संपादक श्री. जांभेकर यांनी 'लोकसत्ता' पत्रात आपल्या कारकिर्दीतील पहिल्या अंकावर एक वराच कडक लेख लिहिला होता. तो कदाचित आपण पाहिलेला असेल...त्यांचे मुख्य मुद्दे दोन : १ अंकात अशुद्धे अतोनात आहेत; २ शुद्धलेखन परिषदेचेच असावे ते नाही.

या वावीचा उगाच जास्त गर्गशा आता करावा हे मला वरे वाटले नाही. म्हणून मी त्यांना वोलावून घेऊन असे सांगितले की '(१) अशुद्धे ठेवावीत असे डॉ. कोलते यांना तरी कसे वाटेल? (२) आणि शुद्धलेखन परिषदेचेच पत्करले पाहिजे हा मुद्दा डॉ. कोलते यांनी मान्य केलेला आहे. एक संपादक मंडळ जाऊन त्या ठिकाणी दुसरे आले आहे. त्या संधिकालात झालेला हा घोटाळा आहे!' हे माझे वोलणे त्यांना पटले. त्यांचे शेवटी म्हणणे इतकेच की, संपादकांनी पुढील अंकात शुद्धलेखनासंबंधी तरी असा खुलासा करावा की, 'त्रैमासिकाचे शुद्धलेखन परिषदेच्या तद्विषयक नियमावलीस धरूनच राहील.."

तथापि, पहिल्या अंकात देखील मी हेच धोरण स्वीकारलेले असल्यामुळे मुद्दाम असा खुलासा करणे मला इष्ट वाटले नाही व म्हणून तो मी केलाही नाही. आणि इथेच हे प्रकरण संपले.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वाङ्मयेतिहास योजना व महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादन या दोन प्रमुख माध्यमातून प्रा. वापूसाहेव माटे यांच्याशी झालेला परिचय उत्तरोत्तर दृढ होत गेला. आणि त्याला जिव्हाळ्याचे स्वरूप आले. या कालावधीत वापूसाहेव दोनदा नागपूरला आले. मुक्काम माझ्या घरी नसला तरी दोन्ही वेळा एकेक दिवस त्यांनी आमच्या सहवासात घालवला. त्या प्रसंगीचा आपला आनंद व्यक्त करणारी त्यांची अनेक पत्रे माझ्याजवळ आहेत. आज ती वाचताना मन भरून येते व वापूसाहेवांच्या आठवणींनी डोळे पाणावतात. आपली वेदना माझ्याजवळ वोलून दाखविण्याइतपत आमच्या विषयी त्यांच्या मनात जिव्हाळा निर्माण झाला होता. डिसेंबर १९५५ मध्ये एक दिवशी त्यांचे मला घाटकोपर राजावाडा, १३ वी, २०१ हून अनपेक्षित पत्र आले.

प्रिय डॉक्टरसाहेव,

मला शेवटी कॅन्सरने गाठले आहे! अन्ननलिकेत अवघड ठिकाणी आहे. टाटा मे. हॉस्पिटलमध्ये रोज उपचारासाठी जातो. विपरीत दैवगती आहे. सौ. उषाताई व मुले यांना नमस्कार व आशीर्वाद. आपल्या सर्व मित्रांना प्रीतिपूर्वक नमस्कार आहे...श्री. म. माटे.

हे पत्र वाचून मला अतीव दुःख झाले. वापूसाहेव या कॅन्सरशी सतत दोन वर्षे झगडत असावे. दि. २५ डिसेंबर १९५७ त्यांचे निधन झाले. त्यांच्या स्मृतीला शतशः प्रणाम.

■

## साभार स्वीकार

### समीक्षा

**शाश्वताचे रंग** : विद्याधर पुंडलिक; सुपर्ण प्रकाशन, पुणे; १९८६; रु. ५० △ **वाङ्मयेतिहासाची संकल्पना** : दत्तात्रेय पुंडे; प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ६० △ **दलितसाहित्य-प्रवाह आणि प्रतिक्रिया** : गो. म. कुलकर्णी; प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०; १९८६; रु. ५० △ **संतर्पण** : डॉ. स. गं. मालशे, अनिलकुमार मेहता, पुणे ३०; १९८६; रु. ३५ △ **कालमान** : फ. मुं. शिंदे; परिमल प्रकाशन, औरंगाबाद; १९८६; रु. ४० △ **दलित साहित्य-स्वरूप व भूमिका** : वामन निंबाळकर; प्रवोधन प्रकाशन, मेडिकल चौक, नागपूर; १९८६; रु. २४ △

# समाजसुधारक प्रा. श्री. म. माटे / भालचंद्र फडके

आपल्या चरिताचा हिशेब जेव्हा माणूस करीत असतो तेव्हा तो दैवाला, देवाला किंवा कर्माला तरी जबाबदार धरतो किंवा आपल्या वाटयाला जी दुःखे, जे पराभव सोसावे लागले त्याची जबाबदारी कुणावर तरी टाकून मोकळा होतो. यशाचे श्रेय मात्र स्वतःकडे घ्यायचे तो विसरत नाही. प्रा. श्री. म. माटे यांनी आपल्या चरिताचा हिशेब अंतर्मुख होऊन केला आहे. ते लिहितात, " १९१० साली इंटरमिजिएट नापास होऊन अठरा रुपयांवर एका लहानशा खोलीत मास्तरकी करणाऱ्या मला इतपत वैभव लाभले हेही मी भाग्यच समजतो. माझी भाग्यरेषा मला उंचावत नेता आली असती. पण त्यासाठी मला सद्सद्विवेकबुद्धी आणि स्वाभिमान यांची मान मुरगाळावी लागली असती. वीस वर्षेपर्यंत दलित वर्गाची सेवा करण्याचे भाग्य मला लाभले; आणि त्या कामी तन, मन, धनेकरून मी अत्यंत सचोटीने झटलो. त्यामुळे तर मला शाश्वतचे सुख लाभले आहे." (चित्रपट : पृ. ४५०) प्रा. माटे यांनी अस्पृश्यता निवारण कार्यात स्वतःला झोकून दिले हे पाहून पुणेकरांनी त्यांची यथेच्छ टिंगल-टवाळी केली आहे. पण माटे मात्र शांतपणे सांगतात " समाजाला इतके अप्रिय वाटणारे काम मी करीत होतो तर त्याने माझा एवढा दुस्वास करावा यात काय आश्चर्य ?"

समाजसुधारकांचा छळ करण्याची, त्यांना सतत दूषणे देण्यात आनंद मानण्याची प्रवृत्ती या देशात दीर्घकाल चालत आलेली आहे. प्रा. श्री. म माटे यांना अस्पृश्यनिवारणाच्या कार्याबद्दल अनेक शिव्याशाप सोसावे लागले. राष्ट्रीय पक्षातील एक देशभक्त त्यांना ' अहो महार माटे ' असे गर्जून हाक मारीत. एका प्रसिद्ध पत्राचे व्यवस्थापक कचेरीत बसून म्हणत की ' तो महारडा माटे ना ?' एकाने म्हटले की भोपटकर व माटे रोज महारांच्या घरून गोमांस खाऊन येत. तर एक भगवद्भक्त सनातनी मराठे आपल्या अनुयायांना सांगत, " हरिभाऊ फाटक आणि माटे मांगणीशी व्यभिचारासाठी मांगवाडयात रात्रीचे जात." माटे अस्पृश्यतानिवारणाचे कार्य करीत म्हणून पुण्यातील काही सनातन्यांनी ' आमच्या वाडयात तुम्हाला जागा नाही ' असेही बजावले आहे. पुणेकरांचे शिव्याशाप खात, त्यांनी सभ्यपणाने केलेला छळ सोशीत माटे मास्तरांनी अस्पृश्यतानिवारणाचे सामाजिक कार्य १९१७ ते १९३७ अशी वीस वर्षे केले. सामाजिक कार्य करीत राहायचे या जाणिवेचे सुख भोगण्यासाठी आपल्या मताविरुद्ध वागण्याची वेळ येऊ नये म्हणून किंमतही मोजली. १९३७ साली ते या क्षेत्रातून आपण होऊन बाहेर पडले. कारण एकतर अस्पृश्यता निवारणाच्या कामात जे शारीरिक कष्ट पडत ते सोसेनासे झाले, ज्या खासगी क्लासच्या बळावर हे काम करता येईल तो क्लासच बंद झाला आणि आर्थिक चणचण भासू लागली. पुणे नगरपालिकेतील ब्राह्मण-अब्राह्मण या विरोधी वृत्तीमुळे माटे मास्तरांना अस्पृष्टांच्यासाठी सुरू केलेल्या शाळा नगरपालिकेला द्याव्या लागल्या आणि मतप्रचार, सभा, व्याख्याने या उरलेल्या कामात त्यांचे आणि समकालीन अस्पृष्ट पुढाऱ्यांचेसुद्धा मतभेद होऊ लागले.

पण आपल्या आयुष्याच्या ऐन कर्तृत्वाची वीस वर्षे त्यांनी अस्पृश्यता निवारण कार्याला दिली आणि हे कार्य आपल्या मगदुराप्रमाणे पण कसलीही अपेक्षा न बाळगता प्रामाणिकपणे त्यांनी केले हे कुणाला नाकारता येणार नाही. आजही एखादा कृतघ्न विचारवंत त्यांचे अस्पृश्यतानिवारणाचे कार्य वरवरचे होते असा उद्‌गार काढतो तेव्हा दुःख होते. कारण हे विचारवंत कोणतेही ठोस कार्य अंगावर न घेता शेरेबाजी करीत असतात. वस्तुतः १९१७ ते ३७ पर्यंतच्या काळात अस्पृश्यतानिवारण कार्य तनमनधन झोकून देऊन केवळ काम करीत राहणे ही अवघड गोष्ट होती. पण माटे मास्तरांना मनोमन जाणवले होते की राष्ट्रीय एकात्मतेच्या आड

या देशातील जातिभेद, उच्चनीच भाव, स्पृश्यास्पृश्यता या गोष्टी येत आहेत आणि त्यांचे निर्मूलन करणे यातच राष्ट्रहित आहे. ते ' चित्रपट ' या आत्मकथेत लिहितात " धार्मिक व सामाजिक प्रश्न पूर्णपणे समाधानकारक रीतीने सुटल्याशिवाय, समाजातील शास्त्रविहित विषमता समूळ गेल्याशिवाय, मनुष्यमात्राला आपले नशीव काढण्याची संधी, कसल्याही तऱ्हेची धार्मिक आणि सामाजिक हरकत न येता, मिळाल्याशिवाय ह्या देशात लोकशाही पूर्णपणे अवतरावयाची नाही." माटेमास्तरांनी आपली तात्त्विक भूमिका विचारपूर्वक बनवली होती. अस्पृश्यतानिवारण, जाति-विषमता, स्त्रियांचे प्रश्न, शेतकऱ्यांची स्थिती इत्यादी प्रश्नांची सोडवणूक स्वातंत्र्य-संपादनाच्या पूर्वी सुटायला हवे होते अशा ताटकळत ठेवलेल्या प्रश्नांमुळे प्रत्येकाला आता जाणवत आहे की स्वातंत्र्य आले पण अजून सुराज्याचा सूर्य उगवायचा आहे.

अस्पृश्यता-निवारणाच्या कार्याकडे आपण का वळलो याचे उत्तर स्पष्टपणे मांडताना ते लिहितात, " अस्पृश्यता-निवारणाने एक घोर सामाजिक अन्याय दूर व्हावा हे मत खरेच होते. राजकारण हे त्याच्या सोडवणुकीवर अवलंबून ठेवणे चूक असेल पण तो प्रश्न सोडवावयास हवा हे मत सर्व राजकीय पुढाऱ्यांनी आग्रहाने प्रतिपादिले होते. कै. सीतारामपंत देवधर ह्यांनी आम्हाला सामाजिक प्रश्नांच्या विचाराची दीक्षा केव्हाच दिलेली होती. तुकारामबोवांच्या व ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयाच्या वाचनाने या आपदग्रस्त समाजाच्या संबंधाने माझ्या मनात गाढ सहानुभूती उत्पन्न झालेली होती व आईने व माझ्या भावांनी भोगलेले हाल माझ्या डोळ्यांपुढे सदैव दिसत होते. सर्व राजकीय पुढाऱ्यांचा अस्पृश्यता निवरणाचा परोक्ष घोष चालू होता. ह्या सर्वांचा परिणाम माझ्या मनावर अतिशय झाला आणि ह्या प्रश्नासंबंधाने कै. विठ्ठलराव शिंदे हे काय करतात हे मी आदराने व सहानुभूतीने पाहू लागलो. " पुण्यात त्यावेळी अनेकजण शिक्षक व्यवसायात होते. पण माटे मास्तर मात्र आपल्या विद्यार्थ्यांना घेऊन अस्पृश्यवस्त्यात जात आणि त्यांना जाणवून देत की हाल, विपत्ती, दैन्य आणि निराशा ह्यांचे मूर्तिमंत अवतार या वस्त्यांतून नांदत आहेत. प्रत्यक्ष अस्पृश्यांच्या वस्तीतच जाऊन काम करावे हा माटे मास्तरांचा निर्णय तत्कालीन सर्वांना आवडणे शक्य नव्हते. पण कुणी वंदा, कुणी निंदा आमुचा जनहिताचा धंदा असे विचारसूत्र माटयांनी स्वीकारले होते. यामागे सहानुभूतीने अथांग भरलेले माटयांचे अंतःकरण होते. पण ते खरेखुरे क्रियावान पंडित होते. प्रत्यक्ष कृती करण्यावर त्यांचा भर होता. अस्पृश्य समाजासाठी आपण काम करीत आहोत असा आव न आणता त्यांच्या बरोबर काम करण्यात त्यांना ' रस ' होता. म्हणून न्यू इंग्लिश स्कूल शेजारच्या मांगवाड्यात पिंपळाच्या पडक्या पारावर त्यांनी पहिली शाळा सुरू केली आणि मांगवाड्यातील सर्व स्त्री-पुरुषांना बोलावून सांगितले की लिहिणे–वाचणे शिकवणे, धार्मिक प्रवचने करणे, दारू-सोडावयास लावणे व त्यांच्या अडचणींचा परिहार करणे असे चार प्रकारचे काम करणार आहोत. त्यांच्याबरोबर हरिभाऊ, अनंतराव सहस्रबुद्धे, विनायकराव लिमये व काही स्वयंसेवक काम करीत. या पहिल्या शाळेचे काम सुयंत्र चालू लागल्यानंतर माटे-मास्तरांनी मंगळवार पेठेत महारांची वस्ती होते तेथे शाळा सुरू केली आणि नंतर नारायणपेठेत नदीकाठी चांभारवाडा होता तेथे तिसरी शाळा सुरू केली. अशा तऱ्हेने पुणे व लष्कर विभागात माटेमास्तरांनी सुरू केलेल्या शाळांची संख्या बावीस झाली. या शाळा चालवण्यासाठी माटयांनी स्वतःचा पैसा खर्च केला पण वाटयाला आला तो समाधानाचा ठेवा आणि काहीच करू न शकणाऱ्या रिकामटेकड्या सनातनी पुणेकरांचे शिव्याशाप ! केवळ मिशनरी पद्धतीने काम करणारे शे-सव्वाशे स्वयंसेवक व ३४ सदस्यांचे अस्पृश्यता-निवारक मंडळ उभे करण्यात माटयांना यश मिळाले हे दुर्लक्षून किंवा ते कमी लेखून चालणार नाही. माटेमास्तरांनी पदरचा पैका या कामासाठी खर्च केला म्हणून त्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई यांनी कधीच तक्रार केली नाही. माटे मास्तरांनी या संदर्भात लिहिले आहे " घरात जमा होत असलेला पैसा सारखा बाहेर जातो हे पाहून एखाद्या स्त्रीने आमच्या घराचे कजागस्थान बनवले असते. पण लक्ष्मीबाईंनी कजागस्थान तर बनवले नाहीच उलट अनेक आपत्तींच्या प्रसंगीसुद्धा आमचे घर म्हणजे त्यांनी ' आनंदवनभुवन ' बनवले." माटे मास्तरांचे काम प्रबोधनाचे होते. जे काम कोणी अंगावर घेणे सुतराम शक्य नव्हते ते अस्पृश्यता–निवारणाचे काम त्यांनी आपणहून घेतले होते. ' अस्पृश्य ' या शब्दाऐवजी ते ' अस्पृष्ट ' अशा शब्दाची योजना जाणीवपूर्वक करीत. अस्पृष्टांच्या जवळ ते सेवेची भावना घेऊन गेले. त्यांना वाटत होते की समतेकडे जाणारा मार्ग ममतेतून

जातो. अस्पृष्ट समाजावद्दल वाटणारे ममत्व वरकरणी नव्हते. अस्पृश्यता–निवारणाची त्यांनी स्वीकारलेली कल्पना कुणाला मर्यादित वाटेल पण त्यांनी हेतुपुरस्सर स्वत:पुरती आखून घेतली होती. त्यांच्या वस्त्या स्वच्छ करण्यात, त्यांना व्यसनापासून परावृत्त करण्यात आणि त्यांच्या लहानमोठ्या अडचणी सोडवण्यात माटेमास्तरांना एक निर्मळ समाधान वाटत असे. अस्पृश्यता-निवारणाची व्याख्या स्पष्ट करताना ते लिहितात, " रोटी–वेटी व्यवहार हा अस्पृश्यता–निवारणाचा आवश्यक भाग आहे असे मी कधी मानलेच नाही. अस्पृष्टांचे खरे नुकसान कशाने झाले आहे हे माझ्या बुद्धीने ठरवले आणि ते नुकसान होऊ नये म्हणून यत्न करू लागलो. त्यांना सृष्टीने दिलेली सामर्थ्याची बीजे विकसित केली पाहिजेत आणि विकसित झालेल्या त्यांच्या सामर्थ्याचा समाजात आणि देशात वापर होऊ दिला पाहिजे. हे होत नाही म्हणून अस्पृष्टांचे खरे नुकसान झाले आहे असे मी ठरवले होते (चित्रपट पृ. २९७) रोटी-बेटी व्यवहाराचा प्रश्न येऊ न देण्यामागे स्पृश्य समाजाचा रोष होण्याचा संभव कमी होईल असे माटेंना वाटत असले तरी अस्पृष्टांना विकासाची संधी दिली पाहिजे हा त्यांचा आग्रह स्पृश्य समाजाचा रोष ओढवून घेण्यास पुरेसा होता. कारण स्पृश्य समाजाला माणसासारख्या माणसांनी गावकुसावाहेर वहिष्कृत जीवन जगावे असेच वाटत होते. म्हणून सामाजिक न्यायासाठी झगडणाऱ्या माटेंना निंदानालस्तीच्या वणव्यात सतत होरपळत राहावे लागले.

अस्पृश्यता–निवारणासाठी शाळा, सभा, परिषदा, चर्चा वादविवाद इत्यादी उपक्रम त्यांनी कसलीही अपेक्षा न वाळगता व सनातनी पुणेकरांच्या विरोधाला न जुमानता सातत्याने चालू ठेवले पण त्याचबरोवर अस्पृश्य म्हणजे कोण ? अस्पृश्यतेची उपपत्ती कशी झाली ? वर्णव्यवस्था आणि जातिव्यवस्था यांचे स्वरूप नेमके काय ? त्यांचा परिणाम सामान्य जनसमाजावर काय झाला ? इत्यादी प्रश्नांची तात्त्विक मीमांसा करण्यात माटेंचे मन गुंतलेले होते. त्यांनी केलेल्या या प्रश्नांच्या तात्त्विक मंथनातून 'अस्पृष्टांचा प्रश्न' या ग्रंथाची निर्मिती झाली. या ग्रंथात माटे यांनी जी मते मांडली ती सर्वांच्या सर्व मान्य होण्याजोगी नाहीत. पण हा ग्रंथ सिद्ध करण्यासाठी माटे यांनी जो व्यासंग केला तो विचारात घेतला पाहिजे. या पुस्तकात माटेमास्तरांनी अत्यंत उपयुक्त माहिती एकत्र केली आहे. समाजशास्त्राच्या अभ्यासकाला हे पुस्तक ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपयुक्त ठरेल. या पुस्तकात अस्पृश्य कोण याची चिकित्सा करून त्यांची प्रांतवार संख्या निश्चित केली आहे. माटेंनी 'अस्पृश्य' या शब्दाऐवजी 'अस्पृष्ट' हा शब्द सुचवला. पण तो रूढ होऊ शकला नाही. सरकारने 'डिप्रेस्ड क्लास' असा, त्याची नीट व्याख्या न करता शब्द सुचवला. हिंदुधर्मी आणि सरकार या प्रश्नाकडे निरनिराळ्या दृष्टीने पाहतात. गांधीजींचा 'हरिजन' शब्द हा फारच भोंगळ आणि त्याला डॉ. आंबेडकरांनी कडाडून विरोध केला होता. पुढे १९३५ नंतर सरकारने अनुसूचितजाती, अनुसूचितजमाती, भटक्या विमुक्त जमाती असे शब्दप्रयोग रूढ केले. भारतीय घटनेत ते समाविष्ट करण्यात आले. आज 'दलित' शब्द या सर्व जाती-जमातींना उद्देशून व्यापक अर्थाने वापरला जातो. माटेंनी अस्पृश्य कोण? या प्रश्नाचे उत्तर देताना लिहिले आहे की चतुर्वर्ण हिंदू ज्याच्या देहालाच विटाळ मानतात व म्हणून ज्याला व्यवहारात अडचण उत्पन्न होते व जीवितात उत्कर्ष साधता येत नाही ते अस्पृश्य लोक होत. चतुर्वर्ण हिंदूंनी ही विटाळाची कल्पना स्वीकारून अत्यंत अमानुषपणा व्यक्त केलेला आहे आणि याला धर्ममान्यता देणे हे तर महाभयंकर ! त्यामुळे माणसासारख्या माणसांना गावकुसावाहेर अपमानाचे परावलंबी जिणे तर जगावे लागलेच पण त्यांच्या विकासाच्या वाटा पार बंद करून टाकल्या. बृहन्महाराष्ट्रातील प्रमुख अशा महार, चांभार, मांग, ढोर, कालधा, खालपा, तुरी, सिधर्व या अस्पृश्य जातींची परिश्रमपूर्वक गोळा केलेला माहिती तसेच वडारी, पारधी, कातकरी, मांग-गारुडी, वंजारी, भिल्ल, भामटा इत्यादी मागासलेल्या जातींची माहिती देऊन माटे-मास्तरांनी आपली नव्या युगमानानुसार ठाम भूमिका मांडली आहे. ते लिहितात, " आम्ही चतुवर्ण लोक हे या देशाचे मालक आहो' हा हट्ट आमच्या धार्मिक तत्त्वज्ञानराशीतून गळाला पाहिजे. 'हिंदुस्थान देशात जे कोणी आहो त्या सर्वांचा देश आहे व योग्यतेप्रमाणे कोणालाही सत्ता, सुखे व वैभवेही येथे मिळवता येतात' हा न्याय सामाजिक तत्त्वज्ञान म्हणून आम्ही पतकरला पाहिजे. हे पतकरणे म्हणजे अस्पृश्यता–निवारण " (अस्पृष्टांचा प्रश्न–पृ.२४६) अशी ठाम भूमिका मांडणारे माटे अस्पृश्यतेची उपपत्ती विषद

करून सांगताना वंश—जाणीव आमच्या समाजघटनेच्या बुडाशी आहे हे प्रमेय मांडतात. आपल्या प्रमेयाच्या समर्थनार्थ पंडित रिस्ले यांच्या अवतरणाचा आधारही ते देतात. (तत्रैव पृ. १५४) आणि लिहितात, "वंश आहेत, व आहेत म्हणूनच ते तसे राहू देणे किंवा राहू दिलेले असणे न्याय्य आहेत असे येथे प्रतिपादवायचे नाही. तर शुद्ध ठेवल्यानेच संस्कृतिसंवर्धन झाले आहे व न ठेवल्याने झाले नाही व झाले नसते म्हणून वंशजपणुकीची कल्पना न्याय्य आहे." हे प्रतिपावयाचे आहे. माटे यांचे म्हणणे स्वीकारणे कठीणच आहे. वंशशुद्धी आणि संस्कृती-संवर्धन यांच्यातील नाते अशास्त्रीय वाटते. हिंदुस्यानला हिंदुस्यानेपणा कोणी दिला ? या प्रश्नाचे उत्तर देताना ते लिहितात, 'हजारो वर्ष डोंगरकठडीला राहून नाहीतर झाडपाल्याच्या आड लपून, उंदीर घुशीवर नाहीतर पालापाचोळघावर ज्यांनी गुजारा चालवला आहे, अशा संताळांनी, का गोंडांनी, का भिल्लांनी त्याला हिंदुस्यानपणा दिला ?" हा माटे यांचा प्रश्नच मुळी चुकीचा आहे. संस्कृती म्हणजे जगण्याची पद्धती. संताळ, गोंड, भिल्ल इत्यादी जे आदिवासी या देशात राहात आहेत त्यांची विशिष्ट संस्कृती आहे आणि त्यांनीही हिंदुस्थानला हिंदुस्थानपणा दिला आहे हे मान्य करावे लागेल." आपणच सुसंस्कृत आहोत. आदिवासी जाती जमातींना सुसंस्कृत जीवनाची तोंड ओळख नाही असे जे त्रिवर्ण दुरभिमानापोटी म्हणत आले आहे ते म्हणणे म्हणजे सांस्कृतिक भांडवलशाहीचे निदर्शक होय.

हिंदुस्थानातील जातिभेदाच्या मुळाशी वांशिक फरकाची जाणीव आहे हे माटघांचे म्हणणे तसे टिकणार नाही. वंश आणि रक्ताच्या शुद्धतेचे रक्षण करणे हा जातीमागील हेतू आहे हे म्हणणेही बरोबर नाही. शुद्ध वंशाचे लोक जगाच्या पाठीवर कोठेही अस्तित्वात नसून जगाच्या सर्व भागात मिश्र वंशाचेच लोक आहेत. श्री. भांडारकर यांनी म्हटले आहे, "विदेशी वंशाचे मिश्रण झाले नाही अशी जात किंवा वर्ण क्वचितच असावा. विदेशी रक्ताचे मिश्रण येथील रजपूत मराठा इत्यादी लढवय्या जातीतच नव्हे, तर आपण विदेशी रक्तापासून मुक्त आहोत अशा भ्रमात मश्गूल असलेल्या ब्राह्मणांचा वर्णसुद्धा विदेशी रक्ताशी भेसळ झालेला आहे." हे वचन 'जातिभेद निर्मूलन' या आपल्या ग्रंथात उद्धृत करून डॉ. आंबेडकरांनी म्हटले आहे की भारतातील जातिव्यवस्था वेगवेगळ्या वंशातील रक्त आणि संस्कृती यांच्या मिश्रणानंतर अस्तित्वात आली. वेगवेगळ्या जाती म्हणजे वेगवेगळे वंश असे मानता येणार नाही. चार वर्ण म्हणजे चार पृथक् मानववंश असे म्हणणेदेखील सिद्ध झालेले नाही. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी म्हणतात, "वंशभेद हे जातिभेदाचे निश्चित गमक कोणत्याही एक वा अनेक जातीत सापडणे फार कठीण आहे." (त. ल. जो. लेखसंग्रह खंड १—पृ. ३६६) श्री. बाबूराव बागुल यांच्या हिंदूसाहित्य व जातीवाद या लेखाला उत्तर देताना तर्कतीर्थांनी स्पष्ट म्हटले आहे की वंशशास्त्रदृष्टचा हिंदू समाजातील वर्णव्यवस्था ही वंशभेदावर आधारलेली व्यवस्था नाही म्हणून जातीसंस्थेचा विचार करीत असताना प्रथम वंशभेदाच्या कल्पनेचे विसर्जन करावयास पाहिजे. गेल्या अडीच तीन हजार वर्षातील हिंदुसमाज हा वंशदृष्टचा संपूर्ण संकर झालेला समाज आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र हे चार वंश नव्हेत. भारतातील आज विद्यमान असलेल्या ब्राह्मण जमाती पाहिल्या तर त्यांच्यात कसलेही वंशसाम्य आढळत नाही. त्या त्या प्रदेशातील किंवा प्रांतातील ब्राह्मण त्या त्या प्रदेशातील व प्रांतातील क्षत्रिय, वैश्य, शूद्र वा अस्पृश्य यांच्याशी वंशदृष्टचा समान दिसतात." वर्णव्यवस्था, जातिव्यवस्था आणि त्यांचे अपत्य म्हणजे अस्पृश्यता ! या अस्पृश्यतेचे निर्मूलन करण्यासाठी वर्णकल्पना, जातिप्रथा यांचेच समूळ उच्चाटन केले पाहिजे अशी भूमिका घ्यावी लागेल.

श्री. श्री. म. माटे यांनी आपल्या पुस्तकात व्यवहारातील स्पर्शास्पर्श विचारांची चिकित्सा करून म्हटले आहे, "शास्त्र जरी अस्पृश्यतानिवारणाला विरुद्ध असले तरी ते आपण बिलकूल मानू नये. ते डाव्या हाताने बेधडकपणे दूर सारून समाजाने आपला नवा मार्ग चोखाळावा." असे ठाम मत मांडणारे माटे अस्पृश्यता-निवारण हा जिव्हाळ्याचा प्रश्न आहे असे मानीत होते. शास्त्रवचने जर कालबाह्य झाली असली तर समाजाने ती टाकलीच पाहिजेत. अस्पृष्टांना सगळीकडे अन्याय सोसावा लागला ही ऐतिहासिक वस्तुस्थिती कुणाला नाकारता येणार नाही. त्याचे शास्त्रवचनांच्या आधारे समर्थन करणे केवळ दुष्टपणाचे ठरेल. अस्पृश्यतानिवारणाची गरज माटघांनी केवळ भूतदयेचा दृष्टिकोन स्वीकारून मांडली नाही तर माटघांनी विचारांची बदलती वळणे आणि नवे युगमान विचारात घेऊन

तात्त्विक भूमिका स्वीकारली आहे म्हणून ते म्हणतात, "अस्पृश्यांच्या मनबुद्धींच्या सामर्थ्यांच्या विकासास आणि विकसित झालेल्या सामर्थ्यांच्या वापरास भरपूर संधी समाजाने द्यावी व त्याच्या धार्मिक व सामाजिक आपत्ती दूर कराव्या.

अस्पृश्यता-निवारणाचे कार्य करताना माटेमास्तरांना जे अनुभव आले ते त्यांनी प्रांजलपणे सांगितले आहेत. अस्पृश्य समाजातील श्री. पां. ना. राजभोज, रा. के. के. सकट, श्री. बाबुराव बायदंडे यांच्या कार्याचा परिचय करून दिला आहे. अस्पृश्याची अस्मिता जागी करण्याचे कार्य करणाऱ्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांविषयी त्यांच्या मनात नितांत आदर आहे. महर्षी शिंदे यांनी शुद्ध मानवधर्म-कल्पनेने अस्पृश्यांच्या प्रश्नाला हात घातला याची प्रशंसा माटे यांनी केली असली तरी विठ्ठल रामजी शिंदे हे विलायतेहून धर्मशिक्षण घेऊन आल्यानंतर ते प्रार्थना समाजात येऊन दाखल झाले नाहीत तर हिंदू समाजापासून अधिक दूर असलेला जो ब्रह्मसमाज, त्याचे ते सदस्य बनले याबद्दल माटयांच्या मनात नाराजी आहे असे दिसते. ते लिहितात, "अस्पृश्यांचा प्रश्न हाती घ्यावयास हिंदुत्वातून निराळेच व्हावे लागते, अथवा स्वतंत्र व तुसडा असा मतपंथ स्थापावा लागतो असे नाही, तर समाजाच्या पोटी राहूनही, इतकेच नव्हे तर पोटी राहूनच या प्रश्नाच्या मागे लागले, तर त्याची सोडवणूक अधिक चांगली करता येण्यासारखी आहे." अस्पृश्यता-निवारण कार्य हिंदु-समाज बलिष्ठ व्हावा म्हणून अपरिहार्यपणे केले पाहिजे अशी एक विचारधारा आहे. त्याचा प्रभाव माटयांच्या मतावर दिसत असावा. महात्मा ज्योतीराव फुले यांच्या-विषयी देखील माटयांच्या मनात थोडी कसकस आहेच. ते लिहितात, "ख्रिस्ती मिशनरी जर थोडयाशा संस्काराने एवढा बदल घडवून आणू शकतो तर आपल्या-लाच ही किमया का करता येऊ नये अशी कल्पना ख्रिस्ती मिशन यांच्या स्नेहभावात आणि कृपाछत्रात वागत असलेल्या श्री. फुले या गृहस्थास प्राप्त झाली. धर्मान्तराची जरूरी त्यांनी मुळीच ठेवली नाही. अस्पृश्य लोकांना शिक्षण देण्याचे काम त्यांनी १८४८ साली चालू केले. या त्यांच्या प्रयत्नाला मोरो विठ्ठल वाळवेकर, सखाराम यशवंत परांजपे व सदाशिव बल्लाळ गोवंडे या गृहस्थांची चांगली मदत असे. फुले यांनी घरच्या विहिरीवर पाणी भरण्यास अस्पृश्यांना परवानगी दिली. फुले यांच्या प्रयत्नासंबंधाने समाजाच्या मनात विशेष आदरबुद्धी उत्पन्न होणे, निदान त्याकाळी तरी अशक्य होते. एक तर ही बाब जनसमूहाला नवीनच होती आणि दुसरे असे की फुले यांची इतर प्रतिपादने, धोरणे व आश्रयस्थाने समाजास पटण्यास अयोग्य होती हे त्यांच्या लिखाणावरून स्पष्ट दिसून येते." माटयांनी फुल्यांचे समग्र वाङ्मय चिकित्सकपणे विचारात घेतल्याचे निदर्शक हे विधान नाही. वस्तुतः फुल्यांच्या बुद्धिवादाचा व विश्वमानवतावादाचे आकलन माटयांना व्हायला हवे होते. महात्मा फुल्यांनी हिंदुधर्मावर, हिंदुधर्मग्रंथावर, हिंदुधर्माने मान्यता दिलेल्या जातिव्यवस्थेवर प्रखर हल्ला चढवला त्याचे ऐतिहासिक मूल्य ओळखणे आवश्यक होते. सत्यशोधक समाजाची स्थापना केली एवढेच नव्हे तर 'सार्वजनिक सत्यधर्म' या पुस्तकाच्या द्वारे त्यांनी सत्यशोधक समाजास नवे तत्त्वज्ञान दिले हे जाणले पाहिजे. महात्मा फुले म्हणतात. "मनुष्यजातीचे स्वातंत्र्य, समता व बंधुत्व यांच्या पायावर एक कुटुंब निर्माण करणे हेच मनुष्यतत्वाचे ध्येय होय. सर्व मानव स्त्री किंवा पुरुष यांचे हक्क सारखे आहेत. मानव किंवा कोणताही मानवसमुदाय यास दुसऱ्या मानवावर व मानवसमुदायावर स्वामित्व गाजवण्याचा किंवा जबर-दस्तीचा अधिकार नाही. परमेश्वराने सर्व मानवांना जन्मतःच धार्मिक व राजकीय स्वातंत्र्य दिले आहे. त्यांच्यावर आक्रमण करणारा सत्याचा शत्रू होय. राज-कीय, व धार्मिक मतामुळे कोणतीही व्यक्ती उच्च किंवा नीच मानून तिचा छळ करणे म्हणजे सत्याचा द्रोह करणे होय. प्रत्येकास आपल्या धार्मिक राजकीय इ. संबंधीच्या मतांचा प्रसार करण्यास संपूर्ण अधिकार आहे. सर्वांना ऐहिक जीवनाचा, विश्वातील वस्तूंचा यथेष्ठ उपभोग घेण्याचा सारखाच अधिकार आहे." महात्मा फुले यांच्या विचारांची ही झेप समकालीनांना किंवा नंतरही कितीतरी काळ विचारवंतांच्या लक्षात येऊ नये याचे दुःख वाटते.

माटेमास्तरांनी अस्पृश्यता-निवारण कार्यात देवालय-प्रवेश या विषयाच्या संबंधाने जे विचार मांडले आहेत त्यावरून एक लक्षात येते, की सवर्णसमाजाने अस्पृश्यांना माणसासारख्या माणसांना देवालयप्रवेश नाकारून घोर अन्यायच केला. पुणे येथील पर्वती सत्याग्रहाच्या निमि-त्ताने आणि नाशिकच्या राममंदिराच्या प्रवेशाबाबत जो सत्याग्रह झाला त्या निमित्ताने 'अस्पृश्यांचा मंदिर

प्रवेश ' हा प्रश्न गाजला. माटे या संदर्भात फार महत्त्वाचा विचार मांडतात, ते लिहितात, " जे लोक सध्या देवळात दर्शनपूजनास जातात ते अस्पृष्टांचा प्रवेश झाल्यावरही जात राहिले तरच प्रस्तुत प्रश्न खरोखर सुटला हे आपण पुन:पुन्हा विसरत आहो. प्रश्न आहे तो अस्पृष्टांना मंदिरप्रवेश मिळावा हा नाही; तर स्पृश्य लोक ज्या देवळात दर्शनपूजन करतात, त्या देवळात अस्पृष्टांस येऊ देण्यास व निदान सहदर्शनास ते तयार आहेत की नाही हा आहे." स्वतंत्र देऊळ अस्पृश्यांसाठी बांधण्याचा नाद माटे आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी सोडला हे योग्यच झाले. पण पुण्यास देवळाबद्दल खटपट करून हा प्रश्न मार्गी लावावा म्हणून पुण्यातील सर्व देऊळवाल्यांची सभा बोलवण्याचा त्यांनी प्रयत्न करून पाहिला पण कोणीच सभेला आले नाही. एक जे वयस्क गृहस्थ आले, त्यांच्याकडूनही निराशाच वाटचाला आली. माटे आणि त्यांच्या मित्रांनी देवालयप्रवेशाऐवजी मंडप–प्रवेशाची तडजोडवादी भूमिका स्वीकारली. या संदर्भात माटे आणि गांधीजी यांच्यात जो संवाद झाला तो फार महत्त्वाचा आहे. गांधीजींनी मार्मिकपणे उत्तर दिले, " एखादा मनुष्य जर भुकेने मरत असला व त्याला मिळावयाची भाकरी त्याच्यापासून वीस मैलांवर असली व तुम्ही त्याला भाकरीपासून दहा मैलांवर आणून सोडले व म्हणू लागला की आम्ही त्याची थोडीशी भूक भागवली तर ते खरे होईल काय ?" आम्ही सनातनी सुधारक आहो अशी भूमिका स्वीकारून मूळ रोगाचे निर्मूलन होणार नाही. म्हणून तर त्या काळात " अस्पृश्यता आत्ताच्या आत्ता आणि झाडूनपुसून गेली पाहिजे व अस्पृश्यांना स्पृश्याइतकेच सगळेच्या सगळे हक्क आजच मिळाले पाहिजेत." अशी भूमिका अनेक अस्पृश्य पुढाऱ्यांनी घेतली होती.

माटेमास्तरांनी अस्पृश्यता-निवारणाच्या कामी प्रतिपादनाची सारखी झोड उडावयास हवी ही प्रबोधनवादी भूमिका स्वीकारली होती. समाजाशी भांडताना धर्ममत बदलण्याचे काम आपण करीत आहो हे जाणून घेतले पाहिजे. आपली समन्वयवादी विचारसरणी मांडताना ते म्हणतात, " समाजाच्या मनात आपुलकीने प्रवेश केला पाहिजे. त्यातील राजमार्ग इतरांनी व्यापले आहेत म्हणून आपण पाऊलवाटेने चालले पाहिजे. लांब लांब वळणं घेतली पाहिजेत. नव्या वाटा पडल्या पाहिजेत. आपले प्रयत्न राजकारणनिरपेक्ष असावेत. संधीसमानत्वाचे तत्त्व स्वीकारून सर्वांना विकासाची संधी दिली पाहिजे."

१९३७ नंतर अस्पृश्यता-निवारणाच्या कामातून निवृत्त झालेले माटे आपल्या अनुभवांना ललितकथेचे रूप देऊ लागले तेव्हा मराठी कथेच्या आशयात त्यांनी परिवर्तन घडवून आणले. ' बन्सीधर, तू कुठे रे जाशील ' ही त्यांची कथा म्हणजे एका सहृदय समाजशिक्षकाचा आर्त उद्गार होता. ' उपेक्षितांचे अंतरंग ' उलगडून दाखवणाऱ्या शैलीकार कथालेखक माटेमास्तरांनी मराठी कथेला नवे वळण दिले हे तर मान्य करावेच लागेल. पण आयुष्यभर जे सामाजिक तत्त्वज्ञान त्यांनी स्वीकारलं त्याची ध्वजा मराठी ललितसाहित्यात त्यांनी मानाने फडकावली हे कुणी नाकारेल काय ? ■


**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**
(तक्ता क्र. ४ नियम ८ प्रमाणे माहितीपत्रक)
**प्रकार** : त्रैमासिक
**स्वामित्व** : महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ४११०३०
**संपादक** : डॉ. वसंत सभाराम जोशी
**पत्ता** : ३८६, मधली आळी, वाई (सातारा)
**राष्ट्रीयत्व** : भारतीय
**प्रकाशक** : महादेव विनायक गोखले
महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता
पुणे ३०
**राष्ट्रीयत्व** : भारतीय
**मुद्रक** : महादेव विनायक गोखले
**पत्ता** : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता,
पुणे ४११०३०
**राष्ट्रीयत्व** : भारतीय
मी महादेव विनायक गोखले असे जाहीर करतो की वर दिलेली माहिती बरोबर आहे.

सही– म. वि. गोखले

## श्री. म. माटे–जीवनपट

### (निवडक महत्त्वपूर्ण घटना)

जन्म : ३१ ऑगस्ट १८८६ वऱ्हाडातील शिरपूर येथे. एक वर्षाचे असतानाच वडिलांचा मृत्यू–आईचे पाच मुलांसह साताऱ्यास आगमन.
शिगणापूरला आजोळी बालपण– भावांची पांगापांग.
विटचाच्या शाळेत दुसरीत प्रवेश– 'श्रीपती'चे 'श्रीपाद' झाले.
माध्यमिक शिक्षणासाठी साताऱ्याच्या न्यू इंग्लिश स्कूल-मध्ये दाखल. अ. व. कोल्हटकर आणि सीतारामपंत देवधर यांचा सहवास.
१९०५ साली मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण.
१९०६ साली फर्ग्युसन महाविद्यालयात प्रवेश.
घरच्या परिस्थितीमुळे १९०७ मध्ये शिक्षण स्थगित व न्यू इंग्लिश स्कूल सातारा येथे नोकरी.
गणित व सायन्स विषयातील अपयशामुळे १९०९ साली पुन्हा न्यू इंग्लिश स्कूल पुणे येथे शिक्षकाची नोकरी.
१९११ साली मे महिन्यात विवाह.
१९१२ साली बी. ए.ची परीक्षा उत्तीर्ण– न्यू इंग्लिश स्कूलमध्ये नोकरी सुरू.
१९१३ साली पुण्यात बिऱ्हाड केले.
१९१५ साली इंग्रजी व मराठी विषय घेऊन एम. ए.ची परीक्षा उत्तीर्ण.
१९१६ साली शिकवणीचा खाजगी इंग्रजी वर्ग सुरू.
याच सुमारास वसंत व्याख्यानमालेच्या चिटणीस पदाची जबाबदारी– सार्वजनिक जीवनास प्रारंभ.
१९१७ पतितपावन मंदिर बांधण्याचा असफल प्रयत्न
१९१७ प्रत्यक्ष अस्पृश्यता निवारणाच्या कार्यास प्रारंभ
१९२० साली नू. म. विद्यालयातील नोकरी पत्करली.
१९२६ पुण्यात स्वतःचे घर बांधले.
१९३५ स. प. महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून नेमणूक.
१९३७ मध्ये अस्पृश्यता निवारणाच्या कामातून स्वतःच्या कल्पनेप्रमाणे निवृत्ती.
१९३९ साली कर्जफेडीसाठी स्वतःचे घर विकावे लागले.
१९४३ सांगली येथील साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद.
१९४५ साली स. प. महाविद्यालयातून निवृत्त.
१९४६ साली कार्याध्यक्ष म. सा. परिषद.
१९४९ साली पुन्हा स्वतः बांधलेल्या नव्या घरात आगमन.
१९५५ च्या नोव्हेंबरपासून कॅन्सरची बाधा
२५ डिसेंबर १९५७ रोजी मृत्यू.

## संपूर्ण वाङ्मयाची सूची

### प्रबंधात्मक ग्रंथ

१) अध्यक्षीय भाषण– मराठी साहित्य संमेलन (सांगली १९४३)
२) अस्पृश्यविचार.
३) अस्पृष्टांचा प्रश्न– प्रकाशक शं. रा. दाते १९३३.
४) आजकालचे विद्यार्थी– ठोकळ प्रकाशन १९५०.
५) परशुरामचरित्र– य. गो. जोशी प्रकाशन.
६) विज्ञानबोधाची प्रस्तावना.
७) रसवंतीची जन्मकथा– प्रकाशक श्री. म. माटे १९४३.
८) श्री. रामदासस्वामींचे प्रपंचविज्ञान– सूचना व प्रकाशन संचालनालयातर्फे शासन साहित्य परिषद मध्यप्रदेशाकरिता प्रकाशित १९५६.

### निबंधसंग्रह

१) कोवळे निबंध– वेस्टर्न इंडिया बुक स्टॉल प्रकाशन.
२) गीतातत्त्व विमर्श– ठोकळ प्रकाशन १९५७.
३) विचारगुंफा– जय प्रकाशन १९५५.
४) विचारमंथन– व्हीनस प्रकाशन १९६२.
५) विचारशलाका– कॉंटिनेन्टल प्रकाशन ( ३ री आवृत्ती) १९६१.

...१२

६) विवेक मंडन– व्हीनस प्रकाशन १९५६.
७) साहित्यधारा– प्रकाशक श्री. म. माटे १९४३.
८) साहित्य मंजिरी– प्रकाशक श्री. म. माटे १९५४.
९) संत, पंत व तंत– ठोकळ प्रकाशन १९५७.

## चरित्रवाङ्मय

१) आदर्श स्त्री-पुरुष– प्रकाशक य. गो. जोशी १९५०.
२) आधुनिक सुधारक– दी टीचर्स आयडियल पब्लिशिंग हाउस– प्रकाशन १९५३.
३) आपापले हितगुज (आत्मचरित्रांतील उतारे) प्रकाशक श्री. म. माटे.
४) कर्तबगार स्त्रिया– कॉन्टिनेन्टल बुक सर्व्हिस १९५७.
५) जगाचे प्रवासी भाग १ ते ३– ठोकळ प्रकाशन.
६) पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ १९४६.
७) प्रेमिकांना आहेर (आत्मचरित्रांतील उतारे) प्रकाशक श्री. म. माटे १९५३.
८) बारा शास्त्रज्ञ– ठोकळ प्रकाशन.
९) चित्रपट (मी पाहिलेले जग)–आत्मचरित्र, व्हीनस प्रकाशन.

## ललितवाङ्मय

**कथासंग्रह**

१) अनामिका– प्रकाशक श्री. म. माटे १९४६.
२) उपेक्षितांचे अंतरंग– प्रकाशक श्री. म. माटे (सातवी आवृत्ती) १९५७.
३) भावकथा– कुलकर्णी ग्रंथागार प्रकाशन १९५७.
४) भावनांची मांडणी– व्हीनस प्रकाशन १९५९.
५) भावनांचे पाझर– कॉन्टिनेन्टल प्रकाशन १९५४.
६) मधूला सांगितलेल्या गोष्टी– प्रकाशक श्री. म. माटे.
७) माणुसकीचा गहिवर.

**कादंबरी**

१) पश्चिमेचा वारा– प्रकाशक श्री. म. माटे १९५६.

**रूपांतरे भाषांतरे**

१) दोन दुर्दैवी नायक.
२) सूड आणि आत्मबलिदान

**संपादित**

१) केसरी प्रबोध
२) केळकर ग्रंथ
३) महाराष्ट्र सांवत्सरिक
४) वादकोश (अप्रकाशित)
५) विज्ञानबोध.
६) हिंदुत्वकोश (अप्रकाशित)

**अपूर्ण व अप्रकाशित.**

१) दीडशे वर्षांपूर्वीचा महाराष्ट्र.
२) मराठा समाजाचा इतिहास.
३) रशियन क्रांतीचा इतिहास (भाषांतरित)

**असंग्रहित स्फुट लिखाण.**

**वाङ्मयविषयक, समीक्षात्मक, प्राचीन वाङ्मयासंबंधी**

१) अश्लील वाङ्मयाची व्याख्या–रत्नाकर एप्रिल १९२८
२) एक विसरलेला संकेत– वाङ्मयशोभा नोव्हें. १९३९
३) ऐतिहासिक पोवाडे (न. चि. केळकर) परीक्षण रत्नाकर आक्टो. १९२८
४) काव्यकिरिटाचे स्वागत (यशवंतांचा संग्रह) परीक्षण, वा. शोभा नोव्हे. १९४०
५) केकावलीतील अभिप्रायतंतू–रत्नाकर नोव्हे. १९२७
६) गीतगुंफा (यशवंतराव केळकर) परीक्षण, रत्नाकर मार्च १९३२
७) जेथे जातो तेथे तू माझा सांगाती– वाङ्मयशोभा जुलै १९४२
८) थोरले बाजीराव यांचे चरित्र (प्रा. बेहेरे) परीक्षण रत्नाकर मार्च-एप्रिल १९३१
९) दासबोधाची रचना– रोहिणी जुलै १९४७
१०) नवयुगधर्म (स. कृ. फडके) परीक्षण, रत्नाकर डिसें. १९२८
११) नवी लोकशाही व नवे वाङ्मय– वसंत दिवाळी अंक १९५५
१२) नारदाचा समाजसत्तावाद– शशी ऑगस्ट १९५७
१३) प्रीतिपथावर (पद्मा काव्यसंग्रह) परीक्षण, रोहिणी ऑक्टो. १९४७
१४) बालकवींची कविता– प्रस्तावना संपा. व प्रकाशक गो.गो.अधिकारी सारस्वत प्रसारक मंडळी १९२५
१५) भावतरंग (मायदेवांची कविता) परीक्षण, रत्नाकर मे १९२९
१६) मासिकाबद्दलच्या कल्पना– रोहिणी जून १९४७
१७) वाल्मीकी ऋषी व कवी यशवंत यांचा संवाद– वाङ्मयशोभा जून १९४०
१८) रशियन राज्यक्रांती (पां. वा. गाडगीळ) परीक्षण, वाङ्मय शोभा जून १९४७
१९) रामदासस्वामींचे शिक्षण– रोहिणी जून १९४७

२०) राजवाडे यांनी आपली ज्ञानेश्वरी खरोखरीच जाळली काय ? रोहिणी– सप्टेंबर १९४७
२१) रुद्रवीणा (वा. रा. कांत यांचा संग्रह) परीक्षण रोहिणी दिवाळी १९४८.
२२) साहित्यसंमेलन– उद्दिष्ट व कार्य-सह्याद्री ऑ.१९५४
२३) संतवाङ्मयाच्या अभ्यासातील अडचणी उल्लेख महाराष्ट्र ऑक्टो-नोव्हें-डिसेंबर १९४३
२४) संपादकांचे पेंढार– रत्नाकर, जानेवारी १९४८
२५) ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकांना नवे खाद्य– रोहिणी ऑक्टो. १९४७

**सामाजिक व समाजशास्त्रीय**

१) आदर्श गृहिणी कशी असावी ? वसंत, जून १९४९
२) कॉलेजातील मुली व त्यांचे आईवाप (मुलाखत) सह्याद्री, एप्रिल १९५५
३) घटस्फोटानंतर– वसंत, मे १९५०
४) चुकीच्या दुरुस्तीतील चूक– हंस, फेब्रु. १९५१
५) मागासलेला समाज व स्त्रीशिक्षण, हंस, फेब्रु. १९५४
६) वसाहतवादाची एवढी अवहेलना का ? लोकसत्ता, दिवाळी १९५७
७) लंगोटीपासून धोतरापर्यंत गावकरी दिवाळी १९५२
८) शिक्षक, पालक व चालक रत्नाकर जून १९२८
९) समाजशास्त्र परिषदेच्या स्वागताध्यक्ष पदावरून केलेले भाषण महाराष्ट्र जाने. १९४१
१०) स्त्रियांचे स्पर्धायुग-शशी-मार्च १९५७
११) ही क्रांती नव्हे तर काय ? दीपावली १९५३

**धर्म, परामर्ष, तत्वज्ञान**

१) नवमतवादाचे स्वागत– रोहिणी ऑगस्ट १९४७
२) बुद्धधर्माची धूम– हंस दिवाळी १९५६
३) लोकमान्यांच्या रहस्याची महती– शशी ऑ.१९५६
४) श्रीकृष्णमूर्तीचे प्रतिपादन– रोहिणी डिसें. १९४८

**राजकीय**

१) आधी राजकीय की आधी सामाजिक ? रत्नाकर ऑगस्ट १९२६
२) तिसरे महायुद्ध सन्निध आले आहे का? वसंत जून १९४५
३) दिल्ली दरवाजा– शशी दिवाळी अंक १९५७
४) पाकिस्तान आणि पन्नास टक्के– वसंत दि.अंक १९४६
५) मला काय वाटते ? संपादकीय– रोहिणी जून १९४७ ते मे १९४९
६) महाराष्ट्राचा लोकशाहीतील धनी– दीपलक्ष्मी दिवाळी अंक १९५६
७) महाराष्ट्राचे भावी राजकारण–रोहिणी जून १९४८
८) महा.ने काय करावे–महाराष्ट्र परिचय जाने. १९४०
९) वऱ्हाड व महाराष्ट्र यांचे एकीकरण महाराष्ट्र ऑगस्ट १९४२

**व्यक्तिविषयक**

१) आदर्श अर्धांगी (मिलची पत्नी) हंस ऑक्टो. १९५२
२) केसरीचे पाच संपादक– केसरी प्रबोध.
३) टिळक चरित्रातील एक चमत्कार– शशी दिवाळी अंक १९५६
४) डॉ. आंबेडकर हे देशभक्तच आहेत– वाङ्मयशोभा फेब्रु. १९४६
५) दिवंगत महात्माजींचे पुण्यस्मरण–रोहिणी मार्च १९४८
६) बालगंधर्व यांचे वार्धक्य सुखाने जावो– रोहिणी जाने. १९४९
७) माझ्या ओळखीचे महाराष्ट्रीय वक्तृत्व- वसंत जुलै '५३
८) राम गणेश गडकरी– महाराष्ट्र फेब्रु १९५३
९) रामगणेशांची आठवण– रत्नाकर फेब्रु. १९२६

**ललितनिबंध**

१) आणखी एका पंचांगाची जरुरी आहे– रत्नाकर नोव्हें. १९२८
२) गुण्यागोविंद आणि जनताजनार्दन– रत्नाकर फेब्रु.'३०
३) स्मरणांची दिवाळी– दिपावली १९५४

**प्रदेशवर्णन**

१) महाराष्ट्राची मानभूमी पुणे– वसंत दिवाळी १९५७
२) माझी पृथ्वीप्रदक्षिणा– लेखमाला रत्नाकर जाने. ते मे १९२९
३) वालचंदनगर प्रवासवर्णन– सह्याद्री जाने. १९४३

**संकीर्ण**

१) आपणासारखे करिती तत्काळ– नवयुग दिवाळी अंक १९५३
२) ग्रंथालये समाजोन्नतीसाठी अत्यावश्यक आहेत– रोहिणी मे १९५२
३) '' ज्योतिष हे शास्त्र आहे म्हणण्यात थोडी घाई होत आहे.' वाङ्मयशोभा सप्टें. १९४३
४) पशुपक्ष्यांचे गुणावगुण– रोहिणी एप्रिल १९४८
५) महाराष्ट्र ग्रंथ परिषद ४ थे अधिवेशन (एप्रिल १९५३) अध्यक्षीय भाषण– महाराष्ट्र मे १९५३
६) माझी वाचनाची तऱ्हा – हंस जून १९४६
७) माझा नाटकाचा नाद– हंस दिवाळी अंक १९४६
८) हिला आणखी काही दिवस ठेवून घ्या– सह्याद्री नोव्हें. १९५५ ■

# परिषद-वार्ता

## ( १ जुलै ८६ ते ३१ ऑगस्ट ८६ अखेर )

**कै. र. वा. दिघे स्मृतिदिन :**

कै. र. वा. दिघे यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. ५ जुलैला प्रा. निर्मला मोने यांचे ' स्त्री लेखिकांच्या मराठी कादंबऱ्या ' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. वामन मल्हार जोशी स्मृतिदिन :**

दि. २१ जुलै रोजी वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त डॉ. आनंद यादव यांचे 'साहित्यिकाचे मानस' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिन :**

दि. २२ जुलै रोजी ग. ल. ठोकळ स्मृतिदिनानिमित्त डॉ. सरोजिनी बाबर यांचे ' ग्रामीण साहित्य ' या विषयावर व्याख्यान झाले.

**संत सावतामहाराज स्मृतिदिन :**

संत सावतामहाराज यांच्या स्मरणार्थ डॉ. वि. रा. करंदीकर यांची ७ ऑगस्ट व दि. ८ ऑगस्ट रोजी ' संत ज्ञानदेव आणि १३ वे शतक ', आणि ' समर्थ रामदास आणि १७ वे शतक ' या विषयांवर दोन व्याख्याने झाली.

**कै. पु. भा. भावे स्मृतिदिन :**

कै. पु. भा. भावे यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. १३ ऑगस्ट रोजी डॉ. सौ. आशा सावदेकर (नागपूर) यांचे ' पु. भा. भावे यांच्या कादंबऱ्यातील स्त्रीचित्रण ' या विषयावर व्याख्यान झाले. यावेळी एस. एन. डी. टी. विद्यापीठ व पुणे विद्यापीठात १९८५ मध्ये एम्. ए. परीक्षेत मराठी विषयात प्रथम आल्याबद्दल सौ, अश्विनी देशपांडे व श्री. शोभना खंडके यांना पु. भा. भावे–पारितोषिक देण्यात आले. कार्यक्रमाच्या आरंभी माजी सरसेनापती जनरल अरुण-कुमार वैद्य यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

**श्री. विश्राम बेडेकर सत्कार :**

मुंबई येथे ऑक्टोबर ८६ मध्ये भरणाऱ्या अ. भा. म. सा. संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. विश्राम बेडेकर यांचा २८ ऑगस्ट रोजी श्री. शंकर पाटील यांच्या अध्यक्षतेखाली टिळक स्मारक मंदिरात सत्कार करण्यात आला. या प्रसंगी भालचंद्र फडके, द. मा. मिरासदार, माधव वझे आणि श्री. बाबा आमटे यांची समयोचित भाषणे झाली.

**स्वागत आणि सत्कार :**

पुणे महानगरपालिकेच्या स्थायी समितीचे अध्यक्ष मा. गिरीश बापट (नगरसेवक गोविंदराव मालशे व भगवानराव देशपांडे यांच्यासह) व जिल्हाधिकारी मा. वि. पां. राणे यांनी दि. ६ व दि. २२ ऑगस्ट रोजी परिषदेला भेट दिली. यावेळी परिषदेच्या कार्यविस्ताराबाबत पदाधिकाऱ्यांसमवेत त्यांनी चर्चा केली व सहकार्य देऊ केले. मराठी साहित्य महामंडळाचे नवे अध्यक्ष प्रा. गंगाधर गाडगीळ यांचा दि. ३ ऑगस्ट रोजी कार्याध्यक्षांनी पुष्पगुच्छ देऊन सत्कार केला. दि. ५ ऑगस्ट रोजी श्री. शंकर पाटील यांचा षष्ठ्यब्दपूर्तीनिमित्त ' शंकर पाटील सत्कार समिती'तर्फे प्रकट सत्कार करण्यात आला. त्यावेळी परिषदेतर्फे श्री. म. श्री. दीक्षित यांनी पुष्पहार घालून त्यांचे अभीष्टचिंतन केले.

**राजा फडणीस / म. वि. गोखले / प्रभाकर अत्रे**
कार्यवाह





(सभासदांसाठी)

महाराष्ट्र–साहित्य–परिषद

# वार्षिक साधारण सभा

## — सूचना —

टिळक रस्ता, पुणे ३०.
दि. ५ सप्टेंबर, १९८६

स. न. वि. वि.

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २८ सप्टेंबर १९८६ रोजी पुणे येथे माधवराव पटवर्धन सभागृहात सायंकाळी ४–३० वाजता भरणार आहे. या सभेला सर्वांनी उपस्थित राहून सहकार्य करावे अशी विनंती आहे. या सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल.

### – कामे –

(१) मागील सभेचे कार्यवृत्त वाचून संमत करणे.
(२) श्रद्धांजली.
(३) १९८५–८६ या वर्षाचे कार्यवृत्त संमत करणे.
(४) १९८५–८६ चे उत्पन्न-खर्च-पत्रक आणि ताळेबंद-पत्रक संमत करणे.
(५) १९८६–८७ चा अर्थसंकल्प संमत करणे.
(६) १९८६–८७ करिता हिशेब तपासनीसांची नेमणूक करणे.
(७) अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळी येणारी कामे.

आपले,

| | | |
|---|---|---|
| शंकर पाटील (अध्यक्ष) | राजेन्द्र बनहट्टी (कार्याध्यक्ष) | म. श्री. दीक्षित (कोषाध्यक्ष) |
| राजा फडणीस (कार्यवाह) | म. वि. गोखले (कार्यवाह) | प्रभाकर अत्रे (कार्यवाह) |

### टीप

(१) गणसंख्येच्या अभावी सभा १५ मिनिटे स्थगित होईल व नंतर रीतसर सुरू होईल.

(२) वरील कामकाजासंबंधी मतदार-सभासदास काही विशेष सूचना करावयाच्या असतील अगर ठराव मांडावयाचा असेल तर लेखी स्वरूपात तसे २० सप्टेंबर ८६ पर्यंत कळवावे.



अनुक्रमणिका



# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

**वर्ष ८० वे, नोंदणी क्र. ४१९**

## वार्षिक कार्यवृत्त : १९८५–८६

### (१ जुलै १९८५ ते ३० जून १९८६ अखेर)

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नव्या कार्यकारी मंडळाच्या पहिल्या वर्षातील कार्याचे महत्त्वाचे वृत्त सभासदांना सादर करताना आम्हास आनंद होत आहे.

**सभासद संख्या :**

वर्षारंभी वार्षिक साधारण ३६३९ आणि आजीव १८२३ अशी एकूण ५४६२ सभासदसंख्या होती. वर्षभरात साधारण २१४ आणि आजीव २०९ सभासदांची भर पडल्यामुळे जून ८६ अखेर साधारण ३८५३ आणि आजीव २०३२ अशी एकूण ५८२५ संख्या झाली. (यापैकी सुमारे ७०० साधारण सभासदांकडून वर्गणी येणे बाकी आहे.)

**कार्यालयीन सभा :**

वर्षभरात कार्यकारीमंडळाच्या ४ व २९ सप्टेंबर ८५ रोजी वार्षिक साधारण सभा अशा एकूण ५ सभा झाल्या. श्री. शंकर पाटील यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या साधारण सभेत ८४-८५ चे कार्यवृत्त, हिशेबपत्रके आणि ८५-८६ चा अर्थसंकल्प यांना संमती देण्यात आली. या सभेतील चर्चेत सर्वश्री गोपाळराव पटवर्धन, अरविंद नवरे, अरविंद पाटोळे, न. का. घारपुरे, वि. ग. माटे, भी. ज्ञा. जोशी, माधव नावडीकर, हरिभाऊ शिंदे इ. सदस्यांनी भाग घेतला.

**साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम :**

गेल्या वर्षभरात पुणे येथे पुढील कार्यक्रम झाले.

**जुलै ८५ : दिनांक ५**– कै. र. वा. दिघे स्मृत्यर्थ, डॉ. सुप्रिया अत्रे यांचे ' र. वा. दिघे यांच्या कादंबऱ्या ' या विषयावर व्याख्यान. **दि. २०**– कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त डॉ. लीला दीक्षित यांचे 'मराठीतील काही पत्रात्मक कादंबऱ्या ' या विषयावर व्याख्यान. **दि. २२**– कै. ग. ल. ठोकळ यांच्या प्रथम स्मृतिदिनानिमित्त डॉ. अनुराधा पोतदार यांचे ' मराठीतील ग्रामीण कविता ', या विषयावर व्याख्यान.

**ऑगस्ट ८५ : दिनांक १२**– कै. पु. भा. भावे स्मृत्यर्थ डॉ. व. कृ. वऱ्हाडपांडे (नागपूर) यांचे ' भावे साहित्याचे आक्षेपक व वस्तुस्थिती ', या विषयावर व्याख्यान आणि पुणे विद्यापीठाच्या एम. ए. च्या परीक्षेत मराठी विषयात प्रथम क्रमांक मिळविणाऱ्या वृंदा भार्गवे यांना कै. पु. भा. भावे पारितोषिक प्रदान. **दिनांक २१**– श्री. व्यंकटेश माडगूळकर यांच्या सत्तांतर कादंबरीच्या निमित्ताने चर्चा. डॉ. आनंद यादव, डॉ. व. दि. कुलकर्णी व प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी चर्चेत भाग घेतला. **दिनांक २८ व २९**– कै. बालकवी यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. स. गं. मालशे यांची ' मराठी काव्यातील विनोद ' या विषयावर दोन व्याख्याने.

**सप्टें. ८५ : दिनांक ५**– प्रा. राजा दीक्षित यांच्या संचालनाखाली कविसंमेलन. त्यात सर्वश्री जयंत भिडे, अरुणा ढेरे, अनिल कांबळे. राजेन्द्र शहा, विमल लिमये, अरविंद पाटोळे, विनिता पिंपळखरे, रवींद्र सूर्वे, उज्ज्वला खिरे, कल्याण इनामदार, रमण रणदिवे, हिमांशु कुलकर्णी, संगीता जोशी यांनी भाग घेतला. **दि. १४**– कविता गायनाचा बहारदार कार्यक्रम. संगीत दिग्दर्शक श्री. गिरीश जोशी, सौ. अनुपमा सहस्रबुद्धे आणि श्री. गिरीश जोशी यांनी स्वा. सावरकर, इंदिरा संत, मंगेश पाडगावकर, सुरेश भट इ. कवींच्या कविता गाऊन दाखविल्या.

**ऑक्टोबर ८५ : दिनांक ६**– कै. द. वा. पोतदार यांच्या स्मृत्यर्थ प्रा. सदाशिव आठवले. यांचे ' द. वा. पोतदार : व्यक्ती आणि कार्य ' या विषयावर व्याख्यान. **दिनांक १६**– कै. सावित्रीबाई बार्लिगे स्मृतिदिनानिमित्त

...१२









प्रा. डॉ. सत्यरंजन साठे यांचे 'स्त्री आणि कायदा' या विषयावर व्याख्यान. **दिनांक– ३० व ३१** कै. व. ह. गोळे स्मृति-दिनानिमित्त प्रा. माधव वझे यांची 'पाश्चात्य रंगभूमी: काही नवे प्रवाह' आणि 'मराठी रंगभूमी: काही नवे प्रवाह' या विषयांवर व्याख्याने.

**नोव्हेंबर ८५ : दिनांक** २९– कै. माधव जूलियन यांच्या स्मृत्यर्थ डॉ. द. ता. भोसले यांचे 'आजची दलित कविता' या विषयावर व्याख्यान.

**डिसेंबर ८५** : दिनांक २५ व २६– कै. श्री. म. माटे स्मृतिदिनानिमित्त श्री. नानासाहेब गोरे यांची 'समाज परिवर्तनाची वाटचाल' या विषयावर दोन व्याख्याने.

**जानेवारी ८६ : दिनांक १८**– कै. वि. द. घाटे यांचे स्मृतिदिनानिमित्त प्रा. कृ. ब. निकुंब (बेळगाव) यांचे 'साहित्य आणि वाचकांच्या अपेक्षा' या विषयावर व्याख्यान.

**मार्च ८६ : दिनांक ५**– कै. ना. गो. चापेकर स्मृतिदिनानिमित्त प्रा. व. दा. कुलकर्णी (हैद्राबाद) यांचे 'लोकमानसातील महाभारत' या विषयावर व्याख्यान. **दिनांक २०**– कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिनानिमित्त प्रा. सौ. सुधा जोशी यांचे 'मर्ढेकर आणि गाडगीळ: काही समान वाङ्मयीन सूत्रे' याविषयावर व्याख्यान.

**एप्रिल ८६ : दिनांक १०**– एप्रिल, ज्ञानकोशकार केतकर यांच्या स्मारकास पुष्पहार अर्पण. **दि. २१**– प्रा. स. शि. भावे यांचे 'वैचारिक कादंबऱ्यांची कलात्मकता' या विषयावर. कै. केतकर यांच्या स्मृत्यर्थ व्याख्यान.

**मे ८६** : कै. विनायक कोंडदेव ओक यांच्या स्मृत्यर्थ यंदा शिशुरंजन संस्थेच्या सहकार्याने मुलांसाठी योजिलेल्या शिबिरांत डॉ. म. वि. गोखले यांचे व्याख्यान.

**जून ८६** : कै. नायमाघव स्मृतिदिनानिमित्त दि. २१ जून रोजी डॉ. अरविंद देशपांडे यांचे 'इतिहास आणि ललित साहित्य', या विषयावर व्याख्यान झाले.

कै. का. र. मित्र यांचे स्मृतिदिनी दि. २३ जून ८६ रोजी श्री. एस. के. कुलकर्णी (संपादक 'सकाळ') यांचे 'का. र. मित्र: व्यक्ती व वाङ्मय' या विषयावर व्याख्यान झाले.

### का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाला :

कै. का. र. मित्र यांच्या आप्तांनी कै. का. र. मित्र निधींची स्थापना केली. त्या निधींच्या रकमेवर मिळणाऱ्या व्याजातून दरवर्षी सुमारे ६०००|– ची देणगी महाराष्ट्र साहित्य परिषदेला देण्यात येणार आहे. देणगीचा विनियोग म्हणून या वर्षापासून 'कै. का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाले' चा उपक्रम सुरू करण्यात आला.

दि. १८-११-८५ ते २७-११-८५ अखेर प्रस्तुत व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली. 'वाङ्मयीन नियतकालिकांचे कार्य' हा मालेचा विषय होता. प्रा. गो. म. कुलकर्णी. (विविधज्ञानविस्तार), डॉ. शकुंतला आठवले (काव्यरत्नावली) डॉ. भालचंद्र फडके (करमणूक) प्रा. म. ना. अदवंत (मासिक मनोरंजन), डॉ. रा. शं. वाळिंबे (रंगभूमी) डॉ. भीमराव कुलकर्णी (रत्नाकर) डॉ. यशवंत पाठक (यशवंत), डॉ. व. दि. कुलकर्णी (प्रतिभा), प्रा. प्र. ना. परांजपे (सत्यकथा) आणि डॉ. गं. ना. जोगळेकर (अभिरुची) यांची माहितीपूर्ण व्याख्याने झाली.

**अभिनंदन-सत्कार–अभीष्टचिंतन** : पं. महादेवशास्त्री जोशी यांनी ८१ व्या वर्षात पदार्पण केल्याल्याबद्दल दि ३-२-८६ रोजी श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते शाल, गुच्छ, श्रीफल देऊन त्यांचा सत्कार करण्यात आला. तसेच सौ. सुधाताई जोशी यांनाही याप्रसंगी पुष्पगुच्छ देण्यात आला. नंतर पं. जोशी यांचे 'माझी वैदिक प्रेरणा' या विषयावर व्याख्यान झाले.

श्री. विश्राम बेडेकर यांच्या 'एक झाड आणि दोन पक्षी' या पुस्तकास 'साहित्य अकादमी' चे पारितोषिक मिळाले. परिषदेतर्फे श्री. म. श्री. दीक्षित यांनी त्यांच्या घरी जाऊन पुष्पगुच्छ देऊन अभीष्टचिंतन केले.

परिषदेचे माजी कार्यवाह व सुप्रसिद्ध साहित्यिक श्री वि. ग. कानिटकर यांच्या षष्ठ्यब्दीपूर्तीनिमित्त पदाधिकाऱ्यांनी त्यांच्या घरी जाऊन पुष्पगुच्छ देऊन त्यांचे अभीष्टचिंतन केले.

सुप्रसिद्ध कवयित्री सौ. संजीवनी मराठे यांनी ७१ व्या वर्षांत पदार्पण केले. त्यानिमित्त १६ फेब्रुवारीला झालेल्या त्यांच्या गौरव समारंभात त्यांना परिषदेतर्फे पुष्पहार अर्पण करण्यात आला.

'माणूस' साप्ताहिकाच्या रौप्य महोत्सवानिमित्त संपादक श्री. श्री. ग. माजगावकर यांचा परिषदेतर्फे पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला.

महाराष्ट्र साहित्यपत्रिकेचे माजी संपादक व कार्यकर्ते डॉ. भालचंद्र फडके यांच्या षष्ठ्यब्दीपूर्तिनिमित्त झालेल्या सत्कारप्रसंगी परिषदेतर्फे कार्यवाह डॉ. म. वि. गोखले यांनी त्यांचे अभीष्टचिंतन केले.

सुप्रसिद्ध समीक्षक प्रा. माधव मनोहर यांना ७५ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल परिषदेतर्फे त्यांचे अभीष्टचिंतन करण्यात आले.

"साहित्यप्रेमी भगिनी मंडळ" या पुण्यातील साहित्यप्रेमी महिलांच्या संस्थेला २० वर्षे पूर्ण झाली त्याबद्दल संस्थेने २५ डिसेंबर ८५ रोजी आयोजित केलेल्या साहित्यिक मेळाव्यात परिषदेचे पदाधिकारी श्री. राजा फडणीस व श्री. म. श्री. दीक्षित उपस्थित राहिले होते. यावेळी त्या संस्थेने चालविलेल्या कार्याला मदत म्हणून परिषदेतर्फे रु. २५०।– ची देणगी देण्यात आली.

## दिवाळी अंक पारितोषिके :

१९८५ मधील पुढील दिवाळी अंक उत्कृष्ट ठरविण्यात आले व त्यांना विविधज्ञानविस्तारकर्ते मोरमकर, मासिक मनोरंजनकर्ते का. र. मित्र आणि 'किर्लोस्कर'चे शं. वा. किर्लोस्कर यांचे नावे प्रत्येकी रु. १०१।– ची पारितोषिके देण्यात आणि. **दीपावली** (संपादक अशोक कोठावळे), **किस्त्रीम** (संपादक : श्री. भा. महाबळ, विद्या वाळ), **अक्षर** (संपादक : निखिल वागळे). या शिवाय **ऐसी अक्षरे** (संपादक : सतीश शिरोडकर, पद्माकर जोशी) आणि अभिजात (संपादक : स्मिता पटवर्धन) हे दोन अंक उत्तम म्हणून प्रकट करण्यात आले.

दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखकास कै. अनंत काणेकर यांचे स्मरणार्थ दिले जाणारे रु. २००।– चे पारितोषिक **मेनका** दिवाळी अंकातील डॉ. आनंद यादव यांच्या 'मनातील गौळण' या लेखाबद्दल त्यांना देण्यात आले.

सौ. ज्योत्स्ना देवधर, श्री. राजा फडणीस व डॉ. म. वि. गोखले यांच्या समितीने परीक्षक म्हणून काम पाहिले.

## ग्रंथपारितोषिके :

१९८५ मधील पुढील काही उत्कृष्ट ग्रंथाना परिषदेतर्फे पारितोषिके देण्यात आली.

(१) **कादंबरी** : "**लखनौचे दिवस**"– केशव केळकर, (ह. ना. आपटे पारितोषिक, रु. १०१)

(२) **कविता** : "**विवर्त**"–प्रभा गणोरकर (ह. स. गोखले, पारितोषिक रु. २००.)

(३) **उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती** : "**यादोंकी बारात**"– प्रकाशक. प्रमोद बा. इनामदार, इनामदार बंधु प्रकाशन. (अ. स. गोखले पारितोषिक– रु. २००।–)

(४) **संपादित ग्रंथ** : '**सर्व सुर्वे**'– संपादक : वसंत शिरवाडकर (गिरिजा गंगाधर जांभेकर पारितोषिक : रु. १०१)

(५) **समीक्षा** : "**एका चरित्राचे चरित्र**"– द. न. गोखले (ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक– रु. ५००।–)

(६) **संतवाङ्मयविषयक** : "**ज्ञानदेवांचा आत्मसंवाद**" डॉ. वि. रा. करंदीकर, (तुळशीराम वाघ पारितोषिक– रु. ३००।–)

(७) **कुमारवाङ्मय** : "**झोपाळू चिंगा**" सौ. सुमन फडके (सुशील प्रधान पारितोषिक– रु.२००–।)

(८) **ललितेतर वैचारिक ग्रंथ** : श्री गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिके– १) "**शोध–विज्ञान– शोध–**" डॉ. दु. का. संत (रु.५०१) २) **आंबेडकर आणि मार्क्स**– रावसाहेब कसबे (रु. ४०१) "**संक्रमण**"–सरोजिनी वैद्य (शि. म. परांजपे पारितोषिक रु. २५०) **कोंडमारा**– अनिल अवचट (ना. गो. चापेकर पारितोषिक रु. २५०) "**भ्रम आणि निरास**"– नरेंद्र दाभोळकर (विश्वनाथ-पार्वती गोखले पारितोषिक.)

पारितोषिकांचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून डॉ. वि. म. कुलकर्णी, डॉ. मु. रा. चुनेकर, श्री. आनंद अंतरकर आणि डॉ. म. वि. गोखले (निमंत्रक) यांनी काम पाहिले.

### कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत पारितोषिके :

दि. १९-१-८६ रोजी कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी प्रथम पारितोषिक सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. पु. ल. देशपांडे यांच्या हस्ते श्री. विजय कापडी यांच्या 'यंव आणि त्यंव' या विनोदी पुस्तकास रु.१२००-। व पुस्तकाच्या प्रकाशिका सौ. सुनीता मिरासदार (सुपर्ण प्रकाशन) यांना रु. ९००-। देण्यात आले. प्रा. बाळ गाडगीळ श्री. रत्नाकर कुळकर्णी आणि प्रा. द. मा. मिरासदार यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

कॉन्टिनेंटल प्रकाशन पुरस्कृत कवी कुसुमाग्रज प्रथम पारितोषिक कवी वसंत बापट यांच्या हस्ते सौ. अनुराधा पाटील यांच्या 'तरीही',-या कविता संग्रहास (रु. १२००।-) आणि त्या पुस्तकाचे प्रकाशक श्री. कौ. तो. पाटील यांना (रु. ९००) दि. २७ फेब्रुवारी १९८६ रोजी देण्यात आले. प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. अनुराधा पोतदार व श्री. अनिरुद्ध कुलकर्णी यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

### ग. रा. बाळ कथा-पारितोषिक :

श्री. ग. रा. बाळ ट्रस्टमार्फत दरवर्षी एका उत्कृष्ट कथेला रु. १०००।- चे पारितोषिक देण्यात येते. यंदा-पासून श्री. बाळ यांनी हे कार्य परिषदेकडे सोपविले आहे.

त्याप्रमाणे १९८४ सालचे पारितोषिक 'धर्मयोद्धा' या श्री. लक्ष्मण लोंढे यांच्या कथेला देण्यात आले. ही कथा 'दीपावली' १९८४ च्या दिवाळी अंकात प्रकाशित झालेली होती.

सर्वश्री राजेंद्र बनहट्टी, राजा फडणीस, म. वि. गोखले आणि म. श्री. दीक्षित यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

### देणग्या :

कै. कुमुदिनी दत्तप्रसन्न काटदरे यांनी परिषदेला कै. वा. म. जोशी वाङ्मय पुरस्कारासाठी, आपल्या मृत्य-पत्रान्वये रु. १०,०००।- ची देणगी दिली.

कै. म. म. प्रा. द. वा. पोतदार यांचे स्मृत्यर्थ दरवर्षी कार्यक्रम करण्यासाठी श्री. वि. शं. पुरोहित (रु.१००१) लो. टिळक पर्स फंड ट्रस्ट (रु. १००।-), श्री. बबनराव नावडीकर (रु.१०१), श्री. गो. प. नेने (रु. १०१), श्री.ग वा. करमरकर (रु. १०१),श्री. प्रकाश शुक्ल (रु.१०१), श्री. अरविंद नी. नवरे (रु. ५१।-), श्री. रा भा. साने पेटलाद (गुजराथ) (रु. १२५), पं, वसंत गाडगीळ (रु. १०१), श्री. गणेश नवरे (रु. ५१।-), श्री. पां. र. अंबिके (रु. १०१।-) श्री. म. श्री. दीक्षित (रु. १००।-), श्री. शांताराम पाटील (रु.१०१।-), डॉ. सरोजिनी बाबर. (रु. १०१।-),डॉ. भीमराव कुलकर्णी (रु. २५।-),प्रा. मु. मा. जगताप (रु. १०१।-),श्री. वसंतराव देव (रु.१०१।-) प्रा. ग. न. साठे (रु. १००।-) एकूण २५६३ रु.

परिषदेच्या ८० व्या वाढदिवसानिमित्त श्री. शं. बा. शिंपी, तळोदे (रु. १०१।-), श्री. वि. श्यं. शेटे (रु.१०१।-) डॉ. प्र. न. जोशी (रु. १०१।-), डॉ. भीमराव कुलकर्णी (रु. १०१।-), श्री. मा. म. दीक्षित, मुंबई (रु. ५१।-) व श्री. भी. ज्ञा. जोशी (रु. २५।-) यांनी देणग्या दिल्या.

**संतशिरोमणी श्री. सावता महाराज व्याख्यानमालेत** दरवर्षी २ व्याख्याने करण्यासाठी श्री. मा. गो. डोमाळी यांनी एकूण रु. ५०१५ ची रक्कम जमवून देणगी दिली.

**कै. श्रीधर शामराव हणमंते पारितोषिक** : श्री. कमलाबाई बेंद्रे व सौ. निर्मला किणीकर यांनी कै. श्री. शा हणमंते (संकेतकोशकार) यांचे स्मरणार्थ रु. ५०००।- ची देणगी परिषदेस दिली. दरवर्षी या देणगीच्या व्याजातून ललितेतर संशोधनपर ग्रंथास पारितोषिक देण्यात यावयाचे आहे.

अनुक्रमणिका

**कै. नी. स. गोखले पारितोषिक :** श्री. प्रभाकर गोखले यांनी कै. नी. स. गोखले यांचे स्मरणार्थ रु. ३०००।– तसेच कै. ह. स. गोखले व कै. अ. स. गोखले स्मरणार्थ पूर्वी दिलेल्या देणग्यांत प्रत्येकी रु. १०००। अशी भर घालून परिषदेस एकूण ५००० रु. ची देणगी दिली.

## संदर्भ ग्रंथालय :

परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाचा सुमारे ५०० सभासद–वर्गणीदार लाभ घेत असतात.

वर्षारंभी ग्रंथसंख्या २२७८१ होती. तीत खरेदी केलेली ७५, पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आलेली १३१ आणि देणगीदाखल आलेली २३९ आणि पारितोषिकांसाठी आलेली अशी एकूण ४४५ ग्रंथांची भर पडून जून ८६ अखेर पावेतो ग्रंथसंख्या २३२२६ झालेली आहे.

दै. सकाळ, श्रीमती लीला वसंत गोळे व सौ. विजया टेंबे, डॉ. भीमराव कुलकर्णी आणि श्री म. श्री. दीक्षित यांनी भेटीदाखल ग्रंथ दिले.

## मराठी वाङ्मयकोश :

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळातर्फे, प्रकाशित होणाऱ्या " मराठी वाङ्मय कोश ", प्रकल्पामधील खंड दोन (१८५७ ते १९४७) चे कार्य परिषदेने १९८४ पासून स्वीकारले आहे.

चालू वर्षात विभागीय मुख्य संपादक प्रा. स. शि. भावे यांनी राजीनामा दिल्याने, कार्यकारी मंडळाने डॉ. म. वि. गोखले यांची संपादकपदी निवड केली. त्यांनी ग्रंथ परिचयात्मक नोंदणीचे कार्य वेगाने सुरू केले आहे. जून ८६ अखेर सुमारे चारशे नोंदी हाती आलेल्या आहेत.

## परीक्षा कार्य :

डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या संचालनाखाली या वर्षीचे परीक्षाकार्य सुविहीतपणे पार पडले. डॉ. कल्याण काळे, श्री. मो. रा. वाळंबे, डॉ. अंजली सोमण, डॉ. ह. सि. निर्मळे, डॉ. ललिता कुंभोजकर, डॉ. सुप्रिया अत्रे, प्रा. आरती दातार, डॉ. अंजली कान्हेरे, प्रा. आशा जोशी, प्रा. सुषमा जोगळेकर, प्रा. नीलिमा वाकरे, डॉ. व. न. कुबेर आणि डॉ. शैला काळकर यांचे परीक्षा कार्यात आत्मीयतेचे सहकार्य लाभले.

विशारद, प्राज्ञ, प्रवेश या परीक्षांबरोबर या वर्षापासून प्रथमा (८ वी समकक्ष) परीक्षा सुरू करण्यात आली. एकूण १५ परीक्षाकेंद्रांमधून या परीक्षा घेण्यात आल्या. विशारद ३०, प्राज्ञ ६५, प्रवेश ३०४ आणि प्रथमा ४७५ या-प्रमाणे उमेदवारांची संख्या होती. प्रत्येक परीक्षेत उत्तीर्ण झालेले पहिले तीन उमेदवार पुढीलप्रमाणे :

**प्रथमा :** नागेश विजयकुमार कुलकर्णी (तळेगाव दाभाडे), सुवर्णा शामकांत येल्लापूरकर (डोंबिवली) यांना विभागून. राजेश बबनराव थोपटे (तळेगाव दाभाडे) मीनाक्षी निवृत्ती भालेराव (सासवड) विभागून

**प्रवेश :** स्वाती माधव म्हाळंक (पुणे), वैशाली वसंत कुलकर्णी (नाशिक), कल्पना बाळकृष्ण दांडेकर (नाशिक) यांना विभागून, भारती रमेश गावडे (ठाणे)

**प्राज्ञ :** प्रतिभा प्रभाकर औटी (कोपरगाव), योगेश्वर अनंत सेवक (पुणें), संदीप सुरेश तांबोळी

**विशारद :** दत्तात्रय विश्वनाथ लकडे (पुणे) बलभीम आ. ढगे (मुरुम) प्रल्हाद रंगनाथ कामठे (पुणें)

या परीक्षाकार्यात हार्दिक सहकार्य देणाऱ्या केंद्रसंचालकांची संस्था आभारी आहे.

## शाखा पदाधिकाऱ्यांची पहिली सभा :

नवनिर्वाचित कार्यकारी मंडळाने शाखा पदाधिकाऱ्यांची १८ ऑगस्ट १९८५ रोजी प्रथमच सभा भरवून एक नवा उपक्रम सुरू केला. या सभेस परिषदेचे पदाधिकारी व १७ शाखांचे पदाधिकारी हजर होते. शाखांसाठी सर्वानुमते एक नियमावली संमत करण्यात आली. या सभेत शाखांच्या अडीअडचणी, अपेक्षा, सूचना यावर सर्वांगीण चर्चा झाली व काही निर्णय घेण्यात आले. कार्यकारी मंडळाच्या या नव्या उपक्रमाबद्दल शाखेच्या प्रतिनिधींनी समाधान व्यक्त केले व दरवर्षी अशी सभा भरविण्यात यावी अशी सूचना केली.

## ८० वा वर्धापनदिन व विभागीय साहित्य संमेलन :

१ जुलै ८५ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषदेची नवी कार्यकारिणी कार्यान्वित झाली. या नव्या कार्यकारिणीने आरंभीच दोन नव्या उपक्रमांची घोषणा केली. (१) काही वर्षांपूर्वी बंद पडलेली विभागीय संमेलने पुन: सुरू करणे (२) मराठीतील एका ज्येष्ठ आणि श्रेष्ठ साहित्यिकाला महाराष्ट्र साहित्य परिषदेचे रु. २०००/– चे "महाराष्ट्र साहित्य परिषद" पारितोषिक आणि मानचिन्ह द्यावयाचे.

२७ मे १९८६ ला संस्थेला ८० वर्षे पूर्ण होत होती. त्यावेळी हा वर्धापन दिन साजरा करावयाचे ठरले. त्याला जोडून २५ व २६ मे ८५ रोजी विभागीय संमेलन आयोजित करण्याचे ठरले.

महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिकाचे १९८५ चे मानकरी म्हणून निवड समितीने एकमताने कविवर्य विन्दा करन्दीकर यांची निवड जाहीर केली. या पारितोषिकाचे वितरण वर्धापनदिनी करण्याचे ठरले.

सुप्रसिद्ध नाटककार प्रा. वसंत कानेटकर यांची संमेलनाध्यक्ष म्हणून एकमताने निवड करण्यात आली.

२५ मे १९८६ रोजी संध्याकाळी ६.३० वाजता प्रा. वसंत कानेटकर यांच्या अध्यक्षतेखाली ना. सुशीलकुमार शिंदे यांनी संमेलनाचे उद्घाटन केले. प्रा. वसंत कानेटकर यांच्या परखड अध्यक्षीय भाषणाबद्दल अनेकांकडून समाधान व्यक्त करण्यात आले. याप्रसंगी संमेलनाच्या उत्पन्नातून साहित्य परिषदेतर्फे रु. ५०००/– ची देणगी मुख्यमंत्री-दुष्काळनिधीसाठी कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी यांनी जाहीर केली. त्याचे उपस्थितांनी टाळ्या वाजवून स्वागत केले. (१३ जून १९८६ रोजी कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी व कार्यवाह श्री. राजा फडणीस यांनी मुंबई येथे मुख्यमंत्री श्री. शंकरराव चव्हाण यांची भेट घेऊन देणगीचा चेक मुख्यमंत्री यांचेकडे सुपूर्त केला.) २५ मे रोजी रात्री ९-३० वाजता सर्वश्री शंकर पाटील, द. मा. मिरासदार आणि वसंत सबनीस यांचा बहारदार कथाकथनांचा कार्यक्रम झाला.

२६ मे १९८६ रोजी सकाळी ९-३० वाजता प्रा. माधव मनोहर यांच्या अध्यक्षतेखाली "नियतकालिकांना भरती– दर्जेदार साहित्यास ओहोटी" या विषयावर परिसंवाद झाला. डॉ. सरोजिनी वैद्य, प्रा. गंगाधर पानतावणे, श्री. एस. के. कुलकर्णी, प्रा. म. द. हातकणंगलेकर व प्रा. स. शि. भावे यांनी त्यात भाग घेतला. संध्याकाळी ६.३० वाजता कविवर्य विन्दा करन्दीकर, प्रा. वसंत बापट व श्री. मंगेश पाडगावकर या कवित्रयांचे कवितावाचन झाले. रात्री ९-३० वाजता पं. कुमारगंधर्व यांचा सुश्राव्य शास्त्रीय नि नाट्यसंगीताचा कार्यक्रम झाला.

२७ मे १९८६ चा वर्धापनदिन बॅ. विठ्ठलराव गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली पार पडला. यावेळी प्रा. वसंत कानेटकर यांच्या हस्ते कविवर्य विन्दा करन्दीकर यांना १९८५ चे "महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक" प्रदान करण्यात आले. यावेळी परिषदेच्या श्री. ज. जोशी, द. बा. डावरे, वि. त्र्यं. शेटे, भीमराव कुलकर्णी, म. वि. फाटक, रा. व्यं. छत्रपति, न. का. घारपुरे, कुसुमाकर शिपी आणि म. श्री. दीक्षित या कार्यकर्त्यांचा ना. विठ्ठलराव गाडगीळ यांचे हस्ते सत्कार करण्यात आला. यावेळी श्री. गाडगीळ यांचे अध्यक्षीय, श्री. विंदा करंदीकर यांचे आभारदर्शक आणि व प्रा. वसंत कानेटकर यांचे समारोपाचे भाषण झाले.

रात्री ९-३० वाजता "खानदेशचा मळा आणि मराठवाड्याचा गळा" या बहिणाबाईच्या गीतांचा संगीत-बद्ध कार्यक्रम झाला. या कार्यक्रमाने तीन दिवसांच्या सोहळ्याची सांगता झाली. (संमेलन आणि वर्धापनदिन समारंभाचे तपशीलवार वृत्त पत्रिकेच्या एप्रिल-मे-जून १९८६ च्या अंकात देण्यात आले आहे.)

## महाराष्ट्र साहित्य पत्रिका :

परिषदेच्या वाङ्मयीन त्रैमासिकाचे ४ अंक चालू वर्षात (संपादक : डॉ. वसंत स. जोशी) प्रसिद्ध झाले. जुलै–सप्टेंबर ८५ शंकर पाटील विशेषांक, ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर ८५ कथा– दीपावली विशेषांक, जानेवारी-फेब्रुवारी मार्च ८६ व एप्रिल-जून ८६ साहित्यसंस्था विशेषांक म्हणून प्रसिद्ध झाले. सर्व अंक वेळेवर प्रसिद्ध झाले. नियत कालिकांच्या बदलत्या स्वरूपाचे अनेक सभासदांनी स्वागत केले.

## शाखासभावृत्त :

शाखांकडून कार्यवृत्त मागविण्यात आले होते. त्यांचेकडून आलेले वृत्त येणेप्रमाणे–

अनुक्रमणिका

**सांगली :**

१ ऑगस्ट व्याख्यान– श्री. अनिरुद्ध कुलकर्णी, विषय– 'दोस्तोएवस्की : व्यक्ती आणि वाङमयदर्शन'. १० ऑक्टोबर 'सत्तांतर'च्या निमित्ताने 'वाङमयचौर्य' या विषयावर चर्चासत्र. अध्यक्ष– प्रा. म. द. हातकणंगलेकर, वक्ते : डॉ. बाबूराव गुरव, प्रा. माधव माळी, प्रा. दिलीप परदेशी, प्रा. अविनाश सप्रे, प्रा. वैजनाथ महाजन, प्रा मोहन पाटील. ३० ऑक्टोबर श्री. नरेन्द्र दाभोळकर यांचे व्याख्यान.

**वाई :**

ग्रंथ परिचय व ग्रंथविषयक चर्चेचा उपक्रम या वर्षीही चालू होता. दि. ११ ऑक्टोबरच्या कार्यकारिणीच्या सभेत शाखेच्या कार्यवाह सौ. मालतीबाई देशपांडे यांचा आदर्श शिक्षक म्हणून राष्ट्रीय गौरव झाल्याबद्दल शाखेतर्फे सत्कार करण्यात आला. ज्येष्ठ साहित्यिक, दलितमित्र श्री. रा. ना. चव्हाण यांचा साहित्यसंस्कृतीमंडळातर्फे दि. १९ ऑक्टोबरला झालेल्या सत्कारात वाई शाखेने भाग घेतला. 'नवनीत'कार परशुरामतात्या गोडबोले यांच्या छायाचित्राचा अनावरण समारंभ दि. १–१२–८५ रोजी डॉ. शं. गो. तुळपुळे यांचे हस्ते लो. टिळक स्मारक संस्था सभागृहात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी अध्यक्षतेखाली झाला. शाखा या समारंभात सहभागी होती. दि. ८–६–१९८६ रोजी डॉ. म. वि. गोखले यांचे 'क्रांतीदर्शी संत एकनाथ' या विषयावर शाखेतर्फे व्याख्यान झाले. वाई तालुक्यातील माध्यमिक शाळातून प्रसिद्ध होणाऱ्या हस्तलिखितांच्या स्पर्धेचे शाखेने आयोजन केले.

**इचलकरंजी :**

दि. २७ सप्टेंबरला श्री. सुरेश भट यांच्या मुलाखतीची कॅसेट ऐकण्याचा कार्यक्रम, श्री. पाटलोबा पाटील यांनी श्री. सुरेश भट यांची घेतलेली मुलाखत.

दि. २।१०।८५ रोजी परिसरातील नवोदित कवींचे 'कविसंमेलन' आपटे वाचन मंदिराच्या नवीन वास्तूत आयोजित करण्यात आले. त्याप्रसंगी ३५ ते ४० नवकवींनी भाग घेतला. संमेलनाचे अध्यक्षपदी मिरजेचे कवी श्री. राम गोसावी होते.

दि. १।११।८५ रोजी 'माझ्या आवडीच्या कविता' या नाविन्यपूर्ण कार्यक्रमात २५–३० रसिकांनी स्वतःला आवडलेल्या दोन कवितांचे वाचन आणि विवेचन केले.

नांदेड संमेलनाध्यक्ष श्री. शंकर पाटील यांचा शाखेतर्फे सत्कार करण्यात आला. या प्रसंगी श्री. शंकर पाटील यांनी 'मराठी भाषा– मराठी माणूस व ग्रामीण भाषा– ग्रामीण माणूस' ह्या विषयावर भाषण केले.

**यवले :**

शाखेतर्फे मुंबईचे उदयोन्मुख गझल गायक श्री. भीमराव पंचाळे यांच्या गझल गायनाचा कार्यक्रम झाला. गझल या काव्य प्रकारची त्यांनी मधूनमधून माहिती देऊन कार्यक्रमात रंगत आणली.

**जळगाव :**

दि. २७ ऑगस्ट ८५ रोजी 'सत्तांतरःएक आस्वाद' या विषयावर डॉ. श. रा. राणे (फैजपूर) यांचे व्याख्यान दि. २८ ऑक्टोबर ८५ रोजी कविवर्य दु. आ. तिवारी यांच्या स्मृत्यर्थ 'तिवारी व्यक्ती आणि वाङमय' या विषयावर श्री. द. वि. गंधे यांचे व्याख्यान.

जळगावचे बालकथाकार व कवी श्री. धों. वें. जोगी यांच्या 'हंसाचा रथ' या बालकथासंग्रहास राज्य पुरस्कार व 'शांतता आणि मैत्री' या काव्यसंग्रहास सोविएत देश नेहरू पारितोषिक मिळाल्याबद्दल २८ ऑक्टोबर ८५ रोजी त्यांचा सत्कार.

दि. १२ जानेवारी ८६ रोजी महाराष्ट्र कवी यशवंत व श्री. मधुसूदन कालेलकर यांच्या दुःखद निधनाबद्दल त्यांना श्री. भागवत चौधरी यांच्या अध्यक्षतेखाली श्रद्धांजली.

शिक्षणतज्ज्ञ श्री. ल. नि. छापेकर यांच्या निधनाबद्दल दि. १३।२।८६ रोजी शाखेतर्फे त्यांना श्रद्धांजली. श्री. भागवत चौधरी यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या सभेत प्रा. राजा महाजन, प्रा. प्र श्रा. चौधरी, प्रा. प्र. म. चौधरी प्रा. वी. यू. वाघ, प्रा. हो. पं. चौधरी, श्री. ना. चि. शिरसाळे, प्रा. शा. न. पाटील व प्रा. डी. व्ही. पाटील यांची भाषणे झाली.

दि. १७ फेब्रुवारीला डॉ. भालचंद्र फडके यांचे 'साहित्य आणि समाज' या विषयावर भाषण.

दि. २६ मे रोजी जळगाव येथील कवयित्री इंदिरा पाटील यांच्या 'वाटचाल' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन. या प्रसंगी श्री. मधुकरराव चौधरी अध्यक्ष होते व प्रकाशन डॉ. इंद्रराव पवार यांच्या हस्ते झाले.

**अहमदनगर :**

कै. ग. ल. ठोकळ यांच्या स्मृत्यर्थ डॉ. ह. कि. तोडमल यांचे अध्यक्षतेखाली डॉ. आनंद यादव यांचे दि. २२ जुलैला व्याख्यान. या प्रसंगी श्री. पाटील, श्री. द. बा. डावरे यांनी कै. ठोकळ यांच्या आठवणी सांगितल्या.

दि. ३० ऑगस्टला नांदेड संमेलनाध्यक्ष श्री. शंकर पाटील यांचा सत्कार शाखेतर्फे आयोजित केला होता. याप्रसंगी राज्य पुरस्कारप्राप्त प्रा मेधा काळे, प्रा. सु. प्र. कुलकर्णी व प्रा. सोनार यांचा श्री. पाटील यांचे हस्ते सत्कार करण्यात आला. अध्यक्षस्थानी डॉ. ह. कि. तोडमल होते. विजेत्यांच्या पुस्तकांचा परिचय डॉ. लीला गोविलकर यांनी करून दिला. श्री. शंकर पाटील यांचे व्याख्यान व कथाकथन झाले. नगराध्यक्ष श्री. घुले यांचेही याप्रसंगी भाषण झाले. श्री. डी. एम. कांवळे यांचे 'माझा जपानचा प्रवास' या विषयावर दि. १ सप्टेंबर ८५ रोजी प्राचार्य डॉ. बोपर्डीकर यांचे अध्यक्षतेखाली भाषण झाले.

कै पिलाजीराव फडणीस स्मृत्यर्थ डॉ. भालचंद्र फडके यांचे 'काव्य व समाज' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्ष डॉ. ह. कि. तोडमल. परिचय व आभार श्री. अरुण शेवते. दि. २९ ते ३१ मार्च ८६ रोजी प्रा. गं. बा. सरदार यांची 'धर्म आणि समाजकारण', 'धर्म आणि राजकारण', 'धर्म आणि संस्कृती' या विषयावर तीन व्याख्याने. दि. ११ मे रोजी कविवर्य ना. वा. टिळक स्मृतीदिन ख्रिश्चन समाजाच्या सहकार्याने आयोजित करण्यात आला.

**धुळे :**

२७ ऑक्टोबरला शाखेतर्फे सौ. सुषमा गरुड यांच्या 'श्रीरामरक्षास्तोत्र : एक सुबोध अनुवाद' या पुस्तकाचे न्या. श्री. गोविंद भिला यांच्या अध्यक्षतेखाली प्रकाशन. मुख्य पाहुणे म्हणून श्री. गो. नी. दांडेकर याप्रसंगी उपस्थित होते. मा. प्रीतिसुधाजी, प्रा. मु. ब. शहा, राव. गरुड आणि प्रा. कुसुमाकर शिंपी यांचीही या प्रसंगी भाषणे झाली.

दि. ११-१-८६ रोजी मराठी व हिंदी कवींचे संमेलन घेण्यात आले. कवी श्री. विठ्ठल वाघ व सौ. इंदिरादेवी तारे (खरगोण) यावेळी उपस्थित होते. सुमारे ३० कवींनी संमेलनात भाग घेतला. न्या श्री. गो. मि. अस्मरसाहेब यांचे हस्ते कवींचा सत्कार करण्यात आला. शाखेतर्फे यावर्षी ३० नवीन आजीव सदस्य झाले.

**कोल्हापूर :**

दि. १५ सप्टेंबरला जनार्दन गांधी यांच्या 'शिवांजली' या शिवाजीमहाराजांच्या जीवनावरील काव्यसंग्रहावर चर्चा आयोजित करण्यात आली. डॉ. अंबादास माडगूळकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या समारंभात प्रा. म. अ. कुलकर्णी व डॉ. जयसिंगराव पवार यांची भाषणे झाली. श्री. जनार्दन गांधी यांनी काही गीते गाऊन दाखविली. प्रास्ताविक व आभार प्रदर्शन प्रा. भैरव कुंभार व श्री. वणकुद्रे यांनी केले.

दि. ७ नोव्हेंबरला श्री. शशिकांत महाडेश्वर लिखित 'ग्रामीण शिक्षक : कथा नि व्यथा' या कथासंग्रहावर गडहिंग्लज येथे डॉ. प्रभाकर गुमास्ते यांच्या अध्यक्षतेखाली चर्चा. प्राचार्य जे. वी. बारदेसकर, प्रा. विठ्ठल बन्ने, डॉ. सुधाकर गोकाळकर, डॉ. रमेश शिपूरकर, अनंतराव आजगावकर हे चर्चेत सहभागी. समारोप शशिकांत महाडेश्वर यांनी केला.

दि. १४ डिसेंबरला ग. दि. माडगूळकर स्मृतिदिन साजरा करण्यात आला. डॉ. अंबादास माडगूळकर व श्री.

ना. वा. देशपांडे यांनी कै. माडगूळकरांच्या आठवणी सांगितल्या. याप्रसंगी शाहीर पिराजी सरनाईक, जनार्दन गांधी, दत्ता उमराणीकर, सुरेश लोखंडे इ. माडगूळकरांची गीते सादर केली.

दि. १९ जानेवारी ८६ रोजी प्रा. प्रसन्नकुमार पाटील यांच्या ' घोडे ' या काव्यसंग्रहावर प्रा. पां. ना. कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली चर्चा झाली. प्रा. शशिकांत चौधरी, डॉ. शिवशंकर उपासे, प्रा. श्रीधर हेरवाडे. प्रा. रा. रं. बोराडे यांनी चर्चेत भाग घेतला. प्रा. भैरव कुंभार यांनी प्रास्ताविक केले. 'मळणी ' या प्रा. रा. रं. बोराडे यांच्या कथासग्रहावर विद्यार्थी व प्राध्यापक यांचे उपस्थितीत त्यांनी चर्चा केली.

**ठाणे :**

**वर्धापन दिन** : २४ ऑगस्टला शाखेचा वर्धापनदिन साजरा करण्यात आला. या प्रसंगी प्रा. सरोजिनी वैद्य यांचे ' नाटयछटाकार दिवाकर ' या विषयावर भाषण झाले.

११ सप्टेंबरला शाखेचे प्रमुख संस्थापक प्रा. म. वि. फाटक यांचे वयास ७० वर्षे पूर्ण झाल्यावद्दल शाखेतर्फे व त्यांच्या विद्यार्थीवर्गातर्फे त्यांचा सत्कार करण्यात आला. तसेच प्रा. मुरलीधर सायनेकर यांचे लॉरेन्सच्या वाङ्मयावर भाषण झाले.

२० डिसेंबरला प्रा. वि. म. कुलकर्णी यांच्या भाषणाचा व काव्यवाचनाचा कार्यक्रम झाला. याचप्रसंगी पी. सावळाराम यांची दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्यावद्दल प्रा. वि. म. कुलकर्णी यांचे हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला.

२३ मार्च १९८६ रोजी महापौर श्री. सतीश प्रधान यांचा शाखेतर्फे सत्कार करण्यात आला. यावेळी प्रा. डॉ. वि. भि. कोलते यांचे भाषण झाले. यानंतर कविसंमेलनाचा कार्यक्रम झाला. त्यात डॉ. मुंजे, पी. सावळाराम, अशोक वागवे, डॉ. र. म. शेजवलकर, म. पां. भावे इत्यादी कवींनी भाग घेतला.

५ एप्रिल १९८६ रोजी म. ग्रं. संग्रहालयाच्या सहकार्याने व म. सा. परिषद पुणे यांच्या आर्थिक मदतीने सौ. ज्योत्स्ना देवधर व आशा भाजेकर यांच्या कथाकथनाचा कार्यक्रम संग्रहालयाच्या वास्तूत आयोजित करण्यात आला होता.

२२ एप्रिलला ठाणे जिल्हा साहित्यिक मेळावा घेण्यात आला. यात सुमारे १०० सदस्यांनी भाग घेतला. डोंबिवली, कल्याण येथूनही साहित्यिक आले होते. याप्रसंगी प्रा. भीमराव कुलकर्णी अध्यक्ष म्हणून उपस्थित होते. त्यांचा परिचय प्रा. रमेश पानसे यांनी करून दिला. प्रास्ताविक प्रा. म. वि. फाटक यांनी केले. त्यानंतर " अलीकडील नाटकांतील स्त्री दर्शन " या विषयावर परिसंवाद झाला. त्यात सर्वश्री मुरलीधर सायनेकर, र. म. शेजवलकर, सौ. ज्योतीका ओझरकर, सौ. मैड व सौ. विजया टिळक इत्यादींनी भाग घेतला. सायंकाळी सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. वि. आ. बुवा यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले.

शाखेला यावर्षी डॉ. बेडेकर विद्यामंदिर व मराठी ग्रंथ संग्रहालयाचे मोलाचे सहकार्य लाभले. तसेच भारत सहकारी बँकेने शाखेस रु. २५००/– ची देणगी दिली.

**मंगळवेढा :**

२२ ऑगस्ट– काव्यवाचन स्पर्धा. श्री. महंमद शेख यांचा सत्कार. ११ जानेवारी– ' मानवेंद्र रॉय यांचा मानवतावाद ' या विषयावर भाई ढोले यांचे व्याख्यान. १४ जानेवारी– श्री. शंकर पाटील यांचा सत्कार व त्याप्रसंगी पत्रकार श्री. सुरेश जोशी यांचा त्यांच्या हस्ते सत्कार. ५ फेब्रुवारी रोजीच्या ' आजचे विद्यार्थी बेजबाबदार आहेत– नाहीत ' या विषयावरील चर्चेत कार्यवाह प्रा. आ. गो. पुजारी, काळुंके, ज. शं. रत्नपारखी, दाजीसाहेब कट्टे, देशमुख व प्रा. जे. एम. माने यांचा सहभाग. ४ मार्च– श्री. अशोक देशपांडे यांचे ' १९६६ व ७१ च्या युद्धकथा ' या विषयावर कथाकथन.

**श्रद्धांजली :**

दि. १३ एप्रिल १९८६ रोजी कै. भवानराव पंतप्रतिनिधी, औधकर यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ त्यांच्या छायाचित्रास हार अर्पण करण्यात आला.

परिषदेचे माजी कार्यवाह प्रा. अरविंद मंगरूळकर यांचे दि. २७ मे १९८६ रोजी दुःखद निधन झाले.

५ जून १९८६ प्रा. मंगरूळकरांच्या निधनाबद्दल दुखवटा सभा आयोजित केली होती. श्री. शंकर पाटील अध्यक्षस्थानी होते. याप्रसंगी सर्वश्री वामनराव देशपांडे, लीला अर्जुनवाडकर, के. पं. मंगळवेढेकर, भीमराव कुलकर्णी, गं. ना. जोगळेकर, भी. ग्रा. जोशी आणि अरविंद पावळकर यांची श्रद्धांजली अर्पण करणारी भाषणे झाली.

**ऋणनिर्देश :**

या वर्षी परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या विविध व विधायक कार्यात अनेक व्यक्ती अणि संस्था यांचे सहकार्य लाभले. महाराष्ट्र राज्याचे शिक्षणखाते, ग्रंथालय संचालनालय, साहित्य संस्कृतिमंडळ, विश्वकोश कार्यालय; पुणे महानगरपालिका, विशिष्ट कार्यासाठी देणग्या देणारे देणगीदार, शाखासभांचे पदाधिकारी, वृत्तपत्रे-नियतकालिके, नव्याने झालेले अनेक आजीव सभासद इत्यादी सर्वांचे आम्ही ऋणी आहोत.

आपले

**राजा फडणीस / म. वि. गोखले / प्रभाकर अत्रे**

कार्यवाह

शेड्यूल ११

दिनांक १–७–८५ ते ३०–६–८६

| खर्च | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **मालमत्तेसंबंधी** | | ४८३२–३५ |
| भुईभाडे, म्युनिसिपल कार्पोरेशन कर | ४६०–५० | |
| विमा (ग्रंथालय) | ४०–०० | |
| जनरल मेन्टेनन्स | ४०९३–८५ | |
| इमारत दुरुस्ती | २३८–०० | |
| **व्यवस्थापन** | | ४१५२८–१५ |
| पगार व प्रॉ. फंड | २१०३२–७० | |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी | ६४२५–४५ | |
| टपाल व दूरध्वनी | ५३०६–२० | |
| कार्यकारी मंडळ (प्रवासादी खर्च) | २७१२–८० | |
| प्रवास व प्रचारकार्य | २१४७–८० | |
| वीज | ३९०३–२० | |
| **विभागीय संमेलन** | | ३४०००–२० |
| स्मरणिका | | १२८३६–१५ |
| साहित्य परिषद पारितोषिक (निव्वीला वर्ग) | | ३९१४–२५ |
| **हिशोब तपासनीस** | | ५००–०० |
| **किरकोळ खर्च** | | |
| आतिथ्य | ३६८७–२५ | ४५८३–७० |
| विश्वस्त | १०१–१० | |
| इतर | ७९५–३५ | |
| **घसारा** | | |
| इमारत | १५२३–४० | ६२४३–६४ |
| फर्निचर व डेडस्टॉक | ११६६–६४ | |
| ग्रंथालय | ३५५३–६० | |
| **संस्थेच्या उद्दिष्टांकरिता** | | |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | | १५९८७–७० |
| महामंडळ (प्रवास व वर्गणी) | | २४३९–१५ |
| शाखा-सभा वर्गणी हिस्सा | | ४५७३–२५ |
| पत्रिका (कागद, छपाई, टपाल इ.) | | ६२३९३–११ |
| ग्रंथालय (वेतन व इतर खर्च) | | ८०२५–८० |
| परीक्षा | | ७८३२–२० |

नियम (१) प्रमाणे

## या वर्षाचे उत्पन्न-खर्च पत्रक

| उत्पन्न | | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|---|
| व्याज | | | ४१६७१–१३ |
| | सेव्हिंग खात्यावरील | २६०१–७० | |
| | . ठेवींवरील | ३८७६४–७८ | |
| | डिव्हिडंड | ३०४–६५ | |
| देणग्या | | | ४८९४२–०० |
| अनुदान | | | ३३६४२–०० |
| | ग्रंथालय | २५००–०० | |
| | शासकीय वार्षिक अनुदान | १४०२२–०० | |
| | पत्रिका | ९०००–०० | |
| | वाङ्मयकोश | ८१२०–०० | |
| इतर उत्पन्ने | | | ३४९३८–०५ |
| | परीक्षा शुल्क | ६७७६–२५ | |
| | इतर जमा | २७७२–८० | |
| | सायक्लो-मशीन विक्री-वाढावा | ३५८२–८० | |
| | साधारण सभासद वर्गणी | १२८११–०० | |
| | पत्रिका वर्गणी व जाहिरात | ८७९५–२० | |
| | संलग्न संस्था वर्गणी | २००–०० | |
| पारितोषिके व स्मृतिदिन | | | ५८००–०० |
| | का. र. मित्र स्मृतिदिन व व्याख्यानमाला | ४५००–०० | |
| | सावित्रीबाई बार्लिंगे ,, | ५००–०० | |
| | बालकवी स्मृतिदिन | ८००–०० | |
| विभागीय संमेलन | | | १७९००–६० |
| | स्मरणिका | | ३२८५०–०० |
| तूट | | | २५३८६–०७ |
| | | | २,४१,१२९–८५ |

→

| खर्च | रुपये | पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|---|
| वाङ्मयकोश | | | १२९५०–७५ |
| इतर प्रकाशने | | | ५१७–९० |
| पारितोषिके व स्मृतिदिन खर्च | | | १७९७१–५५ |
| | | | २,४१,१२९–८५ |

तपासले. बरोबर आहे. आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार

पुणे : एन्. सी. भळगट

दिनांक : ५-९-१९८६ पाटणकर अँड असोसिएट्स अकौंटंट्स्‌करिता

चोवा

अनुक्रमणिका

## दिनांक ३० जून

| निधी व देणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **विश्वस्तनिधी** | | ३५५३३७–४५ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३१४८००–४५ | |
| + आजीव सभासद (८५–८६) | ४०५३७–०० | |
| **इतर राखीव निधी** | | |
| अ) इमारत | ८९६४४–९४ | ८९६४४–९४ |
| ब) ग्रंथालय | २३५७३–१० | २३५७३–१० |
| क) वाङ्मयेतिहास योजना | | ७७२७५–८६ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ४६४३३–५१ | |
| +८५–८६ मधील विक्री | १३१४२–३५ | |
| +३०–६–८६ चा शिल्लक साठा | ६३७००–०० | |
| | १२३२७५–८६ | |
| –१–७–८५ चा शिल्लक साठा | ४६०००–०० | |
| ड) पारितोषिके व स्मृतिदिन निधी- मागील ताळेबंदाप्रमाणे | १४४६९६–०० | १६७४६०–०० |
| +८५–८६ मधील जमा | २२७६४–०० | |
| | १६७४६०–०० | |
| **प्रॉव्हिडंड फंडखाते** | | १५२२०–४२ |
| मागील ताळेबंदावरून | १३६२८–१२ | |
| +८५–८६ मधील जमा | १५९२–३० | |
| | १५२२०–४२ | |
| **इतर देणी** | | ४७९३६–५७ |
| **अनामत** | | १००००–०० |
| **ग्रंथालय अनामत** | | २२०८६–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १८३९६–०० | |
| +८५–८६ मधील जमा | ३६९०–०० | |
| | २२०८६–०० | |
| **हिशोबतपासनीस** | | ५००–०० |

नियम (१) प्रमाणे

## १९८६ रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| **स्थिर जिंदगी** | | ५९४१२–०५ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ६०९३५–४५ | |
| –घसारा २·५ टक्के | १५२३–४० | |
| | ५९४१२–०५ | |
| **गुंतवणुका** | | ११५५०–०० |
| अ) रोखे दर्शनी किंमतीचे– | ५३००–०० | |
| कन्व्हर्शन लोन १९४७– | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन | २७००–०० | |
| | ८०००–०० | |
| ब) शेअर्स सें. प्रॉ. रेल्वेज | २३००–०० | |
| महाराष्ट्र स्टेट को. ऑ. बँक | १२५०–०० | |
| | ३५५०–०० | |
| | ११५५०–०० | |
| **फर्निचर व डेडस्टॉक** | | १०४९९–७९ |
| मागील ताळेबंदावरून | ९००५–१३ | |
| +८५–८६ मधील खरेदी | ३३७८–५० | |
| | १२३८३–६३ | |
| –सायक्लो मशीन आजची किंमत | ७१७–२० | |
| | ११६६६–४३ | |
| –घसारा १० टक्के | ११६६–६४ | |
| | १०४९९–७९ | |
| **ग्रंथालय** | | ३१९८२–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३२६२३–२५ | |
| +८५–८६ मधील खरेदी | २९१२–३५ | |
| | ३५५३५–६० | |
| –घसारा १० टक्के | ३५५३–६० | |
| | ३१९८२–०० | |
| **शिल्लक साठा** | | ८७२००–०० |
| वाङ्मयेतिहास प्रकाशने | ६३७००–०० | |
| संशोधन–प्रकाशने | २३५००–०० | |
| | ८७२००–०० | |
| **वीजबोर्ड अनामत** | | २६०–०० |



अनुक्रमणिका

| निधी व देणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
| --- | --- | --- |
| **मराठी फार्स** | | ४३६९–७५ |
| अनुदान | १२६००–०० | |
| –८५-८६ मधील खर्च | ८२३०–२५ | |
| **साहित्य परिषद पारितोषिक-निधी** | | ३९१४–२५ |
| उत्पन्नखर्च पत्रकावरून | | |
| **संशोधन प्रकाशने** | | ८१६७–१७ |
| ८५–८६ मधील विक्री | १२६२८–६० | |
| ८५–८६ मधील अनुदान | ९०००–०० | |
| ३०–६–८६ चा साठा | २३५००–०० | |
| | ४५१२८–६० | |
| वजा मागील ताळेबंदाप्रमाणे | ९८०६–७७ | |
| वजा १–७–८५ चा साठा | ३०१६–१० | |
| वजा ८५–८६ मधील खर्च | २४१३८–५६ | |
| | | ८२५४८५–५१ |



अनुक्रमणिका

| जिंदगी व येणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| आयकर वसुली | | ७५–०० |
| इतर येणी | | २७९१८–०० |
| अॅडव्हान्स | | ११६२–८४ |
| ठेवीं | | ४४३९००–०० |
| अ) पारितोषिके व स्मृतिदिन | २५५००–०० | |
| ब) बँक ऑफ महाराष्ट्र ठेवी | २३४००–०० | |
| क) विश्वस्त ठेवी– | | |
| बँक ऑफ वडोदा | ३७५००–०० | |
| राष्ट्रीय केमिकल्स फर्टिलायझर्स | २५०००–०० | |
| कॉम्प्युटर कार्पोरेशन | २५०००–०० | |
| टाटा लोकोमोटिव्ह इंजिन्स | १००००–०० | |
| टाटा आयर्न अँड स्टील कंपनी | १५०००–०० | |
| ईस्टइंडिया हॉटेल | १५०००–०० | |
| लार्सन अँड टुब्रो कं. | ६००००–०० | |
| रिलायन्स इंडस्ट्रिज | ५०००–०० | |
| स्टील अॅथॉरिटी ऑफ इंडिया | १,००,०००–०० | |
| | ३,४१,४००–०० | |
| ड) कार्यकारी मंडळ ठेवी | | |
| पुणे पीपल्स को-ऑप बँक | २१५००–०० | |
| स्टील अॅथॉरिटी ऑफ इं. | ५०००–०० | |
| इंडियन टेलिफोन इंडस्ट्रिज | ५०००–०० | |
| | ३१५००–०० | |
| इ) स्टेट बँक ऑफ इं. (विश्वस्त) | ७००००–०० | |
| फ) ग्रंथालय अनामत | १०००–०० | |
| | ७१००० | |
| प्रॉ. फंड ठेवी | | १५२२०–४२ |
| ठेवी | ८२९४–०१ | |
| सेव्हिंग खाते | ६९२६–४१ | |
| | १५२२०–४२ | |

अनुक्रमणिका

| जिंदगी व येणी | रुपये पैसे | रुपये पैसे |
|---|---|---|
| तूट | | ८५०९४-३३ |
| मागील ताळेबंदावरून | ५९७०८-२६ | |
| +८५-८६ मधील तूट | २५३८६-०७ | |
| | ८५०९४-३३ | |
| अखेरच्या शिलका | | ५१२११-०८ |
| बँक ऑफ महाराष्ट्र (से.) | १३६०५-१८ | |
| स्टेट बँक विश्वस्त (से.) | ८१५-३९ | |
| बँक ऑफ बडोदे विश्वस्त (से.) | २४८८४-२० | |
| बँक ऑफ बडोदे (करंट) | ५०३१-०६ | |
| पुणे पीपल्स को-ऑप बँक (से.) | ६७६०-८० | |
| रोख | ११४-४५ | |
| | ५१२११-०८ | |
| | | ८,२५,४८५-५१ |

| म. श्री. दीक्षित | राजा फडणीस | सर्जेराव घोरपडे | मधुकर परांजपे | वि. ग. माटे |
|---|---|---|---|---|
| कोषाध्यक्ष | कार्यवाह | विश्वस्त | विश्वस्त | विश्वस्त |



अनुक्रमणिका

## अर्थसंकल्प : १९८६–८७

| खाते | संकल्प १९८५–८६ | प्रत्यक्ष १९८५–८६ | संकल्प १९८६–८७ |
|---|---|---|---|
| व्याज व डिव्हिडंड | ५०,०००–०० | ४१६७१–१३ | ५०,०००–०० |
| देणग्या | ४०,०००–०० | ४८९४२–०० | ४५,०००–०० |
| शासकीय अनुदान (मेंटेनन्स) | १५,०००–०० | १४०२२–०० | १५,०००–०० |
| पुणे महानगरपालिका अनुदान | १५००–०० | — | ५०००–०० |
| सा. संस्कृती मंडळ अनुदान (पत्रिका) | ९०००–०० | ९०००–०० | ९०००–०० |
| ग्रंथालय अनुदान | २५००–०० | २५००–०० | २५००–०० |
| पत्रिका वर्गणी व जाहिरात | १०,०००–०० | ८७९५–२० | ८०००–०० |
| वार्षिक साधारण सभासद वर्गणी | १५,०००–०० | १२८११–०० | १०,०००–०० |
| परीक्षा | १०,०००–०० | ६७७६–२५ | ८०००–०० |
| संलग्न संस्था वर्गणी | २००–०० | २००–०० | २००–०० |
| किरकोळ इतर जमा | १०००–०० | २७७२–८० | १०००–०० |
| अनामत | १२,०००–०० | १००००–०० | १०,०००–०० |
| प्रकाशने | १५००–०० | — | — |
| स्मरणिका | — | ३२८५०–०० | — |
| विभागीय साहित्य संमेलन | १०,०००–०० | १७९००–६० | १०,०००–०० |
| ग्रंथ पारितोषिके व स्मृतिदिन | — | ५८००–०० | ७३००–०० |
| तूट | ३३,३००–०० | — | ३८,०००–०० |
| | | | २,१९०००–०० |

राजेन्द्र बनहट्टी
(कार्याध्यक्ष)

म. श्री. दीक्षित
(कोषाध्यक्ष)



अनुक्रमणिका







(१ जुलै १९८६ ते ३० जून १९८७ अखेर)

| खाते | संकल्प १९८५–८६ | प्रत्यक्ष १९८५–८६ | संकल्प १९८६–८७ |
|---|---|---|---|
| म्युनि. कर व भुई भाडे | १०००–०० | ४६०–५० | १०००–०० |
| इमारत देखभाल व विमा | ३०००–०० | ४३७१–८५ | ४०००–०० |
| फर्निचर व नवीन सामान | २०००–०० | — | ३०००–०० |
| पगार व प्रॉ. फंड | २०,०००–०० | २१०३२–७० | २५,०००–०० |
| छपाई, टायपिंग, स्टेशनरी | ६०००–०० | ६४२५–४५ | ६०००–०० |
| टपाल व दूरध्वनी | ५०००–०० | ५३०६–२० | ६०००–०० |
| वीज | ६०००–०० | ३९०३–२० | ५०००–०० |
| कार्यकारी मंडळ (प्रवास व इतर खर्च) | ५०००–०० | २७१२–८० | ४०००–०० |
| प्रवास व प्रचार कार्य | ५०००–०० | ३१४७–८० | ५०००–०० |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | १५,०००–०० | १५९८७–७० | २०,०००–०० |
| पत्रिका (कागद, छपाई, टपाल इ.) | ६५,०००–०० | ६२३९३–११ | ६५,०००–०० |
| ग्रंथालय (खरेदी व वेतन) | १२,०००–०० | ८०२५–८० | १०,०००–०० |
| परीक्षा | १०,०००–०० | ७८३२–२० | ८०००–०० |
| शाखासभा (वर्गणी हिस्सा) | १०,०००–०० | ४५७३–२५ | ४०००–०० |
| म. सा. महामंडळ (वर्गणी व प्रवास) | ५०००–०० | २४३९–१५ | ५०००–०० |
| आतिथ्य | ५०००–०० | ३६८७–२५ | ५०००–०० |
| संशोधन योजना | — | — | ३०००–०० |
| ग्रंथ पारितोषिके व स्मृतिदिन | १२,०००–०० | १७९७१–५५ | २०,०००–०० |
| हिशेब तपासनीस | १०००–०० | ५००–०० | १०००–०० |
| किरकोळ (इतर) | १०००–०० | ७९५–३५ | १०००–०० |
| प्रकाशने | १०००–०० | ५१७–९० | १०००–०० |
| पारितोषिक निधी वर्ग | — | ३९१४–२५ | — |
| विभागीय साहित्य संमेलन | १०,०००–०० | ३४०२०–२० | १०,०००–०० |
| स्मरणिका | — | १२८३६–१५ | — |
| घसारा | १०,०००–०० | ६२४३–६४ | ६०००–०० |
| विश्वस्त व्यवहार | १०००–०० | १०१–१० | १०००–०० |
| | | | २,१९०००–०० |

राजा फडणीस (कार्यवाह) म. वि. गोखले (कार्यवाह) प्रभाकर अत्रे (कार्यवाह)

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ८० व्या वर्धापन दिनानिमित्त

(२७ मे १९८६)

प्रकाशित झालेली स्मरणिका

# साहित्यादर्श

**विविध वाङ्मयप्रकारातील प्रमुख मराठी साहित्यिकांनी आपल्या आदर्शांचे केलेले विवेचन**

संपादक : म. श्री. दीक्षित, म. वि. गोखले, म. ना. अदवंत



मूल्य : २० रुपये ■ परिषदेच्या सभासदांसाठी सवलतीचें मूल्य १५ रुपये


**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११० ३०.

## महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दर वर्षी दिली जाणारी ग्रंथ पारितोषिके

| | |
|---|---|
| **कादंबरी–** ह. ना. आपटे स्मृत्यर्थ | १००–०० |
| **कविता–** ह. स. गोखले स्मृत्यर्थ | ३००–०० |
| **समीक्षा–** ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक | ५००–०० |
| **कुमार वाङ्मय–** सुशील प्रधान स्मृत्यर्थ | २००–०० |
| **संपादित ग्रंथ–** गिरिजा–गंगाधर जांभेकर स्मृत्यर्थ | १००–०० |
| **उत्कृष्ट प्रकाशन–** अ. स. गोखले स्मृत्यर्थ | ३००–०० |
| **कथासंग्रह–** नी. स. गोखले स्मृत्यर्थ | ३००–०० |
| **संतवाङ्मय विषयक ग्रंथ–** तुळशीराम बाघ स्मृत्यर्थ | २५०–०० |
| **ललितेतर वैचारिक–** ना. गो. चापेकर स्मृत्यर्थ | २५०–०० |
| **ललितेतर वैचारिक–** शि. म. परांजपे स्मृत्यर्थ | २५०–०० |
| **ललितेतर वैचारिक–** विश्वनाथ–पार्वती गोखले स्मृत्यर्थ | १५०–०० |
| **ललितेतर वैचारिक–** गणेश-सरस्वती ठाकूरदेसाई स्मृत्यर्थ | ५००–०० |
| **ललितेतर वैचारिक–** गणेश-सरस्वती ठाकूरदेसाई स्मृत्यर्थ | ६००–०० |
| **वैचारिक संशोधनपर–** श्री. शां. हणमंते स्मृत्यर्थ | ३५०–०० |
| **कादंबरी–** वा. म. जोशी स्मृत्यर्थ | १०००–०० |
| **विनोद–** चिं. वि. जोशी स्मृत्यर्थ कॉंटिनेंटल प्रकाशन | १२००–०० |
| **कविता–** कुसुमाग्रज पारितोषिक कॉंटिनेंटल प्रकाशन | १२००–०० |
| (वरील दोन्ही पुस्तकांच्या प्रकाशकांनाही प्रत्येकी ९०० रु) | १८००–०० |
| **कथा–** ग. रा. बाळ ट्रस्ट पारितोषिक (वर्षभरातील उत्कृष्ट कथेस) | १०००–०० |

याशिवाय साहित्यक्षेत्रात भरीव कार्य करणाऱ्या व्यक्तीस महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दर वर्षी रु २००० चे खास पारितोषिक व मानचिन्ह परिषदेच्या वर्धापनदिनी (२७ मे) देण्यात येते. तसेच दर वर्षी तीन उत्कृष्ट दिवाळी अंकांना प्रत्येकी १०० रु. ची पारितोषिके दिली जातात. दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखास अनंत काणेकर यांच्या स्मृत्यर्थ २०० रु. चे एक पारितोषिक दिले जाते.

एकूण दर वर्षी रु. १२,६५० रकमेची पारितोषिके दिली जातात. लेखकांनी वा प्रकाशकांनी पारितोषिकांसाठी १९८६ मध्ये प्रकाशित झालेल्या पुस्तकांच्या दोन प्रती ५ जानेवारी १९८७ पर्यंत कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३० या पत्त्यावर पाठवाव्या.